॥ श्री ॥

# जातकबोध

लेखक

हरि रघुनाथ भागवत, बी. ए.

आवृत्ति दुसरी.

अष्टेकर कंपनी, पुणें.

शके १८४५—सन १९२३ इसवी.

किंमत दीड रुपया.

# प्रस्तावना

जातकशास्त्र हें ज्योतिःशास्त्राशीं संबद्ध आहे. आकाशस्थ ज्योतींच्या स्थितीवरून जातकशास्त्र तयार केलें आहे. ग्रहांची अमुक एका प्रकारची स्थिति असली म्हणजे अमुक फळ मिळतें असे सिद्धांत आमच्यांतील प्राचीन शोधकांनीं बांधले व अनुभवाअंतीं ते खरे असल्याचें आढळल्यावर त्याचें जातकशास्त्र बनलें. ग्रहांचा मनुष्यांशीं संबंध काय म्हणून असावा? ग्रहांचा संबंध असला तर ग्रहांहून जास्त बलवत्तर अशा तारकांचाहि संबंध असणें योग्य आहे, आणि तारकांहून अत्यंत निकट अतएव अत्यंत बलवती अशा पृथ्वीचाहि संबंध असावा, इत्यादि प्रकारच्या शंका साहजिकपणें मनांत येतात. या शंकांना उत्तर ज्योतिःशास्त्रामध्येंच सांपडण्यासारखें आहे. विश्वामधील लहान मोठ्या प्रत्येक पदार्थाचे अंगीं आकर्षणशक्ति आहे. अर्थात् हें आकर्षण बाह्य व आंतर असें दोन्ही प्रकारचें असलें पाहिजे. ग्रहांना जर आकर्षणशक्ति आहे तर मनुष्याच्या जन्मकालीं त्यांची अशी स्थिति असेल त्या स्थितीला अनुसरून मनुष्याला आकर्षण करण्याची म्हणजे मनुष्याच्या आयुष्यावर आपली शक्ति चालविण्याची पात्रता असावी हें उघड होतें. ग्रहांप्रमाणेंच तारकांमध्यें देखील ही शक्ति असली पाहिजे, परंतु त्यांचें पृथ्वीपासून अंतर अतिशय असल्यामुळें त्यांच्या शक्तीचा प्रभाव कमी असावा. पृथ्वीमध्यें देखील ही शक्ति आहे व या शक्तीचा ती उपयोग देखील करते. म्हणजे एकाच प्रकारच्या कुंडलीचें फळ भिन्न देशांतल्या माणसांना भिन्न प्रकारचें व कमी अधिक प्रमाणाचें मिळतें हा पृथ्वीचा गुण होय.

ग्रहांचा मनुष्याशीं संबंध आहे हें ज्याला म्हणून जातकशास्त्राची थोडी तरी माहिती आहे त्याला पक्केपणीं कळून चुकलें आहे. जातकशास्त्र पूर्णावस्थेस पोंचलेलें नाहीं, त्यांत पुष्कळ दोष आहेत, निरनिराळ्या ग्रंथकारांच्या मतें निरनिराळीं फळें सांगण्यांत येतात, वगैरे मोठी बहुतेकांस माहीत आहेत; आणि त्यामुळें कांहींजणांची या शास्त्रावर बिलकूल श्रद्धा

नाहीं. परंतु हें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, जातकशास्त्र पूर्णावस्थेस गेलें नसलें तरी त्यामध्यें ज्या अर्थी कांहीं तरी तथ्य असल्याचें आपल्या प्रत्ययास येत आहे त्या अर्थी हा विषय 'शास्त्र' या संज्ञेला पात्र आहे. शास्त्र पूर्णावस्थेला नेण्याचें काम आपलेंच आहे. पूर्णावस्थेला गेलेलें असें कोणतेंहि शास्त्र नाहीं. जी माहिती आपणांस उपलब्ध आहे तिच्यापैकीं प्रत्ययाला येणारी माहिती आधार घेऊन मनुष्यानें पुढें प्रगति केली पाहिजे.

कोणी असा प्रश्न करतात कीं, जातकशास्त्र जर खरें मानलें तर आपल्या सर्व आयुष्याचा क्रम आपण जन्माला येण्याच्या पूर्वींच आंखलेला असतो असें ओघानें प्राप्त होतें; आणि मग आपणांला स्वतःचा पराक्रम कांहींच रहात नाहीं. याला उत्तर एवढेंच कीं, जातकशास्त्र हें कांहीं आयुष्याचा क्रम आंखून देत नाहीं. प्रत्येक मनुष्याचें मागील जन्मांतलें पूर्वसंचित असें कांहीं तरी असतें. त्या संचिताची गोळाबेरीज या जन्मींच्या जन्मकालच्या ग्रहस्थितीवरून लक्षांत येते. म्हणजे ज्याची जन्मकालची ग्रहस्थिति चांगल्या प्रकारची असेल त्यानें आपलें पूर्वसंचित चांगल्या प्रकारचें आहे असें जाणावें; आणि ज्याची जन्मकालची ग्रहस्थिति वाईट प्रकारची असेल त्यानें आपलें पूर्वसंचितहि वाईट असलें पाहिजे असें समजावें. मनुष्याला एका जन्मामधून दुसरा जन्म देतांना परमेश्वर मागच्या जन्माचे दरवाजे बंद करीत असतो; म्हणजे मागच्या जन्मांतली स्मृति या जन्मीं देत नाहीं. आपलें मागील जन्माचें कर्म कसें असावें याची कल्पना चालू जन्मांतल्या ग्रहस्थितीवरून ठोकळ मानानें जाणतां यावी अशी ईश्वरी योजना दिसते. शिवाय, जन्मकाळी संसारांतली परिस्थिति आणि आकाशस्थ ग्रहांची परिस्थिति यांमध्येंहि बरीच तफावत असल्याचें दरेक वेळीं आपल्या नजरेस येतें. म्हणजे संपन्न स्थितींत जन्म असून ग्रहांची स्थिति विपन्न असते; आणि विपन्न स्थितींत जन्म असून ग्रहांची स्थिति संपन्न असते. याचा उलगडा माझ्या मतें असा होतो कीं, संपन्न स्थितींत जन्म असून ग्रहस्थिति विपन्न असेल तर आपलें पूर्वसंचित बहुतेक खर्च झालें आहे आणि या जन्मीं जर त्याहूनहि वरून सामर्थ्य भर घातली तर आपण वरच्या पायरीला जाऊं असें मनुष्यानें ओळखावें. तसेंच विपन्न स्थितींत जन्म असून ग्रहस्थिति

संपन्न असेल तर आपलें पूर्वसंचित चांगलें आहे, कांहीं पापकृत्याचे योगानें सध्यां ही अवस्था प्राप्त झाली आहे आणि आपण पूर्वसंचितामध्यें भर घातल्यास आपणांस लवकर श्रेष्ठ अवस्था प्राप्त होईल असें समजावें. असो. यावरून जातकशास्त्राचा उद्देश मनुष्यास निरुद्योगी बनविण्याचा नाहीं, उद्योगी बनविण्याचा आहे हें समजून येईल.

जातकशास्त्रावर संस्कृत भाषेंत वरेच ग्रंथ आहेत. तथापि या शास्त्राचा नवीन अभ्यास करणाराला हे ग्रंथ एकदम समजणें कठिण जातें. करितां सर्व ग्रंथांमधून निवडक माहिती गोळा करून या पुस्तकामध्यें संग्रहीत केली आहे. नवीन शिकणाराचा जेणेंकरून सुलभ रीतीनें या शास्त्रामध्यें प्रवेश होईल अशी या पुस्तकाची रचना केली आहे. यांतील विषयरचना सुलभ रीतीनें केलेली असल्यामुळें ज्योतिष्याच्या मदतीवांचून देखील हें पुस्तक कोणालाहि समजण्यासारखें आहे.

हें पुस्तक तयार करतांना बृहज्जातक, सारावली, जातकपारिजात व स्त्रीजातक हे संस्कृत ग्रंथ, आणि ग्रहलाघयोग, ज्योतिर्माला, ज्योतिर्बोध, व्यवहारज्योतिष, ज्योतिषात्मक श्रीकृष्णमाहात्म्य आणि जातकमकरंद हे मराठी ग्रंथ यांचा आम्हांस पुष्कळ उपयोग झाला. यावद्दल आम्हीं त्यांच्या कर्त्यांचे मनःपूर्वक आभार मानतों.

**जातकबोध** लोकप्रिय झाल्यास विशेष माहितीनें भरलेला असा त्याचा दुसरा खंड प्रसिद्ध करण्यास आम्हांला उत्तेजन येईल हें निराळें सांगण्यास नको. या दुसऱ्या खंडामध्यें गणिताची माहिती देऊन सूक्ष्म फलांचीहि माहिती देणार आहों.

प्रस्तुत पुस्तकामध्यें कोणास कांहीं दोष आढळल्यास ते त्यांनीं आमचेकडे लिहून कळवावे अशी आम्ही येथें सर्वांस जाहीर विनंती करतों. म्हणजे दुसऱ्या आवृत्तीचे प्रसंगीं त्यांचा योग्य विचार करूं. शेवटीं जातकशास्त्राचे भोक्ते या पुस्तकाचा हंसक्षीरन्यायानें स्वीकार करतील अशी आशा प्रगट केल्यावांचून आमच्यानें रहावत नाहीं.

पुणें,
ता. १ फेब्रुवारी १९१२.

**हरि रघुनाथ भागवत.**

# दुसऱ्या आवृत्तीची प्रस्तावना.

---

जातकबोधाची पहिली आवृत्ति १९१७ सालीं संपली. त्यानंतर गेलीं चार पांच वर्षे पुस्तकाला मागणी असून विकीला प्रती शिल्लक नव्हत्या. अलीकडे तर मागणी फार येऊं लागली त्यामुळें या पुस्तकाची दुसरी आवृत्ति छापण्याचें ठरविलें. ही आवृत्ति हुबेहूब पहिल्या आवृत्तीप्रमाणें छापली आहे. राशिफला-संबंधानें एका पुस्तकांत कांहीं माहिती वाचण्यांत आली व ती अनुभवशीर ज्योतिष्यानें लिहिलेली दिसली. तिचा या पुस्तकाचे अखेरीस पुरवणीरूपानें समावेश केला. पहिल्या आवृत्तीच्या प्रती इतक्या दुर्मिळ झाल्या कीं पुनः छापण्यास प्रत देखील मिळेना. मीं एक प्रत राखून ठेवली होती ती एका ओळखीच्या गृहस्थांनीं वाचावयास नेली ती परत मिळाली नाहीं. दुसरी एक प्रत मजजवळ होती पण तिच्यांत कांहीं पानें कमी होतीं. अखेरीस माझे मित्र इसलामपूरचे रा. वासुदेव दामोदर मुंडले यांनीं आपल्या संग्रहीं असलेली प्रत पाठवून दिली. याबद्दल रा. मुंडले यांचा मी आभारी आहे.

जातकबोधाची मांडणी जुन्या पुस्तकांवरून केलेली आहे. मी स्वतः कुंडल्या पाहून यांतील माहितीची तपशीलवार छाननी केलेली नाहीं. तशी करावयास पाहिजे व येणाऱ्या अनुभवावरून कांहीं ठोकताळे बसविले पाहिजेत. पण हें काम मजपेक्षां ज्यांच्या वांट्यास अधिक फुरसत असेल त्यांनीं करावयाचें आहे. असो. जातकबोधांतील स्थूल उल्लेखांवरून कोणी मनुष्य दुसऱ्याच्या कुंडलीतील फळें बराबर सांगूं लागला तर ती चूक होईल. जातकबोध धंदेवाईक ज्योतिष्यांकरितां लिहिलेला नाहीं. जातकशास्त्र नवीन शिकूं इच्छिणाऱ्या व फलज्योतिषाचा धंदा न करणाऱ्या जिज्ञासू लोकांकरितां आहे. जातकबोधाची पहिली आवृत्ति निघाल्यानंतर माझें लक्ष वेदान्ताकडे वळल्यानें हा विषय मजकडून मागें पडला. याचा दुसरा खंड लिहिण्याची टांचणें मात्र मी मधून मधून करीत असतों, व तो खंड केव्हां तरी लोकांपुढें येण्याचा संभव आहे.

फलज्योतिषावर लोकांचा भरंवसा जसा विलक्षण आहे, तसेच फल-ज्योतिष कुचकामाचें आहे असे कांहीं जणांचे आक्षेपहि कडक आहेत. दोन्ही बाजूंस विद्वान् लोक आहेत. आक्षेप घेणारेच तेवढे विद्वान् असें म्हणतां येत नाहीं. ज्यांना दुर्दैवाचा तडाखा कधीं बसला नाहीं असेच लोक प्रायः आक्षे-पकांमध्यें आहेत. अलीकडे दहा पांच वर्षांत फलज्योतिषावरील प्रमुख आक्षेपक म्हटले म्हणजे रा. चिंतामणराव वैद्य हे होत. यांनी चित्रमय जगता-मध्यें दोन लेख लिहून आपले आक्षेप मांडले होते. सर्वांत मुख्य आक्षेप हा कीं, जर फलज्योतिष खरें, तर मनुष्याला स्वातंत्र्य कांहींच नाहीं असें म्हणावें लागेल. अमुक गोष्ट अमुक वेळीं होणार हें जर ईश्वरानें आगाऊच ठरवून ठेवलें असलें तर माणसानें उद्योग तरी काय म्हणून काय करावयाचा ? अर्थात् फलज्योतिष खोटें मानलें पाहिजे आणि मनुष्याचें स्वातंत्र्य कबूल केलें पाहिजे. यावर मी म्हणूं शकतों कीं, मी मनुष्याच्या स्वातंत्र्याविरुद्ध नाहीं, तथापि मनुष्यप्राणी सर्वतोपरी स्वतंत्र आहे हें म्हणणें चूक आहे. मनुष्य कांहीं बाबतींत तरी परतंत्र आहेच. तो कां परतंत्र आहे याचा उलगडा जेव्हां दुसऱ्या कोणत्याहि कारणानें होऊं शकत नाहीं, तेव्हां कांहीं प्रसंगीं त्याची कुंडली पाहून हा उलगडा लागतो. अमुक ठिकाणीं अमुक ग्रह असेल तर त्या मनुष्याच्या संबंधानें अमुक गोष्ट घडलीच पाहिजे असें कांहीं बाबतींत खात्री-पूर्वक म्हणतां येईल. त्या मनुष्यानें कितीहि जंग जंग पछाडले तरी त्याला अमुक गोष्ट होणें शक्य नाहीं किंवा अमुक टाळतां येणें शक्य नाहीं असें आढळून येतें. मग तो मनुष्य परतंत्र नव्हे काय ? आकाशांतील ग्रहांचा मनुष्याशीं संबंध कां असावा हें एक गूढ आहे. पण तसा कांहीं तरी संबंध आहे यांत शंका नाहीं. मात्र वर जें उदाहरण दिलें तशा प्रकारच्या खात्री-लायक गोष्टी स्थूल असतात, व जमावरील कोणत्याहि ठिकाणच्या माणसांच्या कुंडल्यांसंबंधानें परीक्षा पाहूं लागल्यास प्रत्येक बाबतींत त्या गोष्टी खऱ्या ठरतील अशी खात्री मला देतां येत नाहीं. असो, कांहींहि निश्चित असलें तरी माणसानें आपला उद्योग मात्र सोडूं नये.

वर केलेल्या निश्चित विधानावरून आजकालचे ज्योतिषी जें ज्योतिषशास्त्र म्हणून म्हणतात तें सर्व खरें आहे अशा मताचा मला कोणी समजूं नये. कुंडलीच्या अभावीं नुसत्या नांवावरून कुंडली मांडणें हें माझ्या मतें

थोतांड आहे. राहु व केतु यांना ग्रह मानावे असें मला वाटत नाही. आयुष्या-संबधानें नक्की ज्योतिष सांगतां येईल असेंहि मला वाटत नाहीं. तसेंच बाजार-भावाची तेजीमंदी आम्ही सांगतों म्हणणें हें लोकांच्या डोळ्यांत धूळ फेकणें असें मला वाटतें याचें 'नक्की भविष्य' सांगणारे ज्योतिषी तें कसें सांगतात त्यांचें त्यानाच माहिती किंवा ईश्वराला माहिती! असल्या ज्योतिष्याच्या नादीं लागून सट्टे करणें म्हणजे दिवाळखोरीचा मार्ग समजावा.

साराश, फलज्योतिष काहीं बाबतींत खरें आहे हें जसें निश्चयानें म्हणतां येईल, तसेंच तें काहीं बाबतींत अपुरें आहे असेंहि म्हटलें पाहिजे. एखाद्या पुस्तकांतल्या एखाद्या वाक्यावरून हुरळून जाऊं नये, किंवा हताश होऊं नये नाहींतर वेड लागण्याची पाळी यावयाची! संकटाना न भितां ईश्वरावर निष्ठा ठेवून मनुष्यानें आपला उद्योग चालू वा उद्योग सोडणें ही चूक होय. ग्रह अनिष्ट असतील त्यांची स्तोत्रें म्हणावीं म्हणजे ते संतुष्ट होतील व चित्ताला समाधान वाटून धैर्य येईल. नशीब कसेंहि असो, मनुष्याचें कर्तव्य उद्योग करण्याचें आहे हें कोणी विसरूं नये.

पुणें, ६२० सदाशिव पेठ, तारीख १७ एप्रिल १९२३. } हरि रघुनाथ भागवत.

# अनुक्रमणिका.

॥ श्री ॥

# जातकबोध.

## भाग पहिला.

### सामान्य माहिती.

---

### कोष्टकें.

६० विपळें = १ पळ
६० पळें = १ घटिका.
२ घटिका = १ मुहूर्त.
३॥ मुहूर्त, ७॥ घटिका } = १ प्रहर.
६० घटिका, ३० मुहूर्त, ८ प्रहर, २४ तास } = १ दिवस अथवा अहोरात्र.

---

२ मास = १ ऋतु.
६ मास = १ अयन.
६ ऋतु, २ अयनें } = १ सौरवर्ष (संवत्सर).

---

१५ तिथि = १ पक्ष.
२९॥ दिवस, ३० तिथि, २ पक्ष } = १ चांद्रमास.
३० अथवा ३१ दिवस } = १ सौरमास.
३६० तिथि, ३५४ दिवस } = १ चांद्र वर्ष.
३६५ दिवस, १५ घटिका व २३ पळें } = १ सौरवर्ष.

---

| | |
|---|---|
| ६० विकला = १ कला. | ६० सेकंद = १ मिनिट. |
| ६० कला = १ अंश. | ६० मिनिटें = १ तास. |
| ३० अंश = १ राशि. | २४ मिनिटें = १ घटिका. |
| १२ राशि = १ राशिचक्र. | २४ तास = १ दिवस. |
| १३ $\frac{१}{३}$ अंश = १ नक्षत्र. | ३६५ दिवस, ६ तास, ९ मिनिटें, १० सेकंद } = १ सौर वर्ष. |
| २ $\frac{१}{४}$ नक्षत्रें = १ राशि. | |
| ४ चरण = नक्षत्र. | |
| ३ $\frac{१}{३}$ अंश = नक्षत्राचा चरण. | |

## दिवस अथवा अहोरात्र.

पृथ्वी स्वतःभोंवतीं फिरत असते, त्यामुळें सूर्य पृथ्वीभोंवतीं फिरतो असें दिसतें. पृथ्वीला स्वतःभोंवतीं एक प्रदक्षिणा करण्यास जो काळ लागतो त्याला दिवस अथवा अहोरात्र म्हणतात.

## चांद्रमास.

सूर्य हा तारा असून त्याचे भोंवतीं बुध, शुक्र, पृथ्वी, मंगळ, गुरु आणि शनि हे ग्रह फिरत असतात. चंद्र हा उपग्रह असून तो पृथ्वीभोंवतीं फिरत असतो. चंद्राची पृथ्वीभोंवतीं एक प्रदक्षिणा होण्यास जो काळ लागतो त्याला चांद्रमास म्हणतात. पृथ्वी जर स्थिर असती तर चंद्राची पृथ्वीभोंवतीं एक प्रदक्षिणा होण्यास २७॥ दिवस लागले असते. परंतु चंद्र पृथ्वीभोंवतीं फिरत असतांना पृथ्वी देखील सूर्याभोंवतीं फिरत असते. यामुळें २७॥ दिवसांत पृथ्वी थोडी पुढें जाते. म्हणून चंद्राची प्रदक्षिणा पूर्ण होण्यास २९। दिवस लागतात. या काळाला चांद्रमास म्हणतात. पृथ्वी आणि सूर्य यांच्या मध्यरेषेवर चंद्र आला म्हणजे एक चांद्रमास पूर्ण होऊन दुसऱ्या चांद्रमासाला आरंभ होतो.

## सौरमास.

पृथ्वी सूर्याभोंवती ज्या वृत्तामध्ये फिरते म्हणजे सूर्य पृथ्वीभोंवती आकाशामध्ये ज्या मार्गावरून चाललेसा दिसतो त्या मार्गाला अथवा वृत्ताला क्रांतिवृत्त असें म्हणतात. या क्रांतिवृत्तावर जे निरनिराळे बारा तारकापुंज आहेत त्यांना मेष, वृषभ इत्यादि संज्ञा दिल्या आहेत. याच वृत्तावर जे निरनिराळे २७ तारकापुंज आहेत त्यांना अश्विनी, भरणी इत्यादि संज्ञा दिल्या आहेत. मेषादिकांना राशि असें म्हणतात, अश्विनी इत्यादिकांना नक्षत्रें म्हणतात. एक राशि क्रमण्याला सूर्याला जो काळ लागतो त्याला सौरमास म्हणतात.

## अयन.

संवत्सराचे दाक्षिणायन आणि उत्तरायण असे दोन विभाग आहेत. मकर राशीवर सूर्य आला म्हणजे उत्तरायणाला प्रारंभ होतो आणि कर्क राशीवर सूर्य आला म्हणजे दाक्षिणायनाला प्रारंभ होतो.

## संक्रांति.

सूर्य एक राशि सोडून दुसऱ्या राशीवर गेला म्हणजे सूर्यसंक्रांति म्हणतात. पंचांगामध्ये मेषेऽर्कः, वृषभेऽर्कः वगैरे ज्या दिवशी लिहिलें असतें तो सूर्यसंक्रांतीचा दिवस जाणावा.

## संवत्सर.

सूर्याभोंवती पृथ्वीची एक प्रदक्षिणा पूर्ण होण्यास ३६५ दिवस १५ घटका २३ पळें लागतात. चंद्राच्या पृथ्वीभोंवतीं बारा प्रदक्षिणा होण्यास सुमारें ३५४ दिवस लागतात. याकरितां सुमारें अडीच वर्षांनीं (३२ महिने १६ दिवसांनीं) एक अधिक मास धरून सौर आणि चांद्र संवत्सरांचा आपल्या ज्योतिःशास्त्रज्ञांनी मेळ घातला आहे. चांद्रमासापेक्षां सौरमास मोठा असल्यामुळे प्रत्येक चांद्रमासांत सूर्यसंक्रांति येते असें नाहीं. ज्या चांद्र मासामध्यें सूर्यसंक्रांति येत नाहीं त्या चांद्र-

मासाला अधिकमास म्हणतात. ज्या चांद्रमासामध्यें दोन सूर्यसंक्रांति येतात त्याला क्षयमास म्हणतात. क्षयमास १४१ आणि त्यानंतर १९ वर्षांनीं येतो. चंद्र आणि सूर्य या दोघांच्या गतींचा हा मेळ घातला असल्यानें आपले संवत्सर कधीं चुकत नाहीं.

## नक्षत्रें.

| | | |
|---|---|---|
| १ अश्विनी. | १० मघा. | १९ मूळ. |
| २ भरणी. | ११ पूर्वा. | २० पूर्वाषाढा. |
| ३ कृत्तिका. | १२ उत्तरा. | २१ उत्तराषाढा. |
| ४ रोहिणी. | १३ हस्त. | २२ श्रवण. |
| ५ मृगशीर्ष. | १४ चित्रा. | २३ धनिष्ठा. |
| ६ आर्द्रा. | १५ स्वाती. | २४ शततारका. |
| ७ पुनर्वसु. | १६ विशाखा. | २५ पूर्वाभाद्रपदा. |
| ८ पुष्य. | १७ अनुराधा. | २६ उत्तराभाद्रपदा. |
| ९ आश्लेषा. | १८ ज्येष्ठा. | २७ रेवती. |

## राशी.

| | | | |
|---|---|---|---|
| १ मेष. | ४ कर्क. | ७ तूळ. | १० मकर. |
| २ वृषभ. | ५ सिंह. | ८ वृश्चिक. | ११ कुंभ. |
| ३ मिथुन. | ६ कन्या. | ९ धनु. | १२ मीन. |

## नक्षत्रें आणि राशि.

बारा राशींचीं सत्तावीस नक्षत्रें होतात. म्हणून प्रत्येक राशींचीं २¼ नक्षत्रें झालीं.

वर्तुळाचे ३६० अंश होतात. ६० कलांचा एक अंश होतो व ६० विकलांची एक कला होते. बारा राशीचे ३६० अंश होतात. म्हणून एका राशीचे ३० अंश व एका नक्षत्राचे १३⅓ अंश होतात.

राशींचा व नक्षत्रांचा मेळ येणेंप्रमाणें आहे—

१ मेष=अश्विनी+भरणी+कृत्तिकेचा १ चरण.

२ वृषभ=कृत्तिकेचे ३ चरण+रोहिणी+मृग २ चरण.
३ मिथुन=मृग२ चरण+आर्द्रा+पुनर्वसु ३ चरण.
४ कर्क=पुनर्वसु १ चरण+पुष्य आश्लेषा.
५ सिंह=मघा+पूर्वा+उत्तरा १ चरण.
६ कन्या=उत्तरा ३ चरण+हस्त+चित्रा २ चरण.
७ तूळ=चित्रा २ चरण+स्वाती+विशाखा ३ चरण.
८ वृश्चिक=विशाखा १ चरण+अनुराधा+ज्येष्ठा.
९ धनु=मूळ+पूर्वाषाढा+उत्तराषाढा १ चरण.
१० मकर=उत्तराषाढा ३ चरण+श्रवण+धनिष्ठा २ चरण.
११ कुंभ=धनिष्ठा २ चरण+शततारका+पूर्वाभाद्रपदा ३ चरण.
१२ मीन=पूर्वाभाद्रपदा १ चरण+उत्तराभाद्रपदा+रेवती.

## सौरमास आणि ऋतु.

| राशि. | सौरमास. | दिवस | ऋतु. |
| --- | --- | --- | --- |
| मेष. | मधु | २९ | वसंत. |
| वृषभ | माधव | ३० | |
| मिथुन | शुक्र | ३२ | ग्रीष्म. |
| कर्क | शुचि | ३१ | |
| सिंह | नभ | ३१ | वर्षा. |
| कन्या | नभस्य | ३२ | |
| तूळ | इष | ३० | शरद्. |
| वृश्चिक | ऊर्ज | ३० | |
| धनु | सह | २९ | हेमंत. |
| मकर | सहस्य | ३१ | |
| कुंभ | तप | २९ | शिशिर. |
| मीन | तपस्य | ३० | |

## योग.

चंद्र आणि सूर्य यांच्या गतींची बेरीज ८०० कला म्हणजे १३ अंश २० कला होण्यास जितका काळ लागतो त्याला योग म्हणतात. हे योग २७ आहेत. हे पंचांगामध्यें दिलेले असतात ते असे—

१ विष्कंभ
२ प्रीति.
३ आयुष्मान्
४ सौभाग्य
५ शोभन.
६ अतिगंड
७ सुकर्मा
८ धृति
९ शूल.
१० गंड
११ वृद्धि
१२ ध्रुव
१३ व्याघात
१४ हर्षण.
१५ वज्र
१६ सिद्धि.
१७ व्यतीपात
१८ वरीयान
१९ परिघ.
२० शिव.
२१ सिद्धि.
२२ साध्य
२३ शुभ
२४ शुक्ल
२५ ब्रह्मा.
२६ ऐंद्र.
२७ वधृति.

## इतर योग.

दग्धयोग—रविवार—द्वादशी, सोमवार—एकादशी, मंगळवार—पंचमी, बुधवार—तृतीया, गुरुवार—षष्ठी, शुक्रवार—अष्टमी, शनिवार—नवमी.

यमघंटयोग—रविवार—मघा, सोमवार—विशाखा, मंगळवार—आर्द्रा, बुधवार—मूळ; गुरुवार—कृत्तिका, शुक्रवार—अनुराधा; शनिवार—हस्त.

मृत्युयोग—रविवार—अनुराधा, सोमवार—उत्तराषाढा, मंगळवार—शततारका, बुधवार—अश्विनी; गुरुवार—मृग, शुक्रवार—आश्लेषा; शनिवार—हस्त.

अमृतसिद्धियोग—रविवार—हस्त, सोमवार—मृग अथवा श्रवण, मंगळवार—अश्विनी; बुधवार—अनुराधा, गुरुवार—पुष्य, शुक्रवार—रेवती, शनिवार—रोहिणी.

**द्विपुष्करयोग**—रविवार, मंगळवार अथवा शनिवार यांपैकीं एका दिवशीं द्वितीया, सप्तमी अथवा द्वादशी यांपैकीं तिथि असून द्विपाद[1] नक्षत्रें असेल तर द्विपुष्करयोग होतो.

**त्रिपुष्करयोग**—वरीलप्रमाणें वार व तिथि असून त्रिपाद[2] नक्षत्र असेल तर त्रिपुष्करयोग होतो.

## करण.

सूर्यचंद्रामध्यें ६ अंश अंतर पडण्यास जो काळ लागतो त्याला करण म्हणतात. करण पंचांगामध्यें दिलेले असतात. ते हे—

बव, बालव, कौलव, तैतिल, गर, वणिज, भद्रा किंवा विष्टि किंवा कल्याणी, शकुनी, चतुष्पद, नाग आणि किंस्तुघ्न.

## सायन आणि निरयण.

सायन नक्षत्रें आणि निरयण नक्षत्रें असे नक्षत्रांचे दोन विभाग कल्पून अलीकडे जातकशास्त्रामध्यें दोन मतें निघालीं आहेत. सायन नक्षत्रें आकाशांतील क्रांतिवृत्ताचे २७ विभाग कल्पून सायनवादी ठरवितात. या त्यांच्या नक्षत्रांना प्रत्यक्ष नक्षत्रांची जरूर लागत नाहीं. वास्तविक नक्षत्र म्हणजे ज्या ठिकाणीं त्या नक्षत्राच्या तारका असतील तेंच समजणें रास्त आहे. विभागात्मक नक्षत्रें केलीं म्हणजे तारकांची जरूर नसते. नक्षत्रांचें जें कांहीं जातकशास्त्रामध्यें फळ येतें तें त्या नक्षत्राच्या तारकांच्या गुणामुळें येतें; आकाशांतील केवळ निर्नक्षत्र अथवा अन्यनक्षत्र विभागापासून कसें येणार ? विभागात्मक नक्षत्रें जर ग्राह्य समजावयाचीं तर रवि[3], चंद्र,

१ ज्या नक्षत्रांच्या दोन पादांनीं राशि पूर्ण होतो तीं द्विपद नक्षत्रें होत. म्हणजे मृग, चित्रा आणि धनिष्ठा हीं द्विपाद नक्षत्रें जाणावीं. पृष्ठ ५ पहा,

२ ज्या नक्षत्रांच्या तीन पादांनीं राशि पूर्ण होतो तीं त्रिपाद नक्षत्रें होत. म्हणजे पुनर्वसु, विशाखा आणि पूर्वाभाद्रपदा हीं त्रिपाद नक्षत्रें जाणावीं. पृष्ठ ५ पहा.

३ रवि हा तारा आहे आणि चंद्र हा उपग्रह आहे. परंतु जातकशास्त्रांत यांना ग्रहच मानतात.

मंगळ इत्यादि ग्रहांऐवजीं दुसरे विभागात्मक सोईस्कर ग्रह कां घेऊं नयेत? जातकशास्त्र हें आकाशाच्या विभागांवर अवलंबून नसून ग्रहांवर आणि तारकांवर अवलंबून आहे. सारांश, जातकशास्त्राला सायन पद्धति ग्राह्य मानणें चुकीचें असून निरयण पद्धतिच ग्राह्य मानली पाहिजे. सांप्रतचीं पचांगें निरयण पद्धतीचीं आहेत. पण त्यामध्यें सूक्ष्म गणित केलेलें नसतें. याकरितां सूक्ष्मनिरयण पंचांग म्हणजे केरोपंती पचांग उपयोगांत आणावें.

---

# भाग दुसरा.

## ग्रह.

### सामान्य माहिती.

जातकशास्त्रामध्यें रवि, चंद्र, मंगळ, बुध, गुरु, शुक्र, शनि, राहु आणि केतु असे नऊ ग्रह समजतात. यापैकीं राहु आणि केतु हे दोन खरे ग्रह नसून पृथ्वी व सूर्य यांच्या मध्यरेषेवरून चंद्र जात असतां जे छेदनबिंदु होतात त्यांना राहु व केतु अशा संज्ञा आहेत. कांहीं प्राचीन ग्रंथांमध्यें राहु व केतु हे ग्रह मानीत नाहींत. सातच ग्रह मानतात.

रवि आणि चंद्र या दोन ग्रहांची गति नियमित असते. मंगळ, बुध, गुरु, शुक्र आणि शनि यांचे गतीचें प्रमाण कमी जास्ती होत असून ते मधून मधून कुबस्तंभ, अस्तंगत, वक्री, मार्गी, अतिचारी वगैरे होतात. राहु आणि केतु हे ग्रह नेहमीं वक्री असतात, म्हणजे त्यांची गति नेहमीं उलटी असते.

शुभ आणि पापग्रह---चंद्र, बुध, गुरु व शुक्र हे शुभग्रह आहेत. क्षीण चंद्र, रवि, मंगळ, शनि, राहु व केतु हे पापग्रह आहेत. बुध हा पापग्रहासहवर्तमान असेल तेव्हां पापग्रह व शुभ-ग्रहासहवर्तमान असेल तेव्हां शुभ ग्रह होय. बुध रवीनें युक्त असतां रवीचें फळ देतो. शुभग्रहांमध्यें बुध, गुरु व शुक्र हे अत्यंत शुभफलदायक आहेत. पापग्रहांमध्यें मंगळ आणि रवि हे क्रूर ग्रह आहेत.

काळपुरुषाचा रवि हा आत्मा, चंद्र हें मन, मंगळ हें सामर्थ्य, बुध ही वाचा, गुरु हें सौख्य व ज्ञान यांचें सार, शुक्र हें स्त्रीसुख आणि शनि हें दुःख आहे.

ग्रहांचे गुणः—रवि, चंद्र व गुरु हे सत्वगुणी, बुध व शुक्र रजोगुणी; आणि मंगळ व शनि तमोगुणी.

रवि, मंगळ व गुरु हे पुरुषग्रह; चंद्र व शुक्र स्त्रीग्रह; आणि बुध व शनि नपुंसकग्रह.

पृथ्वी, अप्, तेज, वायु व आकाश या पंचमहातत्वांचे बुध, शुक्र, गुरु, शनि व गुरु हे अनुक्रमें अधिपति आहेत.

ग्रहांचे वर्ण—सूर्य अत्यंत तांबडा, चंद्र गोरा, मंगळ फिकट तांबडा, बुध हिरवा, गुरु पिंवळसर गोरा, शुक्र गोरा, शनि काळा, राहु काळा आणि केतु मिश्र रंगाचा हे ग्रहांचे वर्ण जाणावे.

चंद्राचें बल—शुक्ल प्रतिपदेपासून दशमीपर्यंत १० दिवस चंद्र मध्यम बलि असतो व उत्तरोत्तर त्याचें बल वृद्धिंगत होत असतें. शुक्ल दशमीपासून वद्य पंचमीपर्यंत १० दिवस चंद्र पूर्ण बली असतो. वद्य पंचमीपासून अमावास्येपर्यंत चंद्र हीन बली असतो. या चंद्राला क्षीणचंद्र म्हणतात. क्षीण चंद्रावर शुभ ग्रहाची दृष्टि असेल तर तो शुभ फल देतो.

## सूर्य.

स्वरूप— पिंवळे डोळे, थोडा काणा, स्वच्छ, निर्मळ, शरीर रोड नसणें, विशेष उंच नाहीं व विशेष ठेंगणा नाहीं, बांधेसूद, थोडे केंस, पित्त प्रकृति, वर्ण काळसर लाल, जात क्षत्रिय. सत्वगुणी, पुरुषग्रह, पापग्रह, सर्वकाळ शूर, पूर्वदिशेचा स्वामी, तांब्याच्या पदार्थांचा मालक, अस्थि अधिक.

सूर्य हा कालपुरुषाचा आत्मा आहे. हा राजा आहे. हा जन्मकाळीं बलिष्ठ असेल तर जन्मलेल्या पुरुषास राज्यकारभारांत पुष्कळ महत्व देतो. पण हा उपचयस्थानीं म्हणजे ३ । ६ । १० । ११ या स्थानीं असला पाहिजे. अनुपचयस्थानीं म्हणजे १।२।४।५।७

८।९।१२ या स्थानीं असून बलहीन असेल तर पुष्कळ गोष्टींमध्ये नुकसान करतो.

### चंद्र.

**स्वरूप**—वर्ण गोरा, वायव्य दिशेचा स्वामी, सत्वगुणी, स्त्रीग्रह, जलाचा अधिपति, शरीर वाटोळें, मजबूत, अंग रोडकें, नाजूक परंतु वातयुक्त शरीर, कफप्रकृति, बुद्धिमान्, कोमलभाषणी, नेत्र चांगले, सर्दी व शिरा पुष्कळ.

चंद्र हा कालपुरुषाचें मन होय. चंद्र हा देखील राजा आहे. चंद्र जन्मकालीं उपचयस्थानीं बलिष्ट असला तर राज्यकार्यसाधक होतो व इतर स्थानीं बलिष्ट असला तर नाश करतो.

### मंगळ.

**स्वरूप**—वर्ण पांढरसर तांबडा, अति उंच नाहीं व अति ठेंगणा नाहीं, तांबड्या पदार्थांचा मालक, दक्षिण दिशेचा स्वामी, क्रूर ग्रह, पुरुषग्रह, क्षत्रिय, तमोगुणी, क्रूर दृष्टि, तरुण मूर्ति, उदार, पित्तप्रकृति, चंचलस्वभावी, चपळ, कृशोदर, प्रतापी, कामी, रक्त व धातु पुष्कळ.

मंगळ हा सेनापति होय. उपचयस्थानीं बलिष्ट असेल तर पुष्कळ कार्यांचा साधक होतो. उपचयस्थानीं नसून बलिष्टहि नसेल तर फार नाश करतो. जन्मकुंडलीमध्यें मंगळ सर्वांत बलवान् असेल तर त्या पुरुषाचा वर्ण मंगळासारखा म्हणजे लाल असतो.

### बुध.

**स्वरूप**—वर्ण दूर्वांप्रमाणें हिरवा, उत्तर दिशेचा स्वामी, शुभग्रह परंतु दुष्ट ग्रहासह असल्यास दुष्ट, नपुंसक ग्रह, वैश्य जात, रजोगुणी, हास्यमुख, गदगदां हंसून भाषण करणारा, स्पष्टवक्ता, कृश, विद्वान्, बुद्धिमान्, ऐश्वर्यवान्, वात पित्त व कफ यांनीं मिश्रित प्रकृति, त्वचा अधिक.

बुध हा काळपुरुषाची वाचा होय. हा राजपुत्र आहे.. बुध जर उपचयस्थानीं असून बलिष्ठ असेल तर राज्यसाधक होतो, नसेल तर नाश करतो.

## गुरु.

स्वरूप—वर्ण गोरा, स्थूळ शरीर, पोट मोठें, नेत्र व केंस पिंगट, काणा, श्रेष्ठबुद्धि, अति बुद्धिमान, कफप्रकृति, मज्जा अधिक, ईशान्य दिशेचा मालक, सर्वकाळ शुभ ग्रह, पुरुषग्रह, ब्राह्मण, सत्वगुणी, मंत्री, पिंवळ्या पदार्थांचा मालक, पिंवळा, राजचिन्हांकित, सर्वशास्त्राधिकारी.

गुरु हा काळपुरुषाचें ज्ञान व बुद्धि होय.

## शुक्र.

स्वरूप—वर्ण पांढरा, अनेक वर्णांचे पदार्थांचा मालक, आग्नेयी दिशेचा स्वामी, सर्वकाळ शुभ ग्रह, स्त्रीग्रह जलाचा स्वामी, ब्राह्मण, रजोगुणी, कामी, सर्वकाळ सुखाची इच्छा करणारा, सुंदर शरीर, सुंदर नेत्र, सौम्य दृष्टि, श्लेष्मायुक्त, वायुप्रकृति, काळे व कुरळे केंस, रेत अतिशय.

शुक्र हा काळपुरुषाचा मदन होय. हा मंत्री आहे.

## शनि.

स्वरूप—वर्ण काळा, काळ्या वर्णाचे पदार्थांचा मालक, पश्चिम दिशेचा स्वामी, सर्वकाळ क्रूर ग्रह, नपुंसक ग्रह, जात अत्यंज, तमोगुणी, आळशी, काणा, पिंगट डोळे, रोडका, उंच, दांत मोठे, करडे केंस, वातप्रकृति, सर्व शरीरभर शिरा.

शनि हा काळपुरुषाचें दुःख होय.

## राहु व केतु.

राहु व केतु हे छेदनबिंदु आहेत. प्राचीन ग्रंथांत यांची ग्रहांमध्यें गणना केलेली नाहीं.

## ग्रहांचें बळ.

चंद्र, मंगळ, शनि हे रात्री बलवान् असतात, व बाकीचे ग्रह दिवसास बलवान् असतात. शुभग्रह शुक्लपक्षांत व पापग्रह कृष्ण-पक्षांत बलवान् असतात. बुध सर्वकाळ बलवान् असतो.

मंगळ, बुध, गुरु, शुक्र व शनि हे ग्रह युतिकाळीं म्हणजे दुसऱ्या ग्रहाशीं संयुक्त असतांना, वक्री असताना व चंद्राशीं संयुक्त असताना बलवान् असतात. सूर्य व चंद्र उत्तरायणामध्यें बलवान् असतात.

---

## भाग तिसरा.

### राशि.

-:-

राशींचें स्वरूपः— मेष—मेंढा, वृषभ—बैल, मिथुन—वीणा घेतलेलें व हास्यमुख असें जोडपें, कर्क—खेंकडा, सिंह—सिंह, कन्या—धान्य व अग्नि घेऊन नौकेंत बसलेली कन्या, तूळ—तागडी घेतलेला पुरुष, वृश्चिक—विंचू, धनु—कटिप्रदेशापासून अश्वाकृति असा धनुर्धारी पुरुष, मकर—मृगासारखें मुख असलेला मगर, कुंभ—हातामध्यें कुंभ घेतलेला पुरुष, मीन—दोन उलटसुलट मासे.

### कालपुरुषाचे अवयव.

मेष—शिर, वृषभ—मुख, मिथुन—वक्षःस्थल, कर्क—हृदय, सिंह—कुक्षि उदर, कन्या—कटी, तूळ—ओटीपोट, वृश्चिक—गुद, धनु—मांड्या, मकर—गुडघे, कुंभ—पोटऱ्या, मीन—पाय.

### राशींचें निवासस्थान.

मेष—धातूंच्या व रत्नांच्या खाणी. वृषभ—पर्वताचें शिखर, शेत गाई व बैल यांची अरण्यें. मिथुन—रतिविहारस्थान. कर्क—विहिरी, तळीं व वाळवंटाच्या जमीनी. सिंह—मोठमोठाले पर्वत, गुहा व अरण्यें. कन्या—कोमलतृणाच्छादित हिरवागार देश. तूळ—पुष्पकारक नगरें व बाजार. वृश्चिक—दगडाळ जमीन व विषारी जनावरांचीं बिळें. धनु—घोडे, रथ व हत्ती यांच्या जागा. मकर—नद्या व जंगल अरण्यें. कुंभ—पाण्यानें भरलेली भांडी व आबदारखाना. मीन—नद्या व समुद्र वगैरे जलाशय.

## राशींच्या दिशा.

मेष, सिंह. धनु यांची पूर्व दिशा. वृषभ, कन्या, मकर यांची दक्षिण दिशा. मिथुन, तूळ, कुंभ यांची पश्चिम दिशा. कर्क, वृश्चिक, मीन यांची उत्तर दिशा.

## राशींचे स्वभाव.

मेष, मिथुन, सिंह, तूळ, धनु, कुंभ हे क्रूर राशि. वृषभ, कर्क, कन्या, वृश्चिक, मकर, मीन हे सौम्य राशि.

## राशींच्या अवस्था.

मेष, कर्क, तूळ. मकर हे चर ( चंचल ) राशि. वृषभ, सिंह, वृश्चिक, कुंभ हे स्थिर ( शांत ) राशि. मिथुन, कन्या, धनु, मीन हे द्विस्वभाव ( चंचल व शांत ) राशि.

## राशींचें बलाबल.

सिंह, कन्या, तूळ, वृश्चिक, कुंभ, मीन हे राशि दिवसास बलवान् असतात. मेष, वृषभ, मिथुन, कर्क, धनु, मकर हे राशि रात्रीं बल-वान् असतात.

## राशींचें स्थानबल.

मिथुन, कन्या, तूळ, धनुराशीचा पूर्वार्ध व कुंभ हे राशि लग्नीं बलवान् असतात. कर्क, मकरराशीचा उत्तरार्ध आणि मीन हे राशि चतुर्थस्थानीं बलवान् असतात. वृश्चिक राशि सप्तमस्थानीं बलवान् असतो. मेष, वृषभ, सिंह, धनुराशीचा उत्तरार्ध आणि मकर-राशीचा पूर्वार्ध दशमस्थानीं बलवान् असतात.

## राशींचे रंग.

मेष—तांबडा. वृषभ—गोरा. मिथुन—पोपटी. कर्क—पांढरसर तांबडा. सिंह—शेंदुरवर्ण. कन्या—चित्रवर्ण. तूळ—निळा. वृश्चिक—सोनेरी. धनु—पिंगट. मकर—कबरा. कुंभ—मुंगुसवर्ण. मीन—फिकट पांढरा.

## राशींचे स्वामी.

मेष व वृश्चिक राशींचा स्वामी मंगळ. वृषभ व तूळ राशींचा स्वामी शुक्र. मिथुन व कन्या राशींचा स्वामी बुध. कर्क राशीचा स्वामी चंद्र. सिंह राशीचा स्वामी सूर्य. धनु व मीन राशींचा स्वामी गुरु. मकर व कुंभ राशींचा स्वामी शनि. या राशींनाच त्या त्या ग्रहांचीं स्वगृहें म्हणतात. म्हणजे मंगळाचीं स्वगृहें मेष व वृश्चिक. राहूचें स्वगृह कन्या व केतूचें स्वगृह मीन मानतात.

# भाग चवथा.

## कुंडली.

### द्वादश स्थानें.

एखाद्या मनुष्याची कुंडली म्हणजे त्या मनुष्याच्या जन्मकाळच्या ग्रहस्थितीचा नकाशा होय. आकाशामध्यें क्रांतिवृत्ताचे बारा विभाग कल्पून त्यांना मेषादि राशींचीं नांवें दिलेलीं आहेत. प्रत्येक राशीला एकेक स्थान याप्रमाणें कुंडलीमध्यें बारा स्थानें असतात. पहिल्या स्थानाला लग्न अशी संज्ञा आहे. जन्मकाळीं पूर्वेकडे क्षितिजावर जो राशि उदित असेल तो लग्नस्थानीं मांडतात. या बारा स्थानांवर ज्या गोष्टींचा विचार करतात त्या गोष्टींवरून त्यांना तनु, धन इत्यादि नांवें देण्यांत आलेलीं आहेत. तीं स्थानें अशीं—

जन्मकाळीं पूर्व क्षितिजावर जो राशि उदित असेल तो तनुस्थानीं येईल; पश्चिम क्षितिजीं असेल तो जायास्थानीं येईल. पूर्वेपासून पश्चिमेपर्यंत दृश्य गोलार्धामध्यें जे राशि असतील ते अनुक्रमें व्यय, आय, कर्म, धर्म, मृत्यु या स्थानीं येतील. अदृश्य गोलार्धामध्यें म्हणजे पाताळीं जे राशि असतील ते अनुक्रमें धन, सहज, सुहृत्, सुत, रिपु या स्थानीं येतील. कुंडलीमध्यें या बारा स्थानीं जे आंकडे मांडलेले असतात ते अनुक्रमें मेषादि राशींचे असतात. म्हणजे लग्नीं ४ हा आंकडा असेल तर त्या ठिकाणीं कर्क राशि

आहे असें समजावें. याप्रमाणेंच इतर स्थानीं असलेल्या राशींसंबंधानें जाणावें.

## राशि.

कुंडलीमध्यें ज्या राशीवर चंद्र असेल ती त्या मनुष्याची रास असें म्हणतात. म्हणजे ५ व्या आंकड्याच्या अथवा सिंह राशीच्या स्थानीं एखाद्याच्या जन्मकुंडलीमध्यें चंद्र असला म्हणजे त्याची रास सिंह जाणावी.

## स्थानांच्या विशेष संज्ञा.

केंद्र—कुंडलींतील १।४।७।१० या स्थानांस केंद्र म्हणतात.

त्रिकोण—५।९ या स्थानांस त्रिकोण म्हणतात.

त्रित्रिकोण—९ व्या स्थानाला त्रित्रिकोण म्हणतात.

उपचयस्थानें—३।६।१०।११ या स्थानांस उपचयस्थानें म्हणतात. याव्यतिरिक्त स्थानांस अनुपचयस्थानें म्हणतात.

त्रिक—६।८।१२ या स्थानांस त्रिक म्हणतात. त्रिक स्थानें अशुभ जाणावीं.

कंटक—१।४।७।१० या स्थानांस कंटक म्हणतात.

पणफर—केंद्रांपासून दुसरीं म्हणजे २।५।८।११ या स्थानांस पणफर म्हणतात.

आपोक्लीम—केंद्रांपासून तिसरीं म्हणजे ३।६।९।१२ या स्थानांस आपोक्लीम म्हणतात.

मारक—२।७ या स्थानांस मारक म्हणतात.

चतुरस्र—४।८ या स्थानांस चतुरस्र म्हणतात.

## ग्रहांचीं उच्च व नीचें.

| ग्रह. | उच्च. | नीच. |
| --- | --- | --- |
| रवि | मेष | तूळ |
| चंद्र | वृषभ | वृश्चिक |

| | | |
|---|---|---|
| मंगळ | मकर | कर्क |
| बुध | कन्या | मीन |
| गुरु | कर्क | मकर |
| शुक्र | मीन | कन्या |
| शनि | तूळ | मेष |
| राहु | मिथुन | धनु |
| केतु | धनु | मिथुन |

रवि मेष राशीमध्यें असला म्हणजे उच्च समजावा; तूळ राशीमध्यें असला म्हणजे नीच समजावा. याप्रमाणें इतर ग्रहांसंबंधानें जाणावें. ग्रह उच्च असतां चांगलें फळ देतात, नीच असतां वाईट फळ देतात.

## ग्रहांचे परम उच्चांश व परम नीचांश.

रवि १०, चंद्र ३, मंगळ २८, बुध १५, गुरु ५, शुक्र २७ आणि शनि २० याप्रमाणें ग्रहांचे परम उच्चांश व परम नीचांश जाणावे. म्हणजे रवि मेष राशीच्या १० अंशांत असला म्हणजे परम उच्च समजावा व तूळ राशीच्या १० अंशांत असला म्हणजे परम नीच समजावा. याप्रमाणें इतर ग्रहांसंबंधानें जाणावें. ग्रह परम उच्च असतां अत्यंत चांगलें फळ देतात आणि परम नीच असतां अत्यंत वाईट फळ देतात.

## ग्रहांचीं मूलत्रिकोणस्थानें.

रवीचें सिंह, चंद्राचें वृषभ, मंगळाचें मेष, बुधाचें कन्या, गुरूचें धनु, शुक्राचें तूळ आणि शनीचें कुंभ याप्रमाणें ग्रहांचीं मूलत्रिकोणस्थनें समजावीं.

## ग्रहांचीं स्वगृहें.

मागें राशीचे स्वामी सांगितले आहेत, तीं तीं त्या ग्रहाचीं स्वगृहें जाणावीं. म्हणजे

सिंह राशीमध्यें रवि असला म्हणजे तो स्वगृहीं आहे असें म्हणतात.

कर्क राशीमध्यें चंद्र असला म्हणजे तो स्वगृहीं आहे असें म्हणतात.

मेष अथवा वृश्चिक राशीमध्यें मंगळ असला म्हणजे तो स्वगृहीं आहे असें म्हणतात.

मिथुन अथवा कन्या राशीमध्यें बुध असला म्हणजे तो स्वगृहीं आहे असें म्हणतात.

धनु अथवा मीन राशीमध्यें गुरु असला म्हणजे तो स्वगृहीं आहे असें म्हणतात.

वृषभ अथवा तूळ राशीमध्यें शुक्र असला म्हणजे तो स्वगृहीं आहे असें म्हणतात.

मकर अथवा कुंभ राशीमध्यें शनि असला म्हणजे तो स्वगृहीं आहे असें म्हणतात.

कन्या राशीमध्यें राहु असला म्हणजे तो स्वगृहीं आहे असें म्हणतात.

मीन राशीमध्यें केतु असला म्हणजे तो स्वगृहीं आहे असें म्हणतात.

## ग्रहांचीं स्वगृहें ध्यानांत ठेवण्याची सोपी रीत.

सूर्याभोंवतीं वाकीचे ग्रह फिरत असतात. या ग्रहांमध्यें बुध सूर्याच्या जवळ आहे. बुधापेक्षां शुक्र सूर्यापासून दूर आहे. शुक्रापेक्षां मंगळ दूर आहे. मंगळापेक्षां गुरु दूर आहे. गुरूपेक्षां शनि दूर आहे. यांपैकीं मंगळापासून आरंभ करून पुढें लिहिल्याप्रमाणें ग्रह मांडावे म्हणजे ते मेष, वृषभ आदिकरून राशींचे क्रमानें अधिपति होतात. म्हणजे ते राशि त्या ग्रहांचीं स्वगृहें होतात. बुध आणि रवि यांच्यामध्यें एक चंद्र मात्र जास्त मांडावा लागतो. जसें—

| मंगळ | शुक्र | बुध | चंद्र | रवि | बुध | शुक्र | मंगळ |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| गुरु | शनि | शनि | गुरु | | | | |
| ९ | १० | ११ | १२ | | | | |

### तात्कालिक मित्रत्व.

ग्रह परस्परांच्या द्वितीय, द्वादशस्थानीं; तृतीय, एकादश स्थानीं; आणि चतुर्थ, दशमस्थानीं असतील तेव्हां ते तेवढ्या वेळेपुरते एकमेकांचे तात्कालिक मित्र होतात.

## ग्रहांची नैसर्गिक मैत्री.

| ग्रह | मित्र | शत्रु | सम (उदासीन) |
|---|---|---|---|
| रवि | चंद्र, मंगळ, गुरु | शनि, शुक्र | बुध |
| चंद्र | रवि, बुध | ० | मंगळ, गुरु, शुक्र, शनि |
| मंगळ | रवि, चंद्र, गुरु | बुध | शुक्र, शनि |
| बुध | रवि, शुक्र | चंद्र | मंगळ, गुरु, शनि |
| गुरु | रवि, चंद्र, मंगळ | बुध, शुक्र | शनि |
| शुक्र | बुध, शनि | रवि, चंद्र | मंगळ, गुरु |
| शनि | शुक्र, बुध | रवि, चंद्र, मंगळ | गुरु |

स्पष्टीकरण—रवि हा चंद्र, मंगळ अथवा गुरु यांच्या गृहीं म्हणजे कर्क, मेष, वृश्चिक, धनु अथवा मीन या राशींवर असेल तर तो मित्रगृहीं आहे असें जाणावें. शनि अथवा शुक्र यांच्या गृहीं म्हणजे मकर, कुंभ, वृषभ अथवा तूळ राशींमध्यें असेल तर तो शत्रुगृहीं आहे असें जाणावें. आणि बुधाच्या गृहीं म्हणजे मिथुन अथवा कन्या राशीवर असेल तर तो उदासीन म्हणजे मित्र नाहीं व शत्रु नाहीं असा आहे असें जाणावें. याप्रमाणें इतर ग्रहांचें मित्रत्व, शत्रुत्व व उदासीनत्व वरील कोष्टकावरून समजावें.

ग्रहोंके बोधक.

| ग्रह | लिंग | स्वगृह | उच्च | नीच | मूल त्रिकोण | उच्चांश व नीचांश | मित्र | शत्रु | सम |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| रवि | पुरुष | सिंह | मेष | तूळ | सिंह | १० | चंद्र, मंगळ, गुरु, | शुक्र, शनि | बुध |
| चंद्र | स्त्री | कर्क | वृषभ | वृश्चिक | वृषभ | ३ | रवि, बुध | ... ... .... | मंगळ, गुरु शुक्र, शनि, |
| मंगळ | पुरुष | मेष, वृश्चिक | मकर | कर्क | मेष | २८ | रवि, चंद्र, गुरु | बुध | शुक्र शनि |
| बुध | नपुंसक | मिथुन कन्या | कन्या | मीन | कन्या | १५ | रवि, शुक्र | चंद्र | मंगळ गुरु शनि |
| गुरु | पुरुष | धनु मीन | कर्क | मकर | धनु | ५ | रवि, चंद्र मंगळ | बुध, शुक्र | शनि |
| शुक्र | स्त्री | वृषभ तूळ | मीन | कन्या | तूळ | २७ | बुध, शनि | रवि, चंद्र | मंगळ, गुरु |
| शनि | नपुंसक | मकर कुंभ | तूळ | मेष | कुंभ | २० | बुध, शुक्र | रवि, चंद्र मंगळ | गुरु |
| राहु | पुरुष | कन्या | मिथुन | धनु | .... | .... | .... | ... | ... |
| केतु | स्त्री | मीन | धनु | मिथुन | ... | .... | ... | ... | .... |

## ग्रहांचे मार्गक्रमणकाल.

रवि—प्रत्येक राशीवर सुमारें एक महिना असतो.
चंद्र—प्रत्येक राशीवर सुमारें २। दिवस असतो.
मंगळ—प्रत्येक राशीवर सुमारें १॥। महिने असतो.
बुध—प्रत्येक राशीवर सुमारें १८ दिवस असतो.
गुरु—प्रत्येक राशीवर सुमारें एक वर्ष असतो.
शुक्र—प्रत्येक राशीवर सुमारें १९ दिवस असतो.
शनि—प्रत्येक राशीवर सुमारें २॥ वर्षे असतो.
राहु व केतु—प्रत्येक राशीवर सुमारें १॥ वर्ष असतात.

रवीपासून शनीपर्यंत सर्व ग्रह मेष राशीवरून वृषभ, वृषभ राशीवरून मिथुन या सरळ क्रमानें फिरत असतात. राहु व केतु हे दोन ग्रह मिथुन राशीवरून वृषभ, वृषभ राशीवरून मेष, मेष राशीवरून मीन अशा उलट्या क्रमानें फिरत असतात.

रवि ज्या राशीवर असेल त्या राशीमध्यें अथवा त्या राशीच्या पुढील एक राशि अथवा मागील एक राशि यांमध्यें बुध नेहमीं असतो.

रवि ज्या राशीवर असेल त्या राशीमध्यें अथवा त्या राशीच्या पुढील दोन राशि अथवा मागील दोन राशि यांमध्यें शुक्र नेहमीं असतो.

राहु आणि केतु हे नेहमीं एकमेकांच्या समोरासमोर असतात.

## उदित ग्रह.

ग्रह आकाशांत सूर्याभोंवतीं फिरत असतांना कधीं कधीं सूर्याच्या मागें गेल्यामुळें आपणांस दिसत नाहीं. सूर्याच्या मागें नसेल तेव्हां आपणांस दिसतो. जेव्हां ग्रह आपणांस दिसतो तेव्हां तो ग्रह उदित आहे असें समजावें.

## अस्तंगत ग्रह.

सूर्याच्या मागें गेल्यामुळें जेव्हां ग्रह आपणांस दिसत नाहीं तेव्हां तो अस्तंगत आहे असें समजावें.

## मार्गी ग्रह.

जेव्हां ग्रह राशीच्या अनुक्रमानें फिरतो तेव्हां तो मार्गी आहे असें म्हणतात.

## वक्री ग्रह.

जेव्हां ग्रह राशींच्या अनुक्रमाच्या उलट फिरतो तेव्हां तो ग्रह वक्री आहे असें म्हणतात.

## स्तंभी ग्रह.

जेव्हां ग्रह एकाच जागेवर कांहीं दिवस मुक्काम करतो तेव्हां तो स्तंभी आहे असें म्हणतात.

ग्रह वास्तविक वक्री अथवा स्तंभी कधीं नसतात. ग्रहांप्रमाणें पृथ्वी देखील सूर्याभोंवती फिरते यामुळें दोन गतींच्या संयोगानें दृष्टीला भ्रम होऊन ते तसे दिसतात.

## ग्रहांच्या दृष्टि.

पूर्ण दृष्टि—सर्व ग्रह आपापल्या स्थानापासून सातव्या स्थानावर पूर्ण दृष्टीनें पहातात.

मंगळ—आपल्या स्थानापासून ४।७।८ या स्थानांवर पूर्ण दृष्टीनें पहातो.

गुरु—आपल्या स्थानापासून ५।७।९ या स्थानांवर पूर्ण दृष्टीनें पहातो.

शनि—आपल्या स्थानापासून ३।७।१० या स्थानांवर पूर्ण दृष्टीनें पहातो.

त्रिपाद दृष्टि—मंगळाशिवाय इतर सर्व ग्रह आपापल्या स्था-

नापासून चवथ्या व आठव्या स्थानावर त्रिपाद म्हणजे तीन चतुर्थांश दृष्टीनें पहातात.

**द्विपाद दृष्टि**—गुरूवांचून इतर सर्व ग्रह आपापल्या स्थानापासून पांचव्या व नवव्या स्थानावर द्विपाद म्हणजे अर्ध दृष्टीनें पहातात.

**एकपाद दृष्टि**—शनीवांचून सर्व ग्रह आपापल्या स्थानापासून तिसऱ्या व दहाव्या स्थानावर एकपाद म्हणजे एक चतुर्थांश दृष्टीनें पहातात.

राहूच्या दृष्टि गुरूच्या दृष्टीप्रमाणें मोजतात.

## ग्रहांचा कारकविचार.

रवि—पित्याचें सुखदुःख, पराक्रम, आरोग्य, शक्ति, संपत्ति, मन, पवित्रता, रुचि, ज्ञानसुख हीं रवीपासून प्राप्त होतात.

चंद्र—आईचें सुखदुःख, मन, बुद्धि, राजकृपा, संपत्ति, यश, कांति, सौंदर्य, सुगंधी पदार्थ, छत्रचामर, हीं चंद्रापासून प्राप्त होतात.

मंगळ—भावंडांचें सुखदुःख, सामर्थ्य, धैर्य, पराक्रम, जय, साहस, युद्ध, सेनापत्य, आयुधें, शत्रु, कीर्ति, गांभीर्य, रोग, दान देणें व घेणें, विद्या, धनुर्विद्या धातुविद्या हीं मंगळापासून प्राप्त होतात.

बुध—बंधुसुख, मातुलसुख, मित्रसुख, विवेक, विद्या, संपत्ति, शांति, बुद्धि, संपत्ति, गणित, ज्योतिष, वेदान्त, लेखन, वक्तृत्व, हीं बुधापासून प्राप्त होतात.

गुरु—संतति, ज्ञान, संपत्ति, उदरनिर्वाह, राज्यपद, वेदान्त, हत्ती, घोडे, पालख्या, मंत्रविद्या, शरीरसौख्य, बुद्धि, राजकारण हीं गुरूपासून प्राप्त होतात.

शुक्र—स्त्री, रतिसुख, अहंकार, विलास, कांति, सौंदर्य, वशीकरण, शृंगारादि रस, ऐंद्रजाल, अष्टसिद्धि, यांत्रिक विद्या, संगीत, साहित्यशास्त्र, वाहनें, व्यापार, हीं शुक्रापासून प्राप्त होतात.

शनि—आयुष्य, मृत्यु, दारिद्र्य, निर्दयत्व, परपीडा, लोभ, मोह, घात, दुष्टबुद्धि, कैद, रोग, जीवन, काळीं धान्यें, मृत्यु हीं शनीपासून प्राप्त होतात.

राहु—आजाचें सुख, भूतबाधा, अरुचि हीं राहूपासून प्राप्त होतात.

केतु—आजीचें ( आईच्या आईचें ) सुख, संधिरोग, कंडू हीं केतूपासून प्राप्त होतात.

तनु–रवि, धन–शुक्र, सहज–मंगळ, सुहृत्–चंद्र व बुध, सुत–गुरु, रिपु–शनि व मंगळ, जाया–शुक्र, मृत्यु–शनि, भाग्य–रवि व गुरु, कर्म–रवि, बुध, गुरु व शनि; आय–शुक्र, व्यय–शनि. याप्रमाणें लग्नापासून द्वादश भावांचे ( म्हणजे स्थानांचे ) ते ते ग्रह कारक आहेत. म्हणजे लग्नादि द्वादश भावांपासून प्राप्त होणारी सुखदुःखें त्या त्या ग्रहांपासून प्राप्त होतात.

## द्वादशभावविचार.

**प्रथम भाव**—कुंडलींतील पहिल्या स्थानाला प्रथम भाव अशी संज्ञा आहे. याला लग्न, तनु, कल्प इत्यादि म्हणतात.

शरीराचा वर्ण, शरीरावरील चिन्हें, आयुष्याचें मान, सुखदुःख, जाति, स्वभाव, शरीर कृश अथवा पुष्ट, शरीराचा आकार, रूप, गुण, चवथी स्त्री, पांचवें अपत्य इत्यादि गोष्टींचा विचार प्रथम भावावरून करतात.

**द्वितीय भाव**—कुंडलींतील दुसऱ्या स्थानाला द्वितीय भाव अशी संज्ञा आहे. याला धन, कुटुंब, मुख इत्यादि म्हणतात.

सुवर्ण, रूप्य ( रूपें ), रत्नें, धातु, धन, मित्र, कुटुंबसुख, पतीच्या कुंडलींत स्त्रीसुख, स्त्रीच्या कुंडलींत पतिसुख, मुख, वाणी, उजवा डोळा, पूर्वार्जित द्रव्य, भोजन, सेवक, विद्या, जात इत्यादि गोष्टींचा विचार द्वितीय भावावरून करतात.

**तृतीय भाव**—कुंडलींतील तिसऱ्या स्थानाला तृतीय भाव अशी संज्ञा आहे. याला सहज, पराक्रम इत्यादि म्हणतात.

भावंडें, सेवक, प्रवास, पितृकार्याचा नाश, साहस, पराक्रम, औषधि, रसायन, मित्र, गळा, छाति, उजवा कान, भक्ष्य (खाण्याचे पदार्थ), पांचवी स्त्री, सहावें अपत्य इत्यादि गोष्टींचा विचार तृतीय भावावरून करतात.

**चतुर्थ भाव**—कुंडलींतील चवथ्या स्थानाला चतुर्थ भाव अशी संज्ञा आहे याला सुहृद, सुख, मातृ, गृह इत्यादि म्हणतात.

बापाचें द्रव्य, ठेवा, वतनवाडी, घरदार, जमीन, बांधववर्ग, आई, उदक, आत्मोन्नति, भोजन (खाण्याचे पदार्थ), वाहन, हृदय, खादा, आसन, शयन, सुख, मित्र, सासरा, विद्या इत्यादि गोष्टींचा विचार चतुर्थ भावावरून करतात.

**पंचमभाव**—कुंडलींतील पांचव्या स्थानाला पंचमभाव अशी संज्ञा आहे. याला सुत, बुद्धि, विद्या, प्रतिभा इत्यादि म्हणतात.

मंत्रविद्या, धन प्राप्त होण्याचा उपाय, गर्भ, विद्या, अपत्यें, पहिलें अपत्य, बुद्धि, दुसऱ्याचें हृदय जाणण्याची विद्या, विचारशक्ति, सहावी स्त्री, भोजन, देणेघेणें, कारस्थानीपणा इत्यादि गोष्टींचा विचार पंचम भावावरून करतात

**षष्ठ भाव**—कुंडलींतील सहाव्या स्थानाला षष्ठभाव अशी संज्ञा आहे. याला रिपु, क्षत इत्यादि म्हणतात.

मातुलपक्ष, रोग, शत्रु, चतुष्पाद प्राणी, बंधन, भीति, व्रण, चोरी, विघ्नें, सांसारिक व शारीरिक क्लेश, नाभि व उदरभाग, पडून, उपदंश रोग, इत्यादि गोष्टींचा विचार षष्ठ भावावरून करतात.

**सप्तम भाव**—कुंडलींतील सातव्या स्थानाला सप्तम भाव अशी संज्ञा आहे. याला जाया, मदन इत्यादि म्हणतात.

दशा असतात. म्हणजे एका ग्रहाची महादशा संपल्यानंतर दुसऱ्या ग्रहाची महादशा सुरू होते. दुसऱ्यानंतर तिसऱ्याची. याप्रमाणे सर्व ग्रहांसंबंधानें जाणावें. प्रत्येक ग्रहाची महादशा चालू असतांना तिच्यामध्यें सर्व ग्रहांच्या अंतर्दशा येत असतात.

**स्पष्टीकरण**—कृत्तिका, उत्तरा आणि उत्तराषाढा या नक्षत्रांचा दशास्वामी रवि आहे. म्हणजे या तीन नक्षत्रांपैकीं कोणत्याही एका नक्षत्रीं जन्मकाळीं चंद्र असेल तर जन्मकाळीं रवीची महादशा आहे असें समजावें. जन्मकाळींच उत्तरा नक्षत्रीं चंद्र आला असेल तर दोन वर्षेपर्यंत रवीची महादशा समजावी. अर्धे नक्षत्र चंद्र भोगून गेला असेल तर एक वर्षपर्यंत रवीची महादशा समजावी. याप्रमाणें ठोकळ मानानें नक्षत्राचे विभाग करून दशा जाणावी. रवीची महादशा संपल्यावर चंद्राची महादशा सुरू होईल व ती १० वर्षे राहील. चंद्राच्या महादशेची १० वर्षे झाल्यावर मंगळाची महादशा सुरू होईल व ती ७ वर्षे राहील. मंगळाच्या दशेचीं ७ वर्षे झाल्यावर राहूची महादशा सुरू होईल व ती १८ वर्षे राहील. राहूच्या महादशेचीं १८ वर्षे झाल्यावर गुरूची महादशा सुरू होईल व ती १६ वर्षे राहील. याप्रमाणें क्रमानें जाणावें.

जन्मकाळीं चंद्र पुनर्वसु नक्षत्र तीन चतुर्थांश भोगून गेला असेल तर त्या वेळीं गुरूची महादशा आहे असें समजावें. पुनर्वसु नक्षत्राचीं ५$\frac{1}{3}$ वर्षे म्हणजे ५ वर्षे ४ महिने. यांपैकीं तीन चतुर्थांश नक्षत्र भुक्त असल्यामुळें बाकी एक चतुर्थांशच रहातें. म्हणून ५ वर्षे ४ महिने इतक्या मुदतीचा एक चतुर्थांश म्हणजे १६ महिने ही महादशा समजावी. सोळा महिने झाल्यावर शनीची महादशा होईल व ती १९ वर्षे राहील. शनीच्या महादशेचीं १९ वर्षें बुधाची महादशा सुरू होईल व ती १७ वर्षे राहील.

# भाग पांचवा.

## दशा.

### सामान्य माहिती.

दशा—दशा म्हणजे अवस्था. मनुष्याचे आयुष्यामध्यें ज्या कालीं जो ग्रह फलदायक होतो त्या कालीं त्या ग्रहाची दशा आहे असें म्हणतात. जातकशास्त्रामध्यें अनेक प्रकारच्या दशा सांगितल्या आहेत. पण त्यांमध्यें **विंशोत्तरी**, अष्टोत्तरी आणि योगिनी या तीन सामान्यतः प्रचारांत आहेत. यांपैकीं विंशोत्तरी दशेसंबंधाची माहिती येथें दिली आहे.

#### महादशेचें कोष्टक.

| ग्रह | वर्षें | चांद्र नक्षत्रें | | |
|---|---|---|---|---|
| | | वर्षें नक्षत्र | वर्षें नक्षत्र | वर्षें नक्षत्र |
| रवि | ६ | २ कृत्तिका | २ उत्तरा | २ उत्तराषाढा |
| चंद्र | १० | ३ १/३ रोहिणी | ३ १/३ हस्त | ३ १/३ श्रवण |
| मंगळ | ७ | २ १/३ मृग | २ १/३ चित्रा | २ १/३ धनिष्ठा |
| राहु | १८ | ६ आर्द्रा | ६ स्वाती | ६ शततारका |
| गुरु | १६ | ५ १/३ पुनर्वसु | ५ १/३ विशाखा | ५ १/३ पूर्वाभाद्रपदा |
| शनि | १९ | ६ १/३ पुष्य | ६ १/३ अनुराधा | ६ १/३ उत्तराभाद्रपदा |
| बुध | १७ | ५ २/३ आश्लेषा | ५ २/३ ज्येष्ठा | ५ २/३ रेवती |
| केतु | ७ | २ १/३ मघा | २ १/३ मूळ | २ १/३ अश्विनी |
| शुक्र | २० | ६ २/३ पूर्वा | ६ २/३ पूर्वाषाढा | ६ २/३ भरणी |

महादशा आणि अंतर्दशा—दशांमध्यें महादशा आणि अंतर्दशा असे दोन मुख्य भेद आहेत. प्रत्येक ग्रहाच्या या दोन्ही

दशा असतात. म्हणजे एका ग्रहाची महादशा संपल्यानंतर दुसऱ्या ग्रहाची महादशा सुरू होते. दुसऱ्यानंतर तिसऱ्याची. याप्रमाणें सर्व ग्रहांसंबंधानें जाणावें. प्रत्येक ग्रहाची महादशा चालू असतांना तिच्यामध्यें सर्व ग्रहांच्या अंतर्दशा येत असतात.

**स्पष्टीकरण**—कृत्तिका, उत्तरा आणि उत्तराषाढा या नक्षत्रांचा दशास्वामी रवि आहे. म्हणजे या तीन नक्षत्रांपैकीं कोणत्याही एका नक्षत्रीं जन्मकाळीं चंद्र असेल तर जन्मकाळीं रवीची महादशा आहे असें समजावें. जन्मकाळींच उत्तरा नक्षत्रीं चंद्र आला असेल तर दोन वर्षेपर्यंत रवीची महादशा समजावी. अर्धे नक्षत्र चंद्र भोगून गेला असेल तर एक वर्षपर्यंत रवीची महादशा समजावी. याप्रमाणें ठोकळ मानानें नक्षत्राचे विभाग करून दशा जाणावी. रवीची महादशा संपल्यावर चंद्राची महादशा सुरू होईल व ती १० वर्षे राहील. चंद्राच्या महादशेचीं १० वर्षे झाल्यावर मंगळाची महादशा सुरू होईल व ती ७ वर्षे राहील. मंगळाच्या दशेचीं ७ वर्षे झाल्यावर राहूची महादशा सुरू होईल व ती १८ वर्षे राहील. राहूच्या महादशेचीं १८ वर्षे झाल्यावर गुरूची महादशा सुरू होईल व ती १६ वर्षे राहील. याप्रमाणें क्रमानें जाणावें.

जन्मकाळीं चंद्र पुनर्वसु नक्षत्र तीन चतुर्थांश भोगून गेला असेल तर त्या वेळीं गुरूची महादशा आहे असें समजावें. पुनर्वसु नक्षत्राचीं ५⅓ वर्षे म्हणजे ५ वर्षे ४ महिने. यापैकीं तीन चतुर्थांश नक्षत्र भुक्त असल्यामुळें बाकी एक चतुर्थांशच रहातें. म्हणून ५ वर्षे ४ महिने इतक्या मुदतीचा एक चतुर्थांश म्हणजे १६ महिने गुरूची महादशा समजावी. सोळा महिने झाल्यावर शनीची महादशा सुरू होईल व ती १९ वर्षे राहील. शनीच्या महादशेचीं १९ वर्षे झाल्यावर बुधाची महादशा सुरू होईल व ती १७ वर्षे राहील.

बुधाच्या महादशेचीं १७ वर्षे झाल्यावर केतूची महादशा सुरू होईल व ती ७ वर्षे राहील. केतूच्या महादशेचीं ७ वर्षे झाल्यावर शुक्राची महादशा सुरू होईल व ती २० वर्षे राहील. शुक्राच्या महादशेचीं २० वर्षे झाल्यावर रवीची महादशा सुरू होईल व ती ६ वर्षे राहील. याप्रमाणें क्रम जाणावा.

## अंतर्दशा.

प्रत्येक ग्रहाच्या महादशेमध्यें त्या ग्रहासह सर्व ग्रहांच्या अंतर्दशा असतात. ज्या ग्रहाची महादशा असेल त्याची अंतर्दशा महादशेबरोबर सुरू होते. त्याची अंतर्दशा झाल्यावर महादशेच्या कोष्टकांनी दिलेल्या क्रमानें त्याच्या पुढें असणाऱ्या ग्रहाची अंतर्दशा सुरू होते. उदाहरण–राहूच्या महादशेला प्रारंभ झाला आहे असें समजा. तर या महादशेमध्यें राहु, गुरु, शनि, बुध, केतु, शुक्र, रवि, चंद्र आणि मंगळ या सर्व ग्रहांच्या अंतर्दशा अनुक्रमानें येतील.

**अंतर्दशा तयार करण्याची रीति**—ज्या ग्रहांच्या महादशेंतील अंतर्दशा काढावयाच्या असतील त्या ग्रहांच्या महादशेच्या वर्षसंख्येला त्याच वर्षसंख्येनें गुणावें आणि त्या गुणाकाराला १२० या संख्येनें भागावें. जो भागाकार येईल तो वर्षात्मक येईल. यांतले पूर्णांक तितकीं वर्षे समजावीं व अपूर्णांक राशि अंश आणि कलात्मक समजावा. म्हणजे ती त्या ग्रहाची अंतर्दशा झाली. नंतर त्या ग्रहाच्या म्हणजे महादशेच्या ग्रहाच्या वर्षसंख्येला त्याच्या पुढील 'ग्रहाच्या वर्षसंख्येनें गुणावें आणि त्या गुणाकाराला १२० या संख्येनें भागावें. जो भागाकार येईल ती या दुसऱ्या ग्रहाची अंतर्दशा समजावी. ही दुसऱ्या ग्रहाची अंतर्दशा पहिल्या ग्रहाच्या अंतर्दशेनंतर सुरू होईल. नंतर महादशेच्या ग्रहाच्या वर्षसंख्येला तिसऱ्या ग्रहाच्या वर्षसंख्येनें गुणावें आणि या गुणाकाराला १२० या संख्येनें भागावें. जो भागाकार येईल ती

या तिसऱ्या ग्रहाची अंतर्दशा समजावी. ही तिसऱ्या ग्रहाची अंतर्दशा दुसऱ्या ग्रहाच्या अंतर्दशेनंतर सुरू होईल.

### उदाहरण.

चंद्राच्या महादशेंतील अंतर्दशा तयार करावयाच्या.

चंद्राचीं वर्षे १०. याला १० नीं गुणिलें असतां गुणाकार १०० येतो. याला १२० नीं भागावयाचें, भागाकारामध्यें पूर्णांक येत नाहींत, करितां १२ राशींचें एक वर्ष म्हणून १२ नीं गुणिलें असतां राशि येतात. म्हणजे $\frac{१००}{१२०}$×१२=१० राशि ही चंद्राची अंतर्दशा झाली. वर्षाचे महिनेहि १२ च होतात म्हणून १० महिने चंद्राची अंतर्दशा झाली. चंद्राच्या पुढील ग्रह मंगळ. याची वर्षसंख्या ७. चंद्राच्या आणि मंगळाच्या वर्षसंख्यांचा गुणाकार ७० येतो. त्याला १२० नीं भागावयाचें. पूर्णांक येत नाहींत म्हणून राशि तयार करण्याकरितां १२ नीं गुणावयाचें. म्हणजे $\frac{७०}{१२०}$×१२=७ राशि मंगळाची अंतर्दशा झाली. राशींइतकेच महिने येतात म्हणून ७ महिने मंगळाची अंतर्दशा झाली. यानंतर चंद्राच्या वर्षसंख्येला राहूच्या वर्षसंख्येनें गुणून १२० नीं भागावयाचें. म्हणजे

१०×$\frac{१८}{१२०}$=$\frac{१८०}{१२०}$= १ वर्ष + $\frac{६०}{१२०}$×१२=६ राशि.

म्हणजे १ वर्ष ६ महिने राहूची अंतर्दशा झाली. राहूनंतर गुरु, शनि इत्यादि सर्वांच्या याप्रमाणें अंतर्दशा तयार कराव्या.

या रीतीनें सर्व ग्रहांच्या महादशांमधील अंतर्दशा तयार करतां येतात. या सर्व पुढील कोष्टकांमध्यें दिलेल्या आहेत.

## महादशांमधील अंतर्दशांचीं कोष्टकें.

### रवीच्या महादशेंतील अंतर्दशा.–६ वर्षे.

| | रवि | चंद्र | मंगळ | राहु | गुरु | शनि | बुध | केतु | शुक्र |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| वर्षे | ० | ० | ० | ० | ० | ० | ० | ० | १ |
| राशि | ३ | ६ | ४ | १० | ९ | ११ | १० | ४ | ० |
| अंश | १८ | ० | ६ | २४ | १८ | १२ | ६ | ६ | ० |
| कला | ० | ० | ० | ० | ८ | ० | ६ | ० | ० |

### चंद्राच्या महादशेंतील अंतर्दशा.–१० वर्षे.

| | चंद्र | मंगळ | राहु | गुरु | शनि | बुध | केतु | शुक्र | रवि |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| वर्षे | ० | ० | १ | १ | १ | १ | ० | १ | ० |
| राशि | १० | ७ | ६ | ४ | ७ | ५ | ७ | ८ | ६ |
| अंश | ० | ० | ० | ० | ० | ० | ० | ० | ० |
| कला | ० | ० | ० | ० | ० | ० | ८ | ० | ० |

### मंगळाच्या महादशेंतील अंतर्दशा.–७ वर्षे.

| | मंगळ | राहु | गुरु | शनि | बुध | केतु | शुक्र | रवि | चंद्र |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| वर्षे | ० | १ | ० | १ | ० | ० | १ | ० | ० |
| राशि | ४ | ० | ११ | १ | ११ | ४ | २ | ४ | ७ |
| अंश | २५ | १८ | ६ | ९ | २७ | २५ | ० | ६ | ० |
| कला | ० | ० | ० | ९ | ० | ० | ० | ० | ० |

## राहूच्या महादशेंतील अंतर्दशा.—१८ वर्षे.

| | राहु | गुरु | शनि | बुध | केतु | शुक्र | रवि | चंद्र | मंगळ |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| वर्षे | २ | २ | २ | २ | १ | ३ | ० | १ | १ |
| राशि | ८ | ४ | १० | ६ | ० | ० | १० | ६ | ० |
| अंश | १२ | २४ | ६ | १८ | १८ | ० | २४ | ० | १८ |
| कला | ० | ० | ० | ० | ० | ० | ० | ० | ० |

## गुरूच्या महादशेंतील अंतर्दशा.—१६वर्षे.

| | गुरु | शनि | बुध | केतु | शुक्र | रवि | चंद्र | मंगळ | राहु |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| वर्षे | २ | २ | २ | ० | २ | ० | १ | ० | २ |
| राशि | १ | ६ | ३ | ११ | ० | ९ | ४ | ११ | ४ |
| अंश | १८ | १२ | ६ | ६ | ० | १८ | ० | ६ | २४ |
| कला | ० | ० | ० | ० | ० | ० | ० | ० | ० |

## शनीच्या महादशेंतील अंतर्दशा.—१९ वर्षे.

| . | शनि | बुध | केतु | शुक्र | रवि | चंद्र | मंगळ | राहु | गुरु |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| वर्षे | ३ | २ | १ | ३ | ० | १ | १ | २ | २ |
| राशि | ० | ८ | १ | २ | ११ | ७ | १ | १० | ६ |
| अंश | ३ | ९ | ९ | ० | १२ | ० | ९ | ६ | १२ |
| कला | ० | ० | ० | ० | ० | ० | ० | ० | ० |

## बुधाच्या महादशेंतील अंतर्दशा.–१७ वर्षें.

| | बुध | केतु | शुक्र | रवि | चंद्र | मंगळ | राहु | गुरु | शनि |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| वर्षें | २ | ० | २ | ० | १ | ० | २ | २ | २ |
| राशि | ४ | ११ | १० | १० | ५ | ११ | ६ | ३ | ८ |
| अंश | २७ | २७ | ० | ६ | ० | २७ | १८ | ६ | ९ |
| कला | ० | ० | ० | ० | ० | ० | ० | ० | ० |

## केतूच्या महादशेंतील अंतर्दशा.–७ वर्षें.

| | केतु | शुक्र | रवि | चंद्र | मंगळ | राहु | गुरु | शनि | बुध |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| वर्षें | ० | १ | ० | ० | ० | १ | ० | १ | ० |
| राशि | ४ | २ | ४ | ७ | ४ | ० | ११ | १ | ११ |
| अंश | २७ | ० | ६ | ० | २७ | १८ | ६ | ९ | २७ |
| कला | ० | ० | ० | ० | ० | ० | ० | ० | ० |

## शुक्राच्या महादशेंतील अंतर्दशा.–२० वर्षें.

| | शुक्र | रवि | चंद्र | मंगळ | राहु | गुरु | शनि | बुध | केतु |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| वर्षें | ३ | १ | १ | १ | ३ | २ | ३ | २ | १ |
| राशि | ४ | ० | ८ | २ | ० | ८ | २ | १० | २ |
| अंश | ० | ० | ० | ० | ० | ० | ० | ० | ० |
| कला | १ | ० | ० | ० | ० | ० | ० | ० | ० |

# भाग सहावा.

## जातक.

—:•:—

### सामान्य विचार.

जन्मकाळच्या ग्रहस्थितीवरून मनुष्याच्या आयुष्यांतील शुभाशुभ फल वर्तविणें याला जातक म्हणतात. अर्थात् जातकशास्त्र ज्योतिःशास्त्रावर अवलंबून आहे. ज्योतिःशास्त्रावरून आपणांस कळतें कीं, विश्वामधील प्रत्येक पदार्थ आपापल्या शक्त्यनुसार दुसऱ्या पदार्थांना स्वतःकडे आकर्षण करीत असतो. या नियमाचाच पर्यायानें अर्थ असा आहे कीं, प्रत्येक पदार्थ आपल्या शक्त्यनुसार दुसऱ्या पदार्थांवर शुभाशुभ फल घडवून आणीत असतो. तेव्हां विश्वांतील मोठे व पृथ्वीच्या जवळ असलेले पदार्थ जे ग्रह ते जन्माला येणाऱ्या प्रत्येक प्राण्यासंबंधानें शुभाशुभ फल घडवून आणीत असतात. ग्रहांच्या कोणकोणत्या अवस्थांमध्यें कशीं कशीं फलें घडतात ही माहिती आमच्या देशांत होऊन गेलेल्या वसिष्ठ, पराशर, व्यास, भृगु, गर्ग, जैमिनि इत्यादि प्राचीन ऋषींनीं आणि वराहमिहिर, कल्याणवर्मा, ढुंढिराज इत्यादि अर्वाचीन ज्योतिःशास्त्रज्ञांनीं आमच्या उपयोगासाठीं तयार करून ठेविली आहे. पुष्कळ प्राचीन ग्रंथ अद्याप उपलब्ध झाले नसल्यामुळें सध्यां अर्वाचीन ग्रंथांवरच जातकशास्त्रज्ञ निर्वाह करून घेत आहेत. ज्योतिर्वेत्ता मुनिवर्यांचे ग्रंथ उपलब्ध असते तर जातकशास्त्राची किती तरी भरभराट झाली असती. अर्वाचीन ग्रंथ सर्व दृष्टींनीं परिपूर्ण नसल्यानें आजकालच्या बहुतेक ज्योतिष्यांना अजमासानेंच जातक वर्तवावें लागतें. जातक हें शास्त्र आहे, पण या शास्त्राची पूर्ण माहिती नसल्यामुळें जातकावर कांहीं लोकांचा विश्वास बसत नाहीं. शिवाय जातकशास्त्राचें तुटपुंजें

मिळविलेले ज्योतिषी जें जातक वर्तवितात तें चांगलेंसें अनुभवास येत नसल्यामुळें या अविश्वासामध्यें जास्त भर पडते. ज्यांचा जातकशास्त्रावर मुळींच विश्वास नाहीं त्यांना उद्देशून आम्ही कांहींच लिहूं इच्छित नाहीं. ज्यांचा विश्वास आहे त्यांनीं असें लक्षांत ठेवावें कीं, हें शास्त्र सांप्रत अगदीं थोड्या प्रमाणांत उपलब्ध आहे. जसजसे प्राचीन ग्रंथ सांपडून प्रसिद्ध होतील तसतशी जास्त माहिती कळेल. तोंपर्यंत उपलब्ध ग्रंथांवरच समाधान मानून रहाणें किंवा नवीन ठोकताळे बसविणें प्राप्त आहे.

आतां मनुष्याच्या जन्मकाळीं अमुकच ग्रहस्थिति कां असावी असा कोणी प्रश्न करतील. ज्याच्या जन्मकाळीं ग्रह चांगले असतील त्याला चांगलें फळ मिळतें, वाईट असतील त्याला वाईट फळ मिळतें. पण हा असा भेद कां असावा ? या प्रश्नाला उत्तर हिंदुधर्मशास्त्रामध्येंच सांपडणारें आहे. प्राणी जन्माला येतो तो आपल्याबरोबर कांहीं तरी परिवार घेऊन येत असतो. एका जन्मामध्यें केलेल्या शुभाशुभ कर्मांचीं फळें प्राण्याला पुढील जन्मामध्यें भोगावीं लागतात असें आमच्या धर्मशास्त्रामध्यें सांगितलें आहे. अर्थात जशीं त्याचीं पूर्वजन्मींचीं कर्में असतील तसे त्याचे या जन्मीचे ग्रह असतात. आपले जन्मकाळचे ग्रह कसे पडले आहेत हें पाहून त्यानें त्यानें आपल्या पूर्वजन्मींच्या कर्मांचा बरेवाईटपणा ओळखावा. चांगले ग्रह असतील तर आपलें पूर्वकर्म चांगलें होतें; आणि आपण या जन्मीं जर वाईट कर्म केलें तर पुढील जन्मीं वाईट फळ भोगावें लागेल एतदर्थ या जन्मीं कोणतेंहि पापकर्म करूं नये; अशी बुद्धि ठेविली पाहिजे. ज्याचे ग्रह वाईट असतील त्यानें आपलें पूर्वकर्म वाईट असें समजावें. कर्मफळ भोगल्यावांचून सुटका नाहीं, याकरितां या जन्मीं कितीहि दुःख भोगावें लागलें तरी परमेश्वरावर निष्ठा ठेवून तें भोगावें आणि पुढील जन्मीं

तरी आपल्यास सुस्थिति प्राप्त व्हावी म्हणून या जन्मीं पुण्य-मार्गाचें आचरण करीत रहावें. आपल्या जन्मकालीन ग्रहस्थितीवरून एवढी भावना झाली आणि त्याप्रमाणें मनुष्य सदाचारी बनला तरी जातकशास्त्रापासून त्याचा पुष्कळ फायदा झाला असें म्हणतां येईल. असो.

मागील पांच भागांमध्यें जातक समजण्याला आवश्यक अशी ज्योतिःशास्त्राची, गणितशास्त्राची व जातकशास्त्राची पूर्वमाहिती सांगितली. आतां या व पुढील भागांमध्यें जातकाची माहिती देतों.

## ऋतुफल.

वसंत ऋतूमध्यें जन्मलेला मनुष्य दीर्घायु, धनिक व सुगंधप्रिय होतो. ग्रीष्मऋतूमध्यें जन्मलेला कृश, सुबुद्धि व भोगी होतो. वर्षाऋतूमध्यें जन्मलेला खारट, गोड व कडू पदार्थ ज्याला प्रिय आहेत असा होतो. शरदृतूमध्यें जन्मलेला कामी, पुण्यात्मा व सुखी होतो. हेमंतऋतूमध्यें जन्मलेला समर्थ, योगी, कृश व शेतकरी होतो. शिशिर ऋतूमध्यें जन्मलेला ज्ञानप्रिय, दाता, स्वधर्मी मानी व यशस्वी होतो.

## मासफल.

चैत्र—श्रीमान्, आनंदी, वेदशास्त्रसंपन्न, कलाकुशल.
वैशाख—राजा, स्वातंत्र्यप्रिय, शास्त्रज्ञ.
ज्येष्ठ—आयुष्मान्, मांत्रिक, धनवान्, पुत्रवान्,
आषाढ—धनवान, कृपाळू, भोगी, परद्वेषी.
श्रावण—देवभक्त.
भाद्रपद—स्वच्छंदी, अनेक देश फिरणारा.
अश्विन—स्वजनांचा द्वेषी, दरिद्री, चंचल.
कार्तिक—पुष्ट, शेतकरी, विशालनयन, धनवान्.
मार्गशीर्ष—देवभक्त, गुरुभक्त, पितृभक्त, धर्मशील.

पौष—धनवान्, गुणवान्, बलवान्, उंच नाकाचा.
माघ—खल, धर्मशील.
फाल्गुन—गाणारा, उपकारकर्ता.

## पक्षफल.

शुक्ल—धर्मरत, कृपाळू, पुत्रपौत्रवान्, धनवान्.
कृष्ण—आपलपोट्या, मातृभक्त, बंधूंचा वैरी.

## काळफळ.

पहाट—स्वधर्मनिरत, सत्कर्मे करणारा, सुखी.
सूर्योदय—अत्यंत सुखी.
मध्यान्ह—राजतुल्य, गुणवान्,
अपराह्न—धनवान्.
संध्या—सुगंधप्रिय, स्त्रीलंपट.
रात्र—खळ.

## तिथिफल.

प्रतिपदा—मोठा उद्योगी, पुण्यवान्.
द्वितीया—धनवान्, बळवान्, यशस्वी, पशुवान्.
तृतीया—प्रबल, वक्ता.
चतुर्थी—मंत्रनिपुण, चतुर, आशावादी.
पंचमी—कृशांग, कामी, वेदशास्त्रसंपन्न.
षष्ठी—अल्पबलवान्, राजतुल्य, ज्ञाता, कोपी.
सप्तमी—कफप्रकृति, बलवान्, राजतुल्य.
अष्टमी—अतिकामी, स्त्रीलंपट, कफप्रकृति.
नवमी—प्रख्यात, तेजस्वी, कामी, स्त्रीपुत्र वाईट आहेत असा.
दशमी—धर्मात्मा, वक्ता, श्रीमान्.
एकादशी—धनवान्, देवब्राह्मणपूजक.
द्वादशी—पुण्यकर्मे करणारा, दाता, धनवान्, पंडित.

त्रयोदशी—लोभी, कामी, धनवान्.
चतुर्दशी—रागीट, परधन व परस्त्री यांचा अभिलाषी.
पौर्णिमा—कुलवान्, यशस्वी, चांगल्या मनाचा.
अमावास्या—आळशी, पितृदेवभक्त, धनवान्.

## वारफल.

रविवार—मानी, राजा, पिंगट नेत्र, पिंगट केश.
सोमवार—कामी, तेजस्वी, दयाळू.
मंगळवार—दुष्ट, साहसी, मांसखोर.
बुधवार—देवब्राह्मणपूजक, एकवचनी.
गुरुवार—यज्ञकर्ता, राजप्रिय, गुणवान्, प्रख्यात.
शुक्रवार—धनधान्यवान्, सर्वप्रिय, विषयी.
शनिवार—दुसऱ्याचें धन व अन्न यांचा उपयोग घेणारा, मांसखोर, द्वेषी, बंधुद्वेषी.

## नक्षत्रफल.

अश्विनी—शरीर स्थूल, नखें बारीक, डोळे मोठे, परस्त्रीचा अभिलाषी, चंचल, दीर्घायु, धाडसी, चहाडखोर, अलंकार वापरणारा.
भरणी—तांबुस वर्ण, कुरळे तांबुस केस, डोळे तांबडे, झोंपाळू, स्त्रीप्रिय, सत्यवक्ता, सुखी, शास्त्राभ्यासी, दीर्घायु, सुभोजनी.
कृत्तिका—तांबुस वर्ण, परस्त्रीरत, रोगी, प्रसिद्ध, तामसी.
रोहिणी—सुरूप, सुखप्रिय, चतुर, धनवान्, तऱ्हेतऱ्हेची वस्त्रें वापरणारा, नेत्ररोगी, हात पाय पोट बारीक असा.
मृग—उत्साही, पापभीरु, मातृभक्त, स्वतंत्र, चिरायु, विनयसंपन्न.
आर्द्रा—आचारशील, क्रयविक्रयनिपुण, कवि, पापकर्माचा द्वेषी अल्पश्रुत, दीर्घायु, कृतज्ञ.—
पुनर्वसु—स्वरूपवान्, दीर्घायु, स्त्रीप्रिय, उत्साही, दानशूर,

ऐश्वर्यप्रिय, कामी, दुर्विचारी, हंसरा, उन्मत्त, स्वाहीन, उडदाचे पदार्थ आवडणारा, बुद्धिमान्.

पुष्य—सर्वज्ञ, श्रीमान्, शीघ्रसंतापी, ज्योतिष विद्येचा भोक्ता, धैर्यशील, दीर्घायु, बंधुवर्गावर उपकार करणारा, मृदु भाषण करणारा, अहंकारी, सूक्ष्म निरीक्षण करणारा, स्त्रीप्रिय.

आश्लेषा—अति वाचक, राजवर्गांनी पूज्य, अल्पक्रोधी, अति फिरणारा, नोकर, पोटांत व मस्तकांत पीडा आहे असा, कामी, शरीरावर तीळ असलेला, मंदगति.

मघा—विद्वान् लोकांस प्रिय, विनयशील, दीर्घायु, धनीकार्य चतुर, बंधुवर्गावर उपकार करणारा, मातापित्यांस प्रिय, गुणी, स्पष्टवक्ता, रिपुवर्गास वश करणारा, अल्पबुद्धिमान्, शरीरपीडित, स्वस्त्रीप्रिय, कर्णरोगी.

पूर्वा—रूपवान्, दाता, जनप्रिय, वडिलांप्रमाणें वागणारा, हास्यप्रिय, मद्यप्रिय, गायनवादनश्रवणप्रिय, मातापित्यांना सोडून रहाणारा, सात्विक.

उत्तरा—कार्यशील, अभिमानी, धर्मज्ञ, सुभग, कुशल, स्त्रैण, बंधुप्रिय, प्रेमाचा लोभी, सुंदर, विनयशील, स्वपराक्रमानें ऐश्वर्य भोगणारा, पंडित.

हस्त—प्रसिद्ध, प्रगल्भ, बोलण्यांत चतुर, पुत्रवान, ऐश्वर्यवान्, धनी, सज्जनांत आल्हादकर, राजवर्गीय समाजांत वागणारा, उपकार करण्याची बुद्धि न बाळगणारा, देव ब्राह्मण व गुरु यांना पूज्य मानणारा, कृतघ्न, वियोगापासून शोक पावणारा.

चित्रा—धन व स्त्री यांचा लोभी, भोगी शृंगार, जाणणारा, चतुर, हुशार.

स्वाती—अन्नदान करणारा, सुभग, दीर्घायु, हत्तीप्रमाणें स्थूल, शरीर, छाती मोठी, पोट लहान, भाग्यवान्, देव ब्राह्मण व गुरु

यांची सेवा करणारा, धनधान्याचा व्यय करणारा, बुद्धिमान्, विद्वानांस प्रिय, श्रीमान्, कार्यशील, भिक्षुकांस प्रिय, स्वतंत्र.

विशाखा—विद्वानांस प्रिय, विनयशील, दीर्घायु, धनवान्, कार्यनिपुण, बंधुवर्गावर उपकार करणारा, गुणवान्, मधुरभाषणी, शत्रुजनाला वश करणारा, अल्पबुद्धिमान्, रोगी, लाल डोळ्यांचा, उदरावर चिन्हें असलेला.

अनुराधा—दयाशील, बुद्धिमान्, दानशील, मंगलदर्शनाचा, प्रवासी, अल्पपुत्रवान्, शांत, राजवर्गास पूज्य, सज्जनांनी पूज्य, पिंगट डोळे.

जेष्ठा—वर्ण काळा, संतति पुष्कळ, हातापायांनी अधू, सत्यवादी, स्त्रैण, रोगी, दुःखी, शत्रूनें पीडित, मध्यमायु, अल्पभाषणी, धनवान्, राजवर्गानें पूज्य, देवब्राह्मणांची पूजा करणारा, स्त्रीचे आधीन.

मूळ—धनवान्, मान्य, बंधुमान्, वर्ण तांबुस, धार्मी, चोर, रोगी, चंचल, लोकांचे भाषणावर विश्वास ठेवणारा.

पूर्वाषाढा—पातळ शरीर, हातापयांची बोटें बारीक, भित्रा, विनयशील, बंधुमान्, गुणग्राही, प्रसिद्ध, भोगी, अशक्त, स्वार्थिक, पुत्रवान्.

उत्तराषाढा—पंडित, सुलक्षणी, हातानें कमजोर, सुखी, शांत पोटऱ्या व नखें मोठी, सुशील, गुणी, कीर्तिमान, वक्ता, शूर, अनुष्ठानरत, रूपवान्.

श्रवण—शरीरानें पुष्ट, तऱ्हेतऱ्हेचीं वस्त्रें व पुष्पें वापरणारा, सुगंधप्रिय, परोपकारी, उदार बंधुमान्, शुभभाषणी, वक्ता, बुद्धि, रोगी, प्रवासी, चंचल, गुह्यस्थली चिन्हांकित.

घनिष्ठा—सर्वशास्त्रनिपुण, जनप्रिय, तेजस्वी, स्थूल शरीर, संतापी.

शततारका—स्थूल शरीर, लोकपूज्य, बहुपुत्रवान् बंधुजनांवर उपकार करणारा, चिरायु, खर्चिक, निरोगी, धूर्त, ज्ञानी, मितभाषणी, संतापी.

पूर्वाभाद्रपदा—कमलनयन, पित्तप्रकृति, उदार, धनवान्, स्त्रीजनांस प्रिय, ज्ञानी, विषयासक्त, अल्पान्नदाता, संतापी, दीर्घायु, पुत्रसंततिवान्, कंठरोगी, कर्णरोगी, स्वधर्मरत.

उत्तराभाद्रपदा—नृत्यगायनप्रिय, कार्यदक्ष, धनवान्, शास्त्रप्रिय, स्त्रीचे ठायीं आसक्त, गंभीर, पराक्रमी, अचाट बुद्धीचा, सज्जन, सुगंधप्रिय, भोगी, सुभग, मंदगति, गुणग्राही, प्रेमळ.

रेवती—सौभाग्यवान्, उग्र, तेजस्वी, धनवान्, खर्चिक, धैर्यवान्, पंडित, ज्याला मित्र शत्रूप्रमाणें भासतात असा, पित्तप्रकृति, अन्नदाता, मत्सरी.

## नक्षत्रचरणफल.

अश्विनी—( १ ) प्रथमचरण-खलबुद्धि; ( २ ) द्वितीयचरण-भोक्ता, धर्मशील, तेजस्वी; ( ३ ) तृतीयचरण-विलक्षण, उत्पन्नभोगी, विजयी; ( ४ ) चतुर्थचरण—धनवान्, देवपूजारत, धर्मशील.

भरणी—( १ ) गर्विष्ठ, गुणवान्, राजवर्गानें पूज्य; ( २ ) लोभी, पुत्रहीन, अथवा नपुंसक; ( ३ ) केसाळ शरीर, उत्साहयुक्त, शूर; ( ४ ) कृतघ्न, द्वेषी, कठोर भाषणी, दुःखी, बहुपुत्रवान, भाग्यवान.

कृत्तिका—( १ ) दयावान्, [illegible], चतुर; ( २ ) संस्कारहीन, गर्वी, अल्पभाषणी, दुसऱ्यापासून पीडित; ( ३ ) क्रोधी, बुद्धिहीन, [illegible]; ( ४ ) विद्याविनयसंपन्न, धार्मिक.

रोहिणी—( १ ) लांबुळ केसांचा, मंद पण शूर, निष्ठुर; ( २ ) भोक्ता, [illegible] शरीर, जितेंद्रिय, सुशील; ( ३ ) कवि,

शत्रुनाशास समर्थ, गणिती; ( ४ ) धनी, दुसऱ्याच्या मदतीनें चालणारा, बुद्धिमान्, सद्गुरुंचा सहवास करणारा.

मृग—( १ ) स्थूलशरीर, धनिक, शत्रुघाती; ( २ ) भोगी, (३) उदार, सुमुख, बुद्धिमान्, ( ४ ) परद्वेषी, मोठाल्या डोळ्यांचा.

आर्द्रा—( १ ) गुणवान्, प्रसन्नमुख, कृश; ( २ ) सत्त्वरहीन, मगरूर, स्पष्टवक्ता; (३) बुद्धिहीन, कुमार्गी; (४) दुर्मति, गुणद्वेषी.

पुनर्वसु—( १ ) चहाडखोर, शरीरानें पीडित, पंडित; ( २ ) कीर्तिमान्, तेजस्वी; ( ३ ) चांगलीं वस्त्रें वापरणारा व सुग्रास अन्न खाणारा, कवि, लोभी, हक्क चालवणारा, चिरायु; ( ४ ) कीर्तिमान्, तेजस्वी, गाय बाळगणारा, धनधान्याचा संग्रह करणारा.

पुष्य—सर्व चरणांचें उत्तम फळ आहे.

आश्लेषा—( १ ) कार्यवादी, लोकनायक, बुद्धिमान्; ( २ ) मलिन, रोगी; ( ३ ) मातृपितृहीन; ( ४ ) धनवान्

मघा—( १ ) चुगलखोर, चंचल, कृतघ्न, पापकर्मी; ( २ ) पांढरीं वस्त्रें वापरणारा, रोग; ( ३ ) हुशार; ( ४ ) स्त्रियांचा आवडता, दंतरोगी.

पूर्वा—( १ ) व्यापारांत कुशल, गंभीर, चंचलाक्ष आळशी, ( २ ) रोगी, दांडगाईनें ऐश्वर्य वाढविणारा, द्वेषाभागी; ( ३ ) स्त्रीपुत्रांनी युक्त, शिल्पशास्त्रज्ञ, गणिती; ( ४ ) पुत्रवान्, दुःखी.

उत्तरा—( १ ) स्त्री व बंधुजनांस प्रिय, शूर, मस्तरोगी; (२) दरिद्री, चंचल, घातक; ( ३ ) गर्विष्ठ, रोगी; ( ४ ) कृतघ्न, चहाडखोर.

हस्त—(१) व्यापारांत कुशल, दुर्गुण, दुर्मनस्क; (२) पीडित, भोळा; ( ३ ) पंडित; ( ४ ) धनी, राजदर्बारांत प्रतिष्ठा, थोडा सेवाधी.

चित्रा—( १ ) उग्र, रूपवान्, थट्टेखोर; ( २ ) अनुष्ठानकर्मरत, गोड बोलणारा; ( ३ ) ज्ञानी, विधुर, कीर्तिमान्, पराक्रमी; ( ४ ) उद्योगी, पराक्रमी, काबाडकष्ट करणारा, धैर्यवान्.

स्वाती—( १ ) विद्वानांस प्रिय, लोकांवर सत्ता चालविणारा; ( २ ) आंतल्या गांठीचा, कृतज्ञ; ( ३ ) दुर्विचारी, द्वेषी, शरीरानें पीडित, द्रव्य व गृह यांपासून अल्प सुख पावणारा, स्वशरीराचें पोषण करणारा; ( ४ ) सर्वजनप्रिय, संतापी.

विशाखा—( १ ) पिंगट नेत्र, तांबुस वर्ण, बळकट हाडांचा; ( २ ) न्यायानें वागणारा, एकांतवासप्रिय, कर्णरोगी; ( ३ ) विलक्षण; ( ४ ) स्त्रीचे आधीन, दंतरोगी.

अनुराधा—( १ ) धार्मिक, नीति जाणणारा असून वांकड्या मार्गानें चालणारा; ( २ ) मर्यादशील, वेणुवाद्य वाजविण्याची आवड असलेला, प्रतिष्ठित, बुद्धिमान्; ( ३ ) गणिती, धीर, स्थिरवृत्ति; ( ४ ) दरिद्री, परद्रोही.

ज्येष्ठा—( १ ) लेखक, मानी, हास्यमुख; ( २ ) दानशील, रोगी, नीच वृत्तीनें वागणारा; ( ३ ) कर्णरोगी, मलिन, धर्मद्वेषी, परकार्य करण्यास उत्सुक; ( ४ ) दुर्बुद्धि, दानकर्महीन, गुणद्वेषी, निर्गुण, रोगी, शत्रुहीन.

मूळ—( १ ) पितृसुख अल्प, मूळव्याधीनें पीडित, दरिद्री; (२) मातृसुख अल्प, राजवर्गानें पूज्य; ( ३ ) खर्चिक; ( ४ ) रूपवान्, राजवर्गाशीं मैत्री जोडणारा, परोपकारी, अधिकारी.

पूर्वाषाढा—( १ ) दिसण्यांत शूर, चंचल; ( २ ) अनुष्ठानरत, गोड बोलणारा; ( ३ ) तऱ्हेतऱ्हेचीं वस्त्रें वापरणारा गुणग्राही, स्थावर मिळकत बाळगून असलेला, पृथ्वीपति; ( ४ ) कठोरभाषणी, असत्यवादी, पितृद्वेषी.

उत्तराषाढा—( १ ) स्थूल शरीर, नम्र, बुद्धिमान्, गुरु-

ब्राह्मणांचे ठिकाणीं रत; ( २ ) दुष्कर्मे करणारा, द्वेषी; ( ३ ) स्थूल शरीर, शूर, मोठ्या नखांचा, सुखहीन, रोगी; ( ४ ) ज्याला पुष्कळ स्नेही आहेत असा, धर्मबुद्धि, रहस्यज्ञ.

श्रवण—( १ ) कलहप्रिय, गुह्यरोगी, अल्पप्रतापी; ( २ ) कामी, शत्रुपीडित; ( ३ ) पंडित, वादप्रिय, उदार, धनवान्; ( ४ ) स्त्रीप्रिय, धनी व भोगी.

धनिष्ठा—( १ ) पराक्रमी, संतापी, नृत्यगायनप्रिय; ( २ ) नपुंसकाप्रमाणें वागणारा, उत्साही, शास्त्रज्ञ, सुखी, लोभी, व्यग्रचित्त; ( ३ ) गुणी, ज्योतिषी, दयावान्, सुशील; ( ४ ) कृतघ्न, क्रूर, स्थूलदेही.

शततारका—( १ ) गोब्राह्मणसेवक, सत्यवादी, सभेमध्यें जड; ( २ ) उग्र स्वभावाचा, मंदबुद्धि, क्रूरकर्मी; ( ३ ) अनाचार करणारा, दुष्टकार्योत्सुक, दुर्बल, कृतघ्न; ( ४ ) सत्कार्यें करणारा, अभिमानी, लोकप्रिय, त्यागी, सत्संगति धरणारा.

पूर्वाभाद्रपदा—( १ ) उद्योगी, संततीचे ठिकाणीं आसक्त; ( २ ) प्रसन्नान्तःकरण, मातृसुख अल्प; ( ३ ) प्रेमळस्वभावी, पराक्रमी, पितृसेवारत; ( ४ ) शांतस्वभावी, लोकप्रिय, स्त्रीचे ठायीं आसक्त, धनधान्यसमृद्धियुक्त.

उत्तराभाद्रपदा—( १ ) पंडित, धर्मशील, राजवर्गानें पूज्य, पुत्रवान्; ( २ ) लोभी, उत्साही; ( ३ ) बुद्धिमान, शास्त्रज्ञ, भोगी, परोपकारी; ( ४ ) बुद्धिहीन, क्रोधी, रक्तरोगी, स्वहिताकडे न पहाणारा, द्वेष्टा, दुष्टबुद्धि.

रेवती—( १ ) तत्त्वज्ञ, सुभग, शान्त; ( २ ) दुर्मति; ( ३ ) दुर्विचारी, मंदगति; ( ४ ) सुभग, शान्त.

## योगफल.

विष्कंभक–धनवान्, पशुमान, शत्रूंना जिंकणारा.

प्रीति–परस्त्रीवश.
आयुष्मान्–दीर्घायु, निरोगी.
सौभाग्य–सुखी.
शोभन–भोगी.
अतिगंड–खुनी, धनवान्.
सुकर्मा–धर्मशील.
धृति–परस्त्रीरत, परधनभोक्ता.
शूल–रागीट, भांडखोर.
गंड–दुराचारी.
वृद्धि–पंडित.
ध्रुव–अतिधनवान.
व्याघात–घातक.
हर्षण–ज्ञानी, यशस्वी.
वज्र–धनवान्, कामी.
सिद्धि–सर्व जनांचा आश्रित.
व्यतीपात–राजवैभवी, कपटी.
वरीयाण–दुष्कर्मी.
परिघ–द्वेषी, धनवान्.
शिव–शास्त्रज्ञ, धनवान्.
सिद्धि–धर्मपरायण, यज्ञकर्ता.
साध्य–शुभाचारवान्.
शुभ–सुंदर, धनवान्, कामातुर, कफप्रकृति.
शुक्ल–धर्मरत, वक्ता, रागीट, चंचल, पंडित.
ब्रह्म–मानी, कृपण, राजाश्रित.
ऐंद्र–उपकारी, सर्वज्ञ, श्रीमंत.
वैधृति–मायावी, निंदक, बलवान्, दाता, धनवान्.

### करणफल.

बव—पराक्रमी.

बालव—राजपूज्य, नम्र.

कौलव—घोडे, हत्ती वगैरे बाळगणारा.

तैतिल—मधुरभाषणी, पुण्यशील.

गर—शत्रूंस जिंकणारा, प्रतापी.

वणिज—वक्ता, जार.

विष्टि—( कल्याणी )—सर्व जनांशीं विरोध करणारा, पापकर्मी, स्वतंत्र.

शकुन—ज्योतिषी, सर्वज्ञ.

चतुष्पद—बुद्धिमान्, धनवान्, यशस्वी.

नाग—तेजस्वी, बलवान्, वाचाल.

किंस्तुघ्न—परकार्य करणारा, चपल, हास्यप्रिय.

### ग्रहांचें बळ व भाग्योदयाचा काळ.

रवि— स्वगृहीं, उच्च राशीस, मित्रक्षेत्रीं, मूलत्रिकोणीं व ३।६।१०।११ या स्थानीं रवि असतां बलवान् असतो. रवि प्रायः २२ वे वर्षापासून भाग्योदयास आरंभ करतो.

चंद्र— स्वगृहीं, उच्च राशीस, मित्रक्षेत्रीं, मूलत्रिकोणीं व ३।४ ५।६।९।१०।११ या स्थानीं चंद्र असतां बलवान् असतो व चांगलें फळ देतो. चंद्र प्रायः २४ वे वर्षापासून भाग्योदयास कारण होतो.

मंगळ—स्वगृहीं, उच्च राशीस, मित्रक्षेत्रीं, मूलत्रिकोणीं व ३।६ १०।११ या स्थानीं मंगळ असतां बलवान् असतो. इतर राशीस असेल तर बलहीन जाणावा. मंगळ प्रायः २८ वे वर्षापासून भाग्योदय करतो.

बुध—स्वगृहीं, उच्च राशीस, मित्रक्षेत्रीं, मूलत्रिकोणीं व १।२।३

४।५।७।९।१०।११ या स्थानीं असतां बलवान् जाणावा. बुध प्रायः ३२ वे वर्षापासून भाग्योदयास आरंभ करतो.

गुरु–स्वगृहीं, उच्च राशीस, मित्रक्षेत्रीं, मूळत्रिकोणीं व १।२ ३।४।५।७।९।१०।११ या स्थानीं गुरु असतां बलवान् जाणावा. गुरु प्रायः १६ वे वर्षापासून भाग्योदयास कारण होतो.

शुक्र–स्वगृहीं, उच्च राशीस, मित्रक्षेत्रीं व मूळत्रिकोणीं शुक्र असतां बलवान् असतो. १।२।३।४।५।७।९।१०।११ या स्थानीं पापग्रहरहित असेल तर बलवान् असतो. शुक्र प्रायः २४ वे वर्षापासून भाग्योदय करतो.

शनि–स्वगृहीं, उच्च राशीस, मित्रक्षेत्री, मूळत्रिकोणीं व ३।६ ७।१०।११ या स्थानी शनि असतां बलवान् असतो. शनि प्रायः ३० वे वर्षापासून भाग्योदय करतो.

## लग्नफलविचार.

मेष लग्न असेल तर जन्मणारा व्हस्व शरीराचा, तांबड्या वर्णाचा, वाटोळ्या व लाल डोळ्यांचा, भोजनास उष्ण पदार्थ प्रिय असणारा, अल्पाहारी, लवकर प्रसन्न होणारा, भ्रमण करणारा, मैथुन थोडें, जांघेत मांस थोडें, निर्द्रव्य, शूर, स्त्रीप्रिय, दुसऱ्याची नोकरी करणारा, आर्जवी, वाईट नखांचा, मस्तकावर फोड पुष्कळ असलेला, गर्विष्ठ, श्रेष्ठ, चंचल व पाण्यापासून भीति आहे असा असतो.

वृषभ लग्न–गोरा, विलासी, तोंड, खांदे, छाति, पाठ, मांड्या मोठ्या असलेला, दयाळू, कंटक, अविकारी, बहुवात्यक, कफप्रकृति, लोकप्रिय, क्षमाशील, बहुत आहार असलेला, स्त्रीप्रिय, बहुमित्र, बाळपणी दुःखी, तरुणपणी व वृद्धपणीं सुखी, बंधु धन कुटुंब अंतीं रहाणार नाही असा, वृषभ लग्नावर जन्मलेला मनुष्य असतो.

मिथुन लग्न—स्त्रियांचा अभिलाष करणारा, कोकशास्त्रांत प्रवीण, लाल नेत्रांचा, कुरळ केसांचा, चतुर, शास्त्रज्ञ, नोकर, बुद्धिमानांचें इंगित जाणणारा, जुगार खेळणारा, गीतनृत्यप्रिय, सुंदर, मधुरभाषणी, पुष्कळ खेळणारा, नपुंसकांशीं सहवास करणारा, उंच नाकाचा, असा मिथुन लग्नावर जन्मलेला मनुष्य असतो.

कर्क लग्न—मध्यम शरीरी, जलद चालणारा, स्त्रीच्या कह्यांत रहाणारा, शूर, मित्राचें सुख असलेला, ज्योतिषी, द्रव्य मिळविणारा व नाश करणारा, गोड बोलणारा, असा कर्क लग्नावर जन्मलेला मनुष्य असतो.

सिंह लग्न—दीर्घ शरीरी, अधार्मिक, हनुवटी, गाल व तोंड मोठें असा, पिंगट नेत्रांचा, पराक्रमी, क्रोधी, अल्पसंतति, स्त्रीद्वेषे, अरण्यपर्वतप्रिय, मळलाच वेळेस जेवणारा व पाणी पिणारा पोटाला, दांतांना व मनाला पीडा असलेला, दयाळू, स्थिरबुद्धि गर्विष्ठ, मातृभक्त, असा सिंह लग्नावर जन्मलेला मनुष्य असतो.

कन्या लग्न—उत्तम शरीराचा, लज्जाशील, गंभीरदृष्टि, सौम्यदृष्टि, प्रियभाषणी, सत्यप्रिय, धर्मशील, नृत्यवाद्यगीतचित्रकलाकुशल, पंडित, बुद्धिमान्, उद्योगी, प्रवासी, पुत्र थोडे, कन्या अधिक, असा कन्या लग्नावर जन्मलेला मनुष्य असतो.

तूळ लग्न—उंच, देवब्राह्मणांचा व साधुसंतांचा सन्मान करणारा, स्मरणशक्ति विशेष आहे असा, बुद्धिमान, विचारी, पवित्र, अग्निहोत्री, चंचल, प्रवासी, धनवान, परधनेच्छु, क्रयविक्रयकुशल, पदवीधर, सुभग, रोगी, कुटुंबावर उपकार करणारा, मातृद्वेषी, असा तूळ लग्नावर जन्मलेला मनुष्य असतो.

वृश्चिक लग्न—विशाल नेत्र, विशालवक्ष, मातृपितृगुर्वाज्ञापालक, पिंगट वर्णाचा, राजदरबारीं वास करणारा, दुःस्वभावी, असा वृश्चिक लग्नावर जन्मलेला मनुष्य असतो.

धनु लग्न—उंच मान असलेला, बापाचें धन मिळालेला, दयाळु, कवि, सुभाषणी, दांत कान व नाक मोठें असा, उद्योगी, उत्तर वयांत कुबड येणारा, प्रौढ धार्मिक, बंधुद्वेष्टा, बलवान्, गर्विष्ठ, मधुरभाषणी असा धनु लग्नावर जन्मलेला मनुष्य असतो.

मकर लग्न—स्त्रीपुत्रांवर प्रेम करणारा, दांभिक, सुनेत्र, तनुकटि, सर्वांचा विचार ऐकणारा, सर्वांना प्रिय, आळशी, थंड शरीराचा, भटकणारा, विद्वान्, काव्यज्ञ, लोभी, निर्लज्ज, निर्दय असा मकर लग्नावर जन्मलेला मनुष्य असतो.

कुंभ लग्न—शरीरावर पुष्कळ शिरा असलेला, मूर्ख, परस्त्रीविषयीं साभिलाष, परद्रव्याभिलाषी, पापी, पुष्पचंदनप्रिय, मित्रांना प्रिय, असा कुंभ लग्नावर जन्मलेला मनुष्य असतो.

मीन लग्न—सुंदर, विशालमस्तक, मोत्यांचा क्रयविक्रय करणारा, स्त्रीविषयीं आसक्त, लहानथोरांचा पोषण करणारा, शत्रूचा पराभव करणारा, कांतिमान्, धनवान, अकल्पित द्रव्यलाभ पावणारा असा मीन लग्नावर जन्मलेला मनुष्य असतो.

## सूर्यराशिफल.

जन्मकुंडलीमध्यें द्वादशराशिस्थ सूर्याचीं फलें पुढें दिलीं आहेत.

मेष राशीचा सूर्य असेल तर प्रख्यात, चतुर, दक्ष, भ्रमणशील, अल्पवित्त व शस्त्रधारी होतो.

वृषभ राशीचा सूर्य असेल तर वस्त्रें, सुगंधी पदार्थ व व्यापार यांवर उपजीविका करणारा, स्त्रीद्वेष्टा व गायनवादनांत कुशल होतो.

मिथुन राशीचा सूर्य असेल तर विद्वान्, ज्योतिषी व द्रव्यवान् होतो.

कर्क राशीचा सूर्य असेल तर तीव्र, निर्धन, परोपकारी, श्रम व मार्ग यांनीं क्लेश पावणारा असा होतो.

सिंह राशीचा सूर्य असेल तर वनें, डोंगर व गुरें यांविषयीं भक्ति बाळगणारा, दांडगा व मूर्ख होतो.

कन्या राशीचा सूर्य असेल तर लेखन, वाचन, काव्य, गणित यांमध्यें प्रवीण व स्त्रीलक्षणी देह धारण करणारा होतो.

तूळ राशीचा सूर्य असेल तर मद्यविक्रयी, मार्गरत, सोन्याचा व्यवहार करणारा व नीच होतो.

वृश्चिक राशीचा सूर्य असेल तर क्रूर, साहसी, विषापासून धन संपादन करणारा व शस्त्रनिपुण होतो.

धनु राशीचा सूर्य असेल तर पूज्य, सधन, तीव्र वैद्य व आचारी होतो.

मकर राशीचा सूर्य असेल तर नीच, मूर्ख, वाईट उदीम करणारा, अल्पधनी, लोभी व परभाग्यावर अवलंबून असणारा होतो.

कुंभ राशीचा सूर्य असेल तर नीच, पुत्रांनीं सोडलेला, भाग्यभ्रष्ट व निर्धन होतो.

मीन राशीचा सूर्य असेल तर मोत्यें, पोंवळीं वगैरे पदार्थांच्या व्यापारानें द्रव्यवान् व स्त्रियांपासून आदर पावणारा होतो.

## चंद्रराशिफल.

मेष राशीचा चंद्र असेल तर ताम्र व वर्तुल नेत्र, भाज्या वगैरे पदार्थ ऊन ऊन भक्षण करणारा, पोटक्यांत प्रसन्न होणारा, हिंडत रहाणारा, कामी, गुह्यामध्यें दुर्बल, अस्थिरधन, शूर, स्त्रियांस प्रिय, सेवाकर्मांत चतुर, वाईट नखांचा, डोक्यावर शस्त्रजन्य वगैरे व्रण, मानी, भावंडांत वडील, तळहातावर शक्ति चिन्ह असलेला, फार चपळ व भित्रा होतो.

वृषभ राशीचा चंद्र असेल तर देखणा, खेळत चालणारा, विशाळ मांड्याचा, मोठ्या तोंडाचा, पार्श्वभाग व तोंड यावर कांहीं चिन्हें असलेला, उदार, कंटक, समर्थ, छत्रचामर इत्यादिकांनीं

युक्त, कन्याप्रज, कफयुक्त, पूर्वीचे बंधु अथवा धन यांनीं विरहित, निपुत्रिक, भाग्यवान्, क्षमावान्, ज्याचा जठराग्नि प्रदीप्त आहे असा, स्त्रियांना प्रिय, सुस्थिरमित्र आणि तारुण्यामध्यें व वृद्धावस्थेमध्यें सुखी असा होतो.

मिथुन राशीचा चंद्र असेल तर स्त्रियांचा अभिलाषी, सुरतप्रसंगीं विलास करणारा, आरक्तनेत्र, शास्त्रज्ञ, सेवक, कुरळ केशांचा, कुशलमति, हंसणारा, मर्मज्ञ, द्युतकर्मी, देखणा, प्रियवक्ता, लादाड, नृत्यगायनांमध्यें उत्सुक, नपुंसकांशीं स्नेह करणारा व सुरेख नाकाचा होतो.

कर्क राशीचा चंद्र असेल तर किंचित् वक्र व शीघ्र गमन करणारा, उच्चनितंबी, स्त्रियेच्या अधीन, सन्मित्रवान्, दैवज्ञ, पुष्कळ घरांचा मालक, पुन्हां पुन्हां निकृष्ट दशेस व भाग्योदयास जाणारा, ल्हान पण मांसल अशा मानेचा, सामोपायानें वश होणारा, मित्रवत्सल, जल व उद्यानें धरून विहार करणारा होतो.

सिंह राशीचा चंद्र असेल तर तीक्ष्ण स्वभावाचा, मोठी हनुवटी व तोंड असा, घाऱ्या नेत्रांचा, अल्पसंतति, स्त्रीद्वेषी, मांसभक्षक, शैलवनांत विहार करणारा, विनाकारण रागावणारा, क्षुधा तृषा उदर चित्त दंत यांच्या व्यथेनें पीडित, उदार, पराक्रमी, स्थिरमति, मनांत गर्विष्ठ व मातृभक्त होतो.

कन्या राशीचा चंद्र असेल तर सलज्ज मंद व रम्य असें अवलोकन व गमन करणारा, बाहूंमध्यें शिथिल, सुखी, मृदुभाषणी, सत्यरत, कलाकुशल, शास्त्रज्ञ, धार्मिक, मेधावी, रतिप्रिय, दुसऱ्यांचीं घरें व धनें यांचा व्यवहार करणारा, विदेशवासी, प्रियवक्ता व कन्याप्रज होतो.

तूळ राशीचा चंद्र असेल तर देव ब्राह्मण व साधु यांची पूजा करणारा, प्राज्ञ, बुद्धिमान्, पवित्र, स्त्रीजित, उंच, उंच नाकाचा,

कृश व शिथिल गात्रांचा, भ्रमत राहणारा, द्रव्यवान्, हीनांग, क्रयविक्रयांत कुशल, देवांच्या दोन नांवांनीं प्रसिद्ध, पीडायुक्त, बंधूवर उपकार करणारा व बंधूकडून अपमान पावणारा होतो.

वृश्चिक राशीचा चंद्र असेल तर मोठे डोळे, मोठें हृदय, जंघा जानु व मांड्या वर्तुळाकार असा, माता पिता व गुरु यांनीं त्याग केलेला, बाल्य वयांत रोगी, राजाला व स्ववंशामध्यें मान्य, पिंगळा, खोडकर, हस्ताचे ठायीं मत्स्य वज्र व पक्षी या चिन्हांच्या रेषा धारण करणारा व चोरून पापाचरण करणारा होतो.

धनु राशीचा चंद्र असेल तर दीर्घ कंठ व मुख असा, पूर्वजांनीं संपादन केलेल्या द्रव्याचा धनी, दाता, कवि, शक्तिमान्, वक्ता, विशाल कर्ण, जाड ओंठ, मोठे दांत व मोठें नाक धारण करणारा, उद्योगी, शिल्पज्ञ, कुब्जस्कंध, वाईट नखांचा, मांसल दंडांचा, प्रगल्भ, धर्मज्ञ, बंधुद्वेषी, भीतीनें वश न होणारा व सामोपायानें मात्र वश होणारा असा होतो.

मकर राशीचा चंद्र असेल तर स्त्रीपुत्रांचे नेहमीं लाड करणारा, दांभिक, कमरेखालीं कृश, कमरेंत सूक्ष्म, सुलोचन, सांगितलेलें वाक्य शीघ्र ग्रहण करणारा, सात्विक, कवि, लोभी, वृद्ध किंवा अगम्य स्त्रियांशीं रत होणारा, निर्लज्ज व निर्दय होतो.

कुंभ राशीचा चंद्र असेल तर उंटासारखी लांब मान असलेला, शिरांनीं युक्त शरीर, खरखरीत केश, विशाल तनु, मोठे पाय, मोठ्या मांड्या, मोठी पाठ, मोठी कंबर व मोठें तोंड असलेला, वृद्ध, परस्त्रीरत, पापिष्ट, क्षयवृद्धि पावणारा, गंधमाल्यांचा अभिलाषी व प्रवासांत संशिक असा होतो.

मीन राशीचा चंद्र असेल तर परधन व जल यांचा भोक्ता, वस्त्रें व स्त्री यांचे ठायीं आसक्त, सुंदर व सारख्या अंगाचा, उंच नाक व मोठें मस्तक असलेला, शत्रूंचा पराजय करणारा, स्त्रीजित, उत्तम

डोळ्यांचा कांतिमान्, संचित द्रव्य उपभोगणारा व पंडित होतो.

## मंगळराशिफल.

मेष राशीचा मंगळ असेल तर राजपूजित भ्रमणशील, सैन्यनायक, श्रीमंत, व्यापारी, व्रणशरीरी, तस्कर व विषयी होतो,

वृषभ राशीचा मंगळ असेल तर स्त्रीजित, आप्तद्वेषी, परदाररत, इंद्रजाली, सुवेष, भीरु व कठोर होतो.

मिथुन राशीचा मंगळ असेल तर उग्र, पुत्रवान्, मित्ररहित, कृतज्ञ, गीतकुशल, युद्धपटु, कृपण, निर्भय व याचक होतो.

कर्क राशीचा मंगळ असेल तर द्रव्यवान्, जलपर्यटनानें द्रव्य मिळविणारा, ज्ञाता, अंगहीन व खळ होतो.

सिंह राशीचा मंगळ असेल तर निर्धन, संकटें सहन करणारा, वनचर, अल्पस्त्रीक व अल्पपुत्र होतो. .

कन्या राशीचा मंगळ असेल तर उग्र, पुत्रवान्, मित्ररहित कृतज्ञ, गीतकुशल, युद्धपटु, कृपण, निर्भय व याचक होतो.

तुळ राशीचा मंगळ असेल तर स्त्रीजित, आप्तद्वेषी, परदाररत, इंद्रजाली, सुवेष, भीरु व कठोर होतो. .

वृश्चिक राशीचा मंगळ असेल तर राजपूजित, भ्रमणशील, सैन्यनायक, श्रीमंत, व्यापारी, व्रणशरीरी, तस्कर व विषयी होतो.

धनु राशीचा मंगळ असेल तर अनेकांचा शत्रु, राजमंत्री, प्रख्यात, निर्भय व अल्पसंतति होतो.

मकर राशीचा मंगळ असेल तर दुःखी, निर्धन, लबाड व दीन होतो.

कुंभ राशीचा मंगळ असेल तर द्रव्यवान्, बहुपुत्रवान् आणि राजा अथवा मोठा भाग्यवान् होतो.

मीन राशीचा मंगळ असेल तर अनेकांचा शत्रु, राजमंत्री, प्रख्यात, निर्भय व अल्पसंतति होतो.

## बुधराशिफल.

मेष राशीचा बुध असेल तर जुगारी, ऋणी, मद्यपी, नास्तिक, चोर, दरिद्री, कुत्सित स्त्रीचा पति, दांभिक व असत्यानुरक्त होतो.

वृषभ राशीचा बुध असेल तर आचार्य, बहुपुत्र, बहुस्त्रियांचा पति, धनार्जनाविषयीं उत्सुक, उदार व गुरुभक्त होतो.

मिथुन राशीचा बुध असेल तर वाचाळ, शास्त्रकलेंत कुशल, प्रियवादी व सुखासक्त होतो.

कर्क राशीचा बुध असेल तर जलकर्मानें द्रव्य मिळविणारा व स्वजनद्वेषी होतो.

सिंह राशीचा बुध असेल तर स्त्रीद्वेषी, निर्धन, अपुत्र, दुःखी, भ्रमणशील, मूर्ख, स्त्रीचपळ व स्वपराक्रमी होतो.

कन्या राशीचा बुध असेल तर दाता, शहाणा, बहुगुणी, सुखी, सोशिक, युक्तिवान् व भयहीन होतो.

तुळ राशीचा बुध असेल तर आचार्य, बहुपुत्र, बहुस्त्रियांचा पति, धनार्जनाविषयीं उत्सुक, उदार व गुरुभक्त होतो.

वृश्चिक राशीचा बुध असेल तर जुगारी, ऋणी, मद्यपी, नास्तिक, चोर, दरिद्री, कुत्सित स्त्रीचा पति, दांभिक व असत्यानुरक्त होतो.

धनु राशीचा बुध असेल तर राजपूजित, पंडित व व्यवहारज्ञ होतो.

## गुरुराशिफल.

मेष राशीचा गुरु असेल तर सेनापति, द्रव्यवान्, पुष्कळ स्त्रियांचा पति, बहुपुत्र, दाता, सत्सेवकवान्, सहनशील, तेजस्वी, थोर मनाचा, गुणी व विख्यात होतो.

वृषभ राशीचा गुरु असेल तर पुष्टदेही, सधन, मित्रवान्, सुहृद्वान्, पुत्रवान्, उदार व लोकप्रिय होतो.

मिथुन राशीचा गुरु असेल तर बहुपरिवारी, बहुपुत्र, बहुमित्र, मंत्री व सुखी होतो.

कर्क राशीचा गुरु असेल तर रत्नें व स्त्रीपुत्र इत्यादि ऐश्वर्यानें युक्त, बुद्धिमान् व सुखी होतो.

सिंह राशीचा गुरु असेल तर सेनापति, रत्नें व स्त्रीपुत्रादि वैभवानें युक्त, बुद्धिमान् व सुखी होतो.

कन्या राशीचा गुरु असेल तर बहुपरिवारी, बहुपुत्र, बहुमित्र, मंत्री व सुखी होतो.

तूळ राशीचा गुरु असेल तर पुष्टदेही, सधन, मित्रवान्, सुहृद्वान्, पुत्रवान्, उदार व लोकप्रिय होतो.

वृश्चिक राशीचा गुरु असेल तर सेनापति, द्रव्यवान्, पुष्कळ स्त्रियांचा पति, बहुपुत्र, दाता, सत्सेवकवान्, सहनशील, तेजस्वी, थोर मनाचा, गुणी व विख्यात होतो.

धनु राशीचा गुरु असेल तर मांडलिक राजा—राजमंत्री—अथवा सेनापति व द्रव्यवान् होतो.

मकर राशीचा गुरु असेल तर रत्नें व स्त्रीपुत्र इत्यादि, ऐश्वर्यानें युक्त, बुद्धिमान् व सुखी होतो.

मीन राशीचा गुरु असेल तर मांडलिक राजा—राजमंत्री—अथवा सेनापति व द्रव्यवान् होतो.

## शुक्रराशिफल.

मेष राशीचा शुक्र असेल तर परस्त्रीसक्त, त्यांच्या अर्थवादें-करून दीन दशेस जाणारा व कुलकलंक होतो.

वृषभ राशीचा शुक्र असेल तर स्वपराक्रमानें व बुद्धीनें श्रीमंत होणारा, राजपूज्य, स्वजनश्रेष्ठ, प्रसिद्ध व निर्भय होतो.

मिथुन राशीचा शुक्र असेल तर राजकार्य करणारा, द्रव्यवान्, कलाप्रवीण व नीचकर्मे करणारा होतो.

कर्क राशीचा शुक्र असेल तर दोन भार्यांनीं युक्त, याचकवृत्ति, भीरु, गर्विष्ठ व अतिशोकी होतो.

सिंह राशीचा शुक्र असेल तर स्त्रीच्या हातीं द्रव्य गेलेला, सुंदर स्त्रीचा पति व अल्पपुत्र होतो.

कन्या राशीचा शुक्र असेल तर राजकार्य करणारा, द्र व्यवान कलाप्रवीण व नीचकर्मे करणारा होतो.

तूळ राशीचा शुक्र असेल तर स्वपराक्रमानें व बुद्धीनें श्रीमंत होणारा, राजपूज्य, स्वजनश्रेष्ठ, प्रसिद्ध व निर्भय होतो.

वृश्चिक राशीचा शुक्र असेल तर परस्त्रीसक्त व त्यांच्या अर्थवादेंकरून दीन दशेस जाणारा व कुलकलंक होतो.

धनु राशीचा शुक्र असेल तर लोकवंद्य व द्रव्यवान् होतो.

मकर राशीचा शुक्र असेल तर भाग्यवान्, स्त्रीजित व रूपहीन स्त्रीवर फिदा होणारा होतो.

कुंभ राशीचा शुक्र असेल तर भाग्यवान्, स्त्रीजित व रूपहीन स्त्रीवर फिदा होणारा होतो.

मीन राशीचा शुक्र असेल तर विद्वान्, संपन्न, राजपूजित व मोठा भाग्यवान होतो.

## शनिराशिफल.

मेष राशीचा शनि असेल तर मूर्ख, भ्रमणशील, चापटा व आप्तहीन होतो.

वृषभ राशीचा शनि असेल तर अगम्य स्त्रीचे ठायीं आसक्त, अल्पैश्वर्य व पुष्कळ स्त्रियांचा पति होतो.

मिथुन राशीचा शनि असेल तर सुखहीन, संपत्तिहीन, पुत्रहीन, लज्जाहीन, लेखनकलेंत मूढ, रक्षक व श्रेष्ठ होतो.

कर्क राशीचा शनि असेल तर निर्धन, शिथिलदंत, मातृहीन, निपुत्रिक व मूर्ख होतो.

सिंह राशीचा शनि असेल तर मूर्ख, दुःखी, अपुत्र व भारवाहक होतो.

कन्या राशीचा शनि असेल तर सुखहीन, संपत्तिहीन; पुत्रहीन, लज्जाहीन, लेखनकलेंत मूढ, रक्षक व श्रेष्ठ होतो.

तूळ राशीचा शनि असेल तर जनांचा, नगरांचा, सैन्यांचा व गांवचा मुख्य, पूज्य व संपत्तिमान् होतो.

वृश्चिक राशीचा शनि असेल तर बंधन-पावणारा, वध पावणारा चंचल व निर्दय होतो.

धनु राशीचा शनि असेल तर शुभपरिणामी, राजमंदिरीं विश्वासुक, सुपुत्र सुभार्या व धन यांनीं युक्त, सेनापति, नगरपति व ग्रामाचा नियंता होतो.

मकर राशीचा शनि असेल तर अन्यस्त्रीसक्त, धनयुक्त, नगरें, सैन्यें व ग्राम यांचा नायक, मंददृष्टि, मलिन, स्थिरसर्ववान्, गर्भश्रीमंत व भोगी होतो.

कुंभ राशीचा शनि असेल तर अन्यस्त्रीसक्त, धनयुक्त, नगरें, सैन्यें व ग्राम यांचा नायक, मंददृष्टि, मलिन, स्थिरसर्ववान्, गर्भश्रीमंत व भोगी होतो.

मीन राशीचा शनि असेल तर शुभपरिणामी, राजमंदिरीं विश्वासुक, सुपुत्र, सुभार्या व धन यांनीं युक्त, सेनापति, नगरपति व ग्रामाचा नियंता होतो.

## रविभावफल.

रवि प्रथम भावांत म्हणजे तनुस्थानीं उच्च किंवा स्वगृहींचा असेल तर तो मनुष्य कीर्तिवान्, बळकट आणि दूरदृष्टि असतो. नीच असेल तर प्रतापी असतो, ज्ञानी नसतो, दरिद्री व नेत्रविकारी असतो. कर्क राशीचा सूर्य असेल तर ज्ञानी असतो. मकर अथवा कुंभ राशीचा असेल तर छातींत रोगी असतो. धनु अथवा मीन राशीचा असेल तर दुसऱ्याची सेवा करणारा होतो. मिथुन अथवा कन्या राशीचा असेल तर कन्यासंतति होईल व त्यांचें सुख चांगलें लाभणार नाहीं. वृषभ अथवा तूळ राशीचा असेल तर कृतघ्न आणि स्त्रीसुखरहित असतो. मेष अथवा वृश्चिक राशीचा असल्यास प्रतापी, वाचाळ, व्यापारधंद्यांत दक्ष आणि अंतर्गळाच्या व्याधीनें युक्त असतो.

सूर्य द्वितीय भावांत म्हणजे धनस्थानीं असेल तर मुखांत रोग होईल. व राजदंड होईल. पण रवि उच्च किंवा स्वगृहींचा असल्यास हें फळ न मिळतां तो मनुष्य धनवान्, विद्वान्, नेत्ररोगी, कुरूप, तेजस्वी आणि स्वपराक्रमानें पैसा मिळविणारा, वाचाळ आणि ज्ञानी होतो. धनु किंवा मीन राशीचा असेल तर धनवान्, वाचाळ, कुटुंबापासून सुख पावणारा व मित्रांकरितां धन खर्चणारा असतो. मिथुन किंवा कन्या राशीचा असेल तर ज्ञानी व कुटुंबापासून क्लेश पावणारा असतो; त्याला धन मिळतें व तें जातें. वृषभ किंवा तूळ राशीचा असेल तर कुटुंबसुख व द्रव्यप्राप्ति यांचा अभाव असतो. मकर किंवा कुंभ राशीचा असेल तर धननाश व कुटुंबक्लेश होतात. कर्क राशीचा असेल तर कुटुंबांत प्रमुख असतो. मेष अथवा वृश्चिक राशीचा असेल तर स्वपराक्रमानें धन मिळविणारा व वाचाळ असतो.

सूर्य तृतीय स्थानीं म्हणजे सहजस्थानीं स्वगृहींचा किंवा उच्च असेल तर बुद्धिमान् असतो, बंधुसुख मिळतें व पदरीं नोकरचाकर

असतात. वृषभ किंवा तूळ राशीचा असेल तर बंधुसुख लाभणार नाहीं व पदरीं नोकर असणार नाहींत. कर्क राशीचा असेल तर बंधुसुख लाभेल, व्यापारधंदा चांगला चालेल आणि कीर्तिमान असेल. मिथुन किंवा कन्या राशीचा असेल तर शूर व बुद्धिमान् असून बंधु थोडे असतील. मेष किंवा वृश्चिक राशीचा असेल तर बंधु होणार नाहींत; झाले तरी त्यांपासून सुख लाभणार नाहीं. धनु किंवा मीन राशीचा असेल तर बंधूबरोबर स्नेह राहील; पण नोकर वाईट मिळतील. मकर किंवा कुंभ राशीचा असेल तर बंधुनाश होईल, नोकर वाईट मिळतील आणि नास्तिक असेल.

सूर्य चतुर्थस्थानीं म्हणजे सुहृत्स्थानीं स्वगृहींचा किंवा उच्च असेल तर वाहनसुख—वैभव—व मातापित्यांचे सुख लाभेल आणि भाग्यशाली होईल. वृषभ किंवा तूळ राशीचा असेल तर मातापित्यांपासून सुख मिळणार नाहीं व जनावरांपासून घात होईल. मिथुन किंवा कन्या राशीचा असेल तर मातापित्यांपासून सुखी, वैभवयुक्त, मस्तकरोगी, अहंकारी आणि गुह्यरोगी असतो. कर्क राशीचा असेल तर जमीनजुमल्याचें सुख लाभतें. मेष किंवा वृश्चिक राशीचा असेल तर मित्रापासून सुख, अग्नीपासून भय व अहंकारयुक्त असतो. धनु किंवा मीन राशींत असेल तर मित्र बहुत होतील; पण ते हानिकारक होतील. मकर किंवा कुंभ राशीचा असेल तर शरीरास पीडा असलेला, अहंकारी व विरोधी असून शरीर तप्त व इंद्रियांस पीडा असते.

सूर्य पंचम स्थानीं म्हणजे सुतस्थानीं मेष किंवा सिंह राशीचा असेल तर सुखी, बुद्धिमान्, विद्वान्, संततियुक्त, विवेकी, नीतिनिपुण व मांत्रिक असतो. वृषभ किंवा तूळ राशीचा असेल तर पुत्ररहित, धर्मी, क्रोधी व अल्पविद्य असतो. मिथुन किंवा कन्या राशीचा असेल तर मंदबुद्धि व पुत्राबरोबर कलह करणारा असतो.

कर्क राशीचा असेल तर चंचलबुद्धि व कन्यासंतति असतो. मेष किंवा वृश्चिक राशीचा असेल तर संतति आज्ञाधारक नसते, परंतु पराक्रमी असते. मकर किंवा कुंभ राशीचा असेल तर एक किंवा दोन पुत्र होतील, चंचलबुद्धीचा असून पुत्राबरोबर तंटे होतील आणि म्लेंच्छ विद्येचा अभ्यास करून धनप्राप्ति होईल. धनु किंवा मीन राशीचा असेल तर पुत्ररहित, ज्ञानी, निष्कपटी आणि पुण्यवान् असतो.

सूर्य षष्ठ स्थानीं म्हणजे रिपुस्थानीं मेष किंवा सिंह राशीचा असेल तर मातुलपक्षाकडून सुख मिळेल आणि रोग व शत्रु यांचा नाश होईल. वृषभ किंवा तूळ राशीचा असेल तर रोग व शत्रु यांची वृद्धि होते आणि मातुलपक्षाकडून सुख मिळत नाहीं. मिथून किंवा कन्या राशीत असेल तर शत्रुनाश करील व कफाची व्यथा होईल. कर्क राशीचा असेल तर दमा होईल. धनु किंवा मीन राशीचा असेल तर शत्रुनाश, मातुलसुख, शांत स्वभाव, शरीरसुख व वैभव मिळेल. मकर किंवा कुंभ राशीचा असेल तर रोग व शत्रु यांची वृद्धि होईल, मातुलपक्षाचें सुख मिळेल. मेष किंवा वृश्चिक राशीचा असेल तर रोग व शत्रु होणार नाहींत, पण मातुलसुख लाभणार नाहीं.

सूर्य सप्तम स्थानीं म्हणजे जायास्थानीं स्वगृहीचा अथवा उच्च असेल तर स्त्रीसुख चांगलें लाभेल, अन्य देशांतून लाभप्राप्ति होईल, व्यापारांत सुख लाभेल. वृषभ किंवा तूळ राशीचा असेल तर स्त्री दीर्घायु मिळेल पण स्वतः व्यभिचारी असून स्वस्त्रीवर प्रेम ठेवणार नाहीं. मेष किंवा वृश्चिक राशीचा असेल तर द्विभार्य व प्रवासी होईल. मिथुन किंवा कन्या राशीचा असेल तर अभक्ष्य-भक्षक, हलक्या प्रतीचें अन्न खाणारा परंतु आनंदी राहील. कर्क राशीचा असेल तर मानसिक चिंता व नपुंसक व्याधि होतील.

मकर किंवा कुंभ राशीचा असेल तर स्त्रीसुखाचा नाश, प्रवासांत भय व व्यापारांत दुःख होईल. धनु किंवा मीन राशीचा असेल तर व्यापारासंबंधानें सर्व प्रकारची माहिती उत्तम असेल.

सूर्य अष्टम स्थानीं म्हणजे मृत्युस्थानीं स्वगृहींचा अथवा उच्च असेल तर दीर्घायु व वैभवानें युक्त होईल. वृषभ किंवा तूळ राशीचा असेल तर पुत्र-द्रव्य प्राप्त होणार नाहीं. मेष किंवा वृश्चिक राशीचा असेल तर नेत्रांस विकार होईल, उष्णतेचे विकार होतील व पशूचें सुख लाभणार नाहीं. मिथुन किंवा कन्या राशीचा असेल तर रोगी होईल. धनु किंवा मीन राशीचा असेल तर शरीरास नेहमीं रोग होतील व धनप्राप्ति चांगली होणार नाहीं. मकर किंवा कुंभ राशीचा असेल तर अल्पायु व दरिद्री जाणावा. कर्क राशीचा असेल तर नेत्रांस विकार होईल.

सूर्य नवम स्थानीं म्हणजे धर्मस्थानीं स्वगृहींचा अथवा उच्च असेल तर पुण्यवान्, धनवान् व संतानसुखी असतो. वृषभ किंवा तूळ राशीचा असेल तर अल्पभाग्य समजावा. मिथुन किंवा कन्या राशीचा असेल तर संतानसुख व स्त्रीसुख मिळेल. धनु किंवा मीन राशीचा असेल तर आईबापांचें सुख व प्रवासी असून प्रवासांत फायदा होईल. मकर किंवा कुंभ राशीचा असेल तर अल्प भाग्यवान् व धर्मलंड जाणावा. मेष किंवा वृश्चिक राशीचा असेल तर पापबुद्धि व पापकर्मी जाणावा. कर्क राशीचा असेल तर भाग्यवान् व देशांतरीं गमन करणारा होतो.

सूर्य दशम स्थानीं म्हणजे कर्मस्थानीं स्वगृहींचा अथवा उच्च असेल तर राजदरबारी मानमरातब व पित्याचें सुख लाभेल. वृषभ किंवा तूळ राशीचा असेल तर पित्याचें सुख थोडें, राजदरबारीं अपयश व लोकांतहि अपकीर्ति होईल. कर्क राशीचा असेल तर कीर्तिमान् होईल. मिथुन किंवा कन्या राशीचा असेल तर

राजसुखी होईल. धनु किंवा मीन राशीचा असेल तर राजसुख मिळेल व राजकीय कामांत कुशल असेल. मेष किंवा वृश्चिक राशीचा असेल तर कीर्तिमान् व शूर असतो. मकर किंवा कुंभ राशीचा असेल तर राजदरबारीं मान्य नसलेला, अपेशी, व्यापारांत अपेशी आणि आईबापांचें सुख अल्प असा असतो.

सूर्य एकादशस्थानीं म्हणजे आयस्थानीं स्वगृहींचा अथवा उच्च असेल तर अनेक प्रकारचा लाभ होईल. वृषभ किंवा तूळ राशीचा असेल तर दरिद्री होईल व संतानाचा द्वेष करील. मिथुन किंवा कन्या राशीचा असेल तर यशस्वी आणि धनवान् जाणावा. कर्क राशीचा असेल तर संतानसुख व वस्त्रलाभ होईल. मेष किंवा वृश्चिक राशीचा असेल तर अपल्याशीं रोष करणारा, कुबुद्धि असून द्रव्याचा फायदा होईल. धनु किंवा मीन राशीचा असेल तर बुद्धिमान, संततियुक्त व अनेक प्रकारांनीं लाभ पावणारा होईल. मकर किंवा कुंभ राशीचा असेल तर नीच मनुष्यापासून नुकसान पावेल व पुत्र मूर्ख होतील.

सूर्य द्वादश स्थानीं म्हणजे व्ययस्थानीं स्वगृहींचा अथवा उच्च असेल तर पुण्यवान्, सत्कर्मी पण कंजुष असतो. वृषभ किंवा तूळ राशीचा असेल तर पापी असतो. मिथुन किंवा कन्या राशीचा असेल तर अल्पधनवान् व अल्पसुखी असतो. कर्क राशीचा असेल तर योग्य कामांत धनाचा व्यय करील. मेष किंवा वृश्चिक राशीचा असेल तर धर्मलंड, ज्ञातिभ्रष्ट, हिंसक व परदेशांत वास करणारा होतो. धनु किंवा मीन राशीचा असेल तर संसारसुख अल्प, धन अल्प पण धनाचा विनियोग सत्कृत्यांत करील. मकर किंवा कुंभ राशीचा असेल तर पापकर्मांत द्रव्य खर्चील व रोगी असेल.

## चंद्रभावफल.

चंद्र प्रथम स्थानीं स्वगृहींचा अथवा उच्च असेल तर शरीर

सुंदर, निरोगी, चंचल आणि विद्वान् होईल. मेष किंवा वृश्चिक राशीचा असेल तर दरिद्री. वृषभ किंवा तुळ राशीचा असेल तर ह्यातांस रोग. मिथुन किंवा कन्या राशीचा असेल तर धनवान्, सुखी, स्वकुळांत श्रेष्ठ, राजदरबारांत अधिकारी आणि गोड भाषण करणारा. सिंह राशीचा असेल तर नेत्ररोगी. धन किंवा मीन राशीचा असेल तर बुद्धिमान्. मकर किंवा कुंभ राशीचा असेल तर शरीर कुरूप व सदा रोगी.

चंद्र द्वितीय स्थानीं स्वगृहींचा, उच्च अथवा बलवान् असेल तर धनवान्, कुटुंबापासून सुख पावणारा व मृदुभाषणी. मेष किंवा वृश्चिक राशीचा असेल अथवा क्षीण चंद्र असेल तर दरिद्री व कुटुंबक्लेशी. वृषभ किंवा तुळ राशीचा असेल तर धनवान व बहुत कुटुंबांचा पोशिंदा. मिथुन किंवा कन्या राशीचा असेल तर बुद्धिमान्, वैभवयुक्त व सुखी. सिंह राशीचा असेल तर सोतरा व दम्याची व्यथा. धनु किंवा मीन राशीचा असेल तर मृदुभाषणी, वाचाळ आणि प्रतापी. मकर किंवा कुंभ राशीचा असेल तर असंतोषी.

चंद्र तृतीय स्थानीं स्वगृहींचा अथवा उच्च असेल तर पराक्रमी, उदीमधंदा करणारा आणि बंधुसुखी. मेष किंवा वृश्चिक राशीचा असेल तर आळशी, निरुद्योगी व बंधुविरहित. वृषभ किंवा तूळ राशीचा असेल तर साधारण पराक्रमी आणि उद्यम करणारा. मिथुन किंवा कन्या राशीचा असेल तर शरीरांत वायूचा विकार, धनवान व कन्यासंतति. सिंह राशीचा असेल तर ब्हाडखोर व राजदंडापासून संकट पावणारा. धनु किंवा मीन राशीचा असेल तर धनवान्, पशुमान्, बुद्धिमान्, व बंधुसुखी. मकर किंवा कुंभ राशीचा असेल तर अल्पबंधुसुखी, पराक्रमी, उद्यमी, भाग्यवान् आणि पुण्यवान् होतो.

चंद्र चतुर्थ स्थानीं स्वगृहींचा अथवा उच्च असेल तर आईचें सुख, घरदार, शेतवाडी, मित्र आणि वाहनसुख चांगलें मिळतें. मेष किंवा वृश्चिक राशीचा असेल तर शरीरास व्याधि, मातृसुख अल्प, मित्र व पशु यांपासून अल्प लाभ आणि शरीरास एक प्रकारची व्याधि. वृषभ किंवा तूळ राशीचा असेल तर आईस व्याधि. मिथुन किंवा कन्या राशीचा असेल तर द्वितीय स्त्रीलाभ. सिंह राशीचा असेल तर आई व स्वतःहि रोगी. धनु किंवा मीन राशीचा असेल तर मिष्टान्नभोजनीं व अनेक प्रकारच्या वैभवानें युक्त. मकर किंवा कुंभ राशीचा असेल तर परस्त्रीरत, मातापित्यांपासून सुख पावणारा, घरदार—जमीनजुमला—पशु—वाहन—मित्र-वैभव इत्यादिकांपासून सुख पावणारा.

चंद्र पंचम स्थानीं स्वगृहींचा अथवा उच्च असेल तर कन्यासंतति, रूपवती स्त्रीचा पति, बुद्धिमान्, विद्वान् व धनवान्. मेष किंवा वृश्चिक राशीचा असेल तर मंदबुद्धि, अविद्वान्, संतानरोधी व कन्यासंतति. वृषभ किंवा तूळ राशीचा असेल तर कष्टानें निर्वाह करणारा, परंतु विद्वान्. मिथुन किंवा कन्या राशीचा असेल तर पुत्रापासून सुख पावणारा परंतु पुत्र आज्ञाधारक असणार नाहीं. सिंह राशीचा असेल तर राजविद्या व पुत्रप्राप्ति यांचा लाभ होतो. धनु किंवा मीन राशीचा असेल तर धनप्राप्ति, पुत्रप्राप्ति व वैभवप्राप्ति. मकर किंवा कुंभ राशीचा असेल तर मंदमति, नीच कर्मे करणारा व नीच कर्मामध्यें बुद्धीचा व्यय करणारा.

चंद्र षष्ठ स्थानीं स्वगृहींचा अथवा उच्च असेल तर मातुलसुख, रोगनाश व शत्रुनाश. मेष किंवा वृश्चिक राशीचा असेल तर नेहमी रोगी, शत्रुभय, मातृसुख अल्प व दरिद्री. वृषभ किंवा तूळ राशीचा असेल तर पापकर्मे करणारा, विधवा स्त्रियांबरोबर संभोग करणारा व विधवेशीं लग्न लावणारा. मिथुन किंवा कन्या राशीचा

असेल तर घोर पापकर्मे करणारा. सिंह राशीचा असेल तर नेहमीं रोगी. धनु किंवा मीन राशीचा असेल तर रोग, शत्रु व मातुलपक्ष याकडून पीडा. मकर किंवा कुंभ राशीचा असेल तर रोगनाश, शत्रुनाश, मस्तक तेजस्वी, भाग्यवान्, वैभवयुक्त व मातुलसुख पावणारा.

चंद्र सप्तम स्थानीं स्वगृहींचा अथवा उच्च असेल तर मृदुभाषणी व स्त्रीसुख, प्रवाससुख आणि व्यापारात सुख पावणारा आणि बहुलोक. मेष किंवा वृश्चिक राशीचा असेल तर स्थूलशरीरी, घरची व्यवस्था चांगली पहाणारा, विचारी, परदेशामध्यें वास करणारा असून स्त्री व्यभिचारी असते. वृषभ किंवा तूळ राशीचा असेल तर स्त्रीलंपट. मिथुन किंवा कन्या राशीचा असेल तर स्त्रीबरोबर बेबनाव होतो. सिंह राशीचा असेल तर स्त्रीपुरुषांमध्यें तटे होतील. धनु किंवा मीन राशीचा असेल तर राजवैभवी व सुखी. मकर किंवा कुंभ राशीचा असेल तर स्त्री कुमार्गी मिळते.

चंद्र अष्टम स्थानीं स्वगृहींचा अथवा उच्च असेल तर दीर्घायु, निरोगी, धर्मशील व पुण्यकर्मी. मेष किंवा वृश्चिक राशीचा असेल तर अल्पायु, कृशशरीरी व पापकर्मी. वृषभ किंवा तूळ राशीचा असेल तर अल्पायु. मिथुन किंवा कन्या राशीचा असेल तर उदररोग व दम्याची व्यथा. सिंह राशीचा असेल तर बाल्यावस्थेमध्यें क्लेश व दुःख. धनु किंवा मीन राशीचा असेल तर मध्यमायु व मध्यमसुखी. मकर किंवा कुंभ राशीचा असेल तर शरीरास क्लेश व दरिद्री.

चंद्र नवम स्थानीं स्वगृहींचा अथवा उच्च असेल तर पुण्यवान्, तेजस्वी, तीर्थयात्रा करणारा, अनेक शास्त्रें जाणणारा, घरदार व जमीनजुमला बाळगणारा, पुत्रसंतति व भाग्यवान्. मेष किंवा वृश्चिक राशीचा असेल तर पापकर्मे करणारा, कपटी आणि

व्यभिचारी. वृषभ किंवा तूळ राशीचा असेल तर भाग्यवान्. मिथुन किंवा कन्या राशीचा असेल तर पित्याचें सुख लाभेल. सिंह राशीचा असेल तर अल्पकाळांत पिता मरतो. धनु किंवा मीन राशीचा असेल तर नशीबवान्, पुण्यवान्, व अन्य देशीं द्रव्य संपादन करणारा, मकर किंवा कुंभ राशीचा असेल तर कपटी, पापकर्में करणारा, क्रोधी व अल्पभागी.

चंद्र दशम स्थानीं स्वगृहींचा अथवा उच्च असेल तर राजदरबारीं, मान्यता, पितृसुख, कीर्ति, व्यापारांत यश मिळतें व सत्कार्ये करतो. मेष किंवा वृश्चिक राशीचा असेल तर पितृसुख अल्प, व्यापारांत नुकसान व राजभय, परंतु बुद्धि चांगली. वृषभ किंवा तूळ राशीचा असेल तर कीर्ति आणि यश. धनु किंवा मीन राशीचा असेल तर दयावंत. मकर किंवा कुंभ राशीचा असेल तर पापकर्में करणारा, राजभय बाळगणारा आणि पित्याचें सुख अल्प भोगणारा.

चंद्र एकादश स्थानीं स्वगृहींचा अथवा उच्च असेल तर अनेक शास्त्रें जाणणारा, हरएक प्रकारानें द्रव्य मिळविणारा, धनधान्य-वस्त्रप्रावरण-बुद्धि-संतति यांनीं युक्त असून परोपकारी असतो. मेष किंवा वृश्चिक राशीचा असेल तर दरिद्री, मूर्ख, संतानरहित अथवा कन्या संतति जास्त. वृषभ किंवा तूळ राशीचा असेल तर गुणवान् व धनवान्. मिथुन किंवा कन्या राशीचा असेल तर अनेक प्रकारांनीं लाभ पावणारा. सिंह राशीचा अथवा क्षीण चंद्र असेल तर पुत्रापासून द्रव्य घेणारा व प्राप्तीपेक्षां जास्त खर्च करणारा. धनु किंवा मीन राशीचा असेल अथवा चंद्र पौर्णिमेच्या जवळ येणारा असेल तर भूमिगत धन प्राप्त होईल. मकर किंवा कुंभ राशीचा असेल तर अपेसी व खार्चिक.

चंद्र द्वादशस्थानीं स्वगृहींचा अथवा उच्च असेल तर निरोगी,

दीर्घायु व सत्कार्यात द्रव्याचा व्यय करणारा. मेष किंवा वृश्चिक राशीचा असेल तर कदान्न भक्षण करणारा, कुमार्गात द्रव्याचा व्यय करणारा, लहान वयांत पुष्कळ दु.खें सोसणारा व रोगी. वृषभ किंवा तूळ राशीचा असेल तर क्रोधी व्यसनी व संसारांत दु.खी. मिथुन किंवा कन्या राशीचा असेल तर सर्व प्रकारच्या समृद्धीनें युक्त तथापि दु.खभाक्. सिंह राशीचा असेल तर आपल्या जातींत श्रेष्ठ. धनु किंवा मीन राशीचा असेल तर आई नेहमीं रोगग्रस्त. मकर किंवा कुंभ राशीचा असेल तर नेहमीं रोगी असून द्रव्य व वैभव यांचें सुख लाभत नाहीं.

### मंगळभावफल.

मंगळ प्रथम स्थानीं मेष, वृश्चिक अथवा मकर राशीचा असल्यास शरीर निरोगी व सशक्त असून राजकारणामध्यें मान मिळून कीर्ति वाढेल व दीर्घायु होईल. वृषभ किंवा तूळ राशीचा असल्यास नाभी मोठी, बलवान् व शूर. मिथुन किंवा कन्या राशीचा असल्यास मूर्ख आणि क्रोधी. कर्क राशीचा असल्यास चोर, क्रोधी, उष्णतेनें फोड येऊन अंगावर पुष्कळ व्रण व हाताचे पंजे लाल. सिंह राशीचा असल्यास चचल, धनवान्, चित्रकलेंत निपुण व ठक. धनु किंवा मीन राशीचा असल्यास विद्वान् आणि धनवान्. कुंभ राशीचा असल्यास अल्पायु, अल्पसतति, कुरूप आणि वात–शूळ–गरमी यापासून उपद्रव पावणारा.

मंगळ द्वितीय स्थानीं मेष, वृश्चिक अथवा मकर राशीचा असल्यास विद्वान्, वक्ता, धनवान् व कुटुंबी. वृषभ किंवा तूळ राशीचा असल्यास कुटुंबापासून व द्रव्यापासून सुखी, वस्त्र–दागिने–व संपत्ति मिळविणारा, दागिने–घर–व सत्कार्ये यांत पैसे खर्चणारा, अभक्ष्यभक्षक व कुटुंबामध्यें कधीं कधीं तटा मांडण करणारा. मिथुन किंवा कन्या राशीचा असेल तर नेत्ररोगी व

पुष्कळ धन खर्च करूनहि दुःखी. कर्क राशीचा असेल तर नेत्ररोगी, निर्धन, कुटुंबरहित, शरीराने रोगी आणि पापकर्मी. सिंह राशीचा असेल तर नेत्ररोगी, गुह्यरोगी, वैभवयुक्त व उधळ्या. धनु किंवा मीन राशीचा असेल तर राजकीय कामांत धन मिळविणारा, प्रवासी व दुसऱ्याचा मतलब काढून घेणारा. कुंभ राशीचा असेल तर धनहीन, कुटुंबहीन व दुःखी.

मंगळ तृतीयस्थानीं मेष, वृश्चिक अथवा मकर राशीचा असेल तर मोठा पराक्रमी, उद्योगी, बहीण भाऊ पुष्कळ असून त्यांपासून सुख. वृषभ किंवा तूळ राशीचा असेल तर मोठा पराक्रमी पण भावंडें असणार नाहीत. मिथुन किंवा कन्या राशीचा असेल तर भावंडांशीं शत्रुत्व व स्वधर्मावर अप्रीति. कर्क राशीचा असेल तर भावंडें पुष्कळ पण परस्पर वितुष्ट, पदरीं नोकरचाकर बाळगणारा, उद्योगी व जारिणी स्त्रीचा पति. सिंह राशीचा असेल तर एखादें भावंड असेल पण त्याच्याशीं वितुष्ट असेल. धनु किंवा मीन राशीचा असेल तर सत्कर्मरत. कुंभ राशीचा असेल तर पराक्रमहीन, निरुद्योगी, पापकर्मी, नास्तिक, भावंडें जिवंत रहाणार नाहींत किंवा होणार नाहींत.

मंगळ चतुर्थस्थानीं मेष, वृश्चिक अथवा मकर राशीचा असेल तर मातृसुख, घरदार, शेतवाडीचें वैभव, पशुसुख, वाहनसुख व स्थललाभ. वृषभ किंवा तूळ राशीचा असेल तर आई रोगी अथवा आईला पीडा, वाहनापासून भीति अथवा घात. मिथुन किंवा कन्या राशीचा असेल तर घरांत तंटा-भांडण करणारा, मातृपितृसुखहीन, परगृहवासी. कर्क राशीचा असेल तर मातृसुखहीन, गृहहीन, मित्रविरोधी, निर्धन व पशुविरहित. सिंह राशीचा असेल तर जमीन-जुमलाविरहित व मित्रविरोधी. धनु किंवा मीन राशीचा असेल तर धनधान्यसुख, मित्रसुख, वाहनसुख. कुंभ राशीचा असेल तर

स्थानभ्रष्ट, मित्रत्यक्त, पित्याचा अल्पकाळांत मृत्यु, स्त्रीचा अल्पकाळांत मृत्यु, बंधुद्वेषी, जनद्वेषी, परदेशवासी, धनहीन, वस्त्रहीन.

मंगळ पंचमस्थानीं मेष, वृश्चिक अथवा मकर राशीचा असेल तर सूक्ष्मविचारी, तामसी, विद्वान्, संततीपासून सुख भोगणारा, अनेक रीतींनें पैसा मिळविणारा, वस्त्र-दागिने यांचें सुख भोगणारा. वृषभ किंवा तूळ राशीचा असेल तर तामसबुद्धि, रागीट, पापबुद्धि. मिथुन किंवा कन्या राशीचा असेल तर कुकर्मबुद्धि, राजकोपापासून नाश पावणारा, वाईट छंदांत पडणारा, शरीरावर शस्त्राचे घाव पडणारा. कर्क राशीचा असेल तर बुद्धिहीन, संतानहीन, धनहीन. सिंह राशीचा असेल तर एकच पुत्र होईल व तो राजविद्या शिकणारा होईल. धनु किंवा मीन राशीचा असेल तर राजविद्यानिपुण, सूक्ष्मविचारी, सदाचारी, तामसी, संतानापासून सुख न पावणारा. कुंभ राशीचा असेल तर मुलें जगणार नाहींत, पण शेवटीं एकाद्या मुलाचें सुख लाभेल; मंदबुद्धि, मितभाषणी गंभीर स्वभावाचा व अल्प विद्वान्.

मंगळ षष्ठस्थानीं मेष, वृश्चिक अथवा मकर राशीचा असेल तर मातुलपक्षसुखहीन. वृषभ किंवा तूळ राशीचा असेल तर मातुलपक्षसुखहीन व स्त्रीच्या अंगावर कोड उठेल. मिथुन किंवा कन्या राशीचा असेल तर अंगावर कोड उठेल. कर्क राशीचा असेल तर रोगी, बहुशत्रु व मातुलपक्षास सुख देणारा. सिंह राशीचा असेल तर सार्वजनिक कामें करून कीर्ति मिळविणारा, संतानसुख अल्प. धनु किंवा मीन राशीचा असेल तर शत्रूंना जिंकणारा, संतानापासून सुखी, प्रेमयुक्त, रोगी आणि शत्रूंच्या भीतीनें युक्त.

मंगळ सप्तमस्थानीं मेष, वृश्चिक अथवा मकर राशीचा असेल तर स्त्रीसुख, मार्गांत लाभ, व्यापारापासून सुख, देण्याघेण्यांत चतुर. वृषभ किंवा तूळ राशीचा असेल तर परदेशवासी. मिथुन

किंवा कन्या राशीचा असेल तर दोन स्त्रिया होतील पण त्या रोगी असतील अथवा मृत्यु पावतील. कर्क राशीचा असेल तर दोन अथवा अधिक स्त्रिया होतील तरी स्त्रीसुखाचा अभाव, प्रवास भीतिकारक. सिंह राशीचा असेल तर चोर अथवा व्यभिचारिणी स्त्री, धनु किंवा मीन राशीचा असेल तर भगचुंबक, मुष्टिमैथुनी. कुंभ राशीचा असल्यास पशुमैथुनी, दारुबाज, अहंकारी.

मंगळ अष्टम स्थानीं मेष, वृश्चिक अथवा मकर राशीचा असेल तर पूर्णायुषी व निरोगी. वृषभ किंवा तूळ राशीचा असेल तर स्त्रीसुखाचा अभाव, व्यापारांत नुकसान. मिथुन किंवा कन्या राशीचा असेल तर पित्यास कष्ट, एखादें अपत्य, गुह्यरोगी, कर्क राशीचा असेल तर अल्पायुषी व रोगी. सिंह राशीचा असेल तर नेत्ररोगी, अल्पायु, मूत्रकृच्छ्ररोगी. धनु किंवा मीन राशीचा असेल तर व्यापारकुशल, राजाकडून वैभवप्राप्ति, शरीर कृश अथवा दुर्बळ आणि उंच. कुंभ राशीचा असेल तर स्त्री क्रोधी आणि स्वतः व स्त्री अल्पायु.

मंगळ नवमस्थानीं मेष, वृश्चिक अथवा मकर राशीचा असेल तर भाग्यशाली, पुण्यशाली, पुत्रवान, परदेशांत लाभ पावणारा, स्वधर्मरत, साधुसेवक. वृषभ किंवा तूळ राशीचा असेल तर कामशिवी, गुरुपत्नीशीं गमन करणारा, बाप अल्पायु अथवा संकटग्रस्त. मिथुन किंवा कन्या राशीचा असेल तर नास्तिक, धर्मलंड. कर्क राशीचा असल्यास नास्तिक, दुर्भागी, पुत्रविरहित, परदेशांत दुःख पावणारा. सिंह राशीचा असेल तर मातृहीन. धनु किंवा मीन राशीचा असेल तर तीर्थाटन करणारा. कुंभ राशीचा असेल तर नास्तिक.

मंगळ दशमस्थानीं मेष, वृश्चिक अथवा मकर राशीचा असेल तर राजकीय कामांत यश पावणारा, पितृसुखी, व्यापारांत फायदा, कीर्तिमान्, सत्कर्मी. वृषभ किंवा तूळ राशीचा असेल तर पराक्रमी

व बापाचा लाडका. मिथुन किंवा कन्या राशीचा असेल तर बापास पीडा देणारा, मावंडसुखहीन. कर्क राशीचा असेल तर पितृसुखहीन, व्यापारांत हानि, राजद्रोही, राजाच्या अवकृपेमुळें बंधन पावणारा, कीर्तिमान्, अपेशी. सिंह राशीचा असेल तर भाग्यशाली व गुणवान्, धनु किंवा मीन राशीचा असेल तर स्वधर्मरत. कुंभ राशीचा असेल तर कपटी व कावेबाज.

मंगळ एकादश स्थानीं मेष, वृश्चिक अथवा मकर राशीचा असेल तर अनेक प्रकारांनी लाभ पावणारा, वस्त्रसुखी, भूषणसुखी, संतानसुखी, बुद्धिमान्. वृषभ किंवा तूळ राशीचा असेल तर पुष्कळ काम करणारा, धनवान्, गुणवान्. मिथुन किंवा कन्या राशीचा असेल तर मूर्ख व संतानसुखहीन. कर्क राशीचा असेल तर सर्वत्र तोटा होणारा, मूर्ख, पुत्रहीन. सिंह राशीचा असेल तर कीर्तिमान्, धनसपन्न, राजकीय कामांत सुख पावणारा. धनु किंवा मीन राशीचा असेल तर राजकीय कामें करणारा, सुखी, धनवान्. कुंभ राशीचा असल्यास धन मिळेल व जाईल.

मंगळ द्वादश स्थानीं मेष, वृश्चिक अथवा मकर राशीचा असेल तर कृपण, सन्मार्गी. वृषभ किंवा तूळ राशीचा असेल तर लोभी व दरिद्री. मिथुन किंवा कन्या राशीचा असेल तर अभिमानी व दरिद्री. कर्क राशीचा असेल तर कुकर्मामध्यें पैसा खर्चणारा, अग्नीपासून व चोरांपासून हानि पावणारा. सिंह राशीचा असेल तर राजद्रोही. बंधन व राजदंड पावणारा. धनु किंवा मीन राशीचा असेल तर उधळ्या, पुष्कळ माणसांबरोबर द्वेष करणारा. कुंभ राशीचा असेल तर भीक मागून निर्वाह करणारा.

## बुधभावफल.

बुध प्रथम स्थानीं मिथुन अथवा कन्या राशीचा असल्यास शरीरास चांगलें पुष्ट, सुखभावी, दीर्घायु, आस्तिक, विद्वान्, भाग्यशाली-

मेष किंवा वृश्चिक राशीचा असल्यास विद्यासंपन्न, बहुशास्त्रज्ञ, बहुश्रुत, ज्योतिर्विद्यानिपुण, मंत्रतंत्रज्ञ, गोडबोल्या, छानछोकीचा पोषाख करणारा, रूपवान्. वृषभ किंवा तूळ राशीचा असल्यास गोड बोलणारा, विद्यासंपन्न, क्षमाशील, दयाळुक. कर्क राशीचा असेल तर तीर्थ आणि जलाशयाचा लाभ, पित्तप्रकृति, पंडुरोगी. सिंह राशीचा असेल तर सुवर्णकांति. धनु किंवा मीन राशीचा असेल तर शरीरसुखहीन, नास्तिक, मूर्ख. मकर किंवा कुंभ राशीचा असेल तर शरीरात खोड असणारा, सज्जनद्वेष्टा, नेत्ररोगी, ठक.

बुध द्वितीय स्थानीं मिथुन अथवा कन्या राशीचा असेल तर धनसुख व कुटुंबसुख, वाचाळ, मोठ्या डोळ्यांचा, बहुपुत्र, स्वधर्मरत, गोड भाषण करणारा, विचार करून कार्य करणारा, धनसंपन्न, गुणी, बैमत्री. मेष किंवा वृश्चिक राशीचा असेल तर बोलका विद्वान्, धनसंपन्न. वृषभ किंवा तूळ राशीचा असेल तर लेखक, गणिती, कवि. कर्क राशीचा असल्यास वातग्रस्त, मस्करी. सिंह राशीचा असेल तर उत्पाती, तामसी, चंचलबुद्धि, साहसी, दीर्घायु. धनु किंवा मीन राशीचा असेल तर निर्धन, कुटुंबाशीं तटा करणारा. मकर किंवा कुंभ राशीचा असेल तर मितभाषणी, मध्यमायु.

बुध तृतीय स्थानीं मिथुन किंवा कन्या राशीचा असेल तर पराक्रमी, सत्कर्मी व भावंडांपासून सुख पावणारा. मेष किंवा वृश्चिक राशीचा असेल तर भावंडांचें सुख, गुणवान्. वृषभ किंवा तूळ राशीचा असेल तर धनसंपन्न, धर्मशील. कर्क राशीचा असेल तर धैर्ययुक्त. सिंह राशीचा असेल तर भावंडांशीं वांकडें. धनु किंवा मीन राशीचा असल्यास भावंडाचें सुख, निरुद्योगी, पराक्रमहीन. मकर किंवा कुंभ राशीचा असेल तर मित्रा, मध्यमायु, भावंडाचें सुख मध्यम.

बुध चतुर्थ स्थानीं मिथुन अथवा कन्या राशीचा असेल तर मातृसुख, वरदार, मित्र, पशु यांचें सुख, जमिनीचा मालक. मेष किंवा वृश्चिक राशीचा असेल तर झटपट काम करणारा, मोठ्या च तेजस्वी डोळ्यांचा. वृषभ किंवा तूळ राशीचा असेल तर पितृसुख. कर्क राशीचा असेल तर मातृद्रोही व अज्ञानी. सिंह राशीचा असेल तर व्यापारांत यश. धनु किंवा मीन राशीचा असेल तर मातृसुखहीन, गृहविरहित, भूमिविरहित, मित्रविरहित. मकर किंवा कुंभ राशीचा असेल तर वाहनसुखी, वाहनापासून घात पावणारा, जमीनजुमला विकणारा, मित्रांशीं तंटा करणारा, कपटी.

बुध पंचम स्थानीं मिथुन अथवा कन्या राशीचा असेल तर बुद्धिमान्, संतानसुखी. मेष किंवा वृश्चिक राशीचा असेल तर बुद्धिमान्, पुत्रसुख अल्प, अभिमानी. वृषभ किंवा तूळ राशीचा असल्यास बुद्धिमान्, संतानसुखी. कर्क राशीचा असेल तर दत्तक पुत्र घेईल व पुत्राचा द्वेष करील. सिंह राशीचा असेल तर पापबुद्धि, मंत्रतंत्रज्ञ. धनु किंवा मीन राशीचा असेल तर मूर्ख व संतानहीन. मकर किंवा कुंभ राशीचा असेल तर एखादा मुलगा, मस्तक चांगलें, वैभवी, राजविद्येंत साधारण ज्ञानी, साहसी, बुद्धिमान्, परदेशवासी.

बुध षष्ठ स्थानीं मिथुन अथवा कन्या राशीचा असेल तर रोगनाश, शत्रुनाश, मातुलसुख. मेष किंवा वृश्चिक राशीचा असेल तर राज्यामध्यें मोठा अधिकार, विद्येमध्यें विघ्न, अभिमानी, शूर, वादविवाद करणारा. वृषभ किंवा तूळ राशीचा असेल तर राजाशीं सलगीनें असणारा, लेखक, गणिती. कर्क राशीचा असेल तर खोकला आणि दमा या रोगांनीं युक्त. सिंह राशीचा असेल तर मातुलपक्षसुखहीन. धनु किंवा मीन राशीचा असेल तर निर्बळ, रोगनाश,

शत्रुनाश, मातुळसुख. मकर किंवा कुंभ राशीचा असेल तर स्वजातीचा द्वेष करणारा असून बहुत प्रबळ शत्रु असतील.

बुध सप्तम स्थानीं मिथुन अथवा कन्या राशीचा असेल तर सुंदर स्त्री, व्यापारांत सुख, मार्गांत लाभ, देण्याघेण्यांत कौशल्य. मेष किंवा वृश्चिक राशीचा असेल तर मातृसुख, गाडी घोडे याचा धनी, धर्मात्मा. वृषभ किंवा तूळ राशीचा असेल तर उदार आणि कीर्तिमान्. कर्क राशीचा असेल तर स्त्रीद्वेष्टा, व्यापारांत नुकसान पावणारा. सिंह राशीचा असेल तर राजापासून पदवी वगैरे मान पावणारा, पण स्त्री वाईट. धनु किंवा मीन राशीचा असेल तर स्त्री-सुखहीन, प्रवासांत भीति, व्यापारांत व देण्याघेण्यांत नुकसान. मकर किंवा कुंभ राशीचा असेल तर अभक्ष्यभक्षक व कुरूप स्त्रीचा पति.

बुध अष्टम स्थानीं मिथुन अथवा कन्या राशीचा असेल तर पूर्ण आयुष्य व शरीरसुख. मेष किंवा वृश्चिक राशीचा असेल तर पूर्णायुषी, शेतवाडीचा मालक, संतानापासून सुख पावणारा. वृषभ किंवा तूळ राशीचा असेल तर कीर्ति व धन यानीं युक्त. कर्क राशीचा असेल तर पोटदुखीचा रोग व अल्पायुषी. सिंह राशीचा असेल तर कमनशिबी. धनु किंवा मीन राशीचा असेल तर अल्पायु, रोगी. मकर किंवा कुंभ राशीचा असेल तर अल्पायु, पर-देशगामी.

बुध नवम स्थानीं मिथुन अथवा कन्या राशीचा असेल तर मोठा भाग्यशाली, पुण्यशील, स्वधर्मरत, पितृसुख व संतानसुख उत्तम. मेष किंवा वृश्चिक राशीचा असेल तर बहुमंनति, भाग्यहीन, गायनकलेंत निपुण. वृषभ किंवा तूळ राशीचा असेल तर चतुर, तीर्थाटनी, तपस्वी. कर्क राशीचा असेल तर भाग्यशाली, धनवान्. सिंह राशीचा असेल तर आस्तिक, प्रतापी, पुष्कळ लाभ पावणारा

व पित्याचें आयुष्य पुष्कळ. धनु किंवा मीन राशीचा असेल तर कमनशिबी, नास्तिक, परदेशांत भटकणारा, स्वाभिमानशून्य, परानुकरणी. मकर किंवा कुंभ राशीचा असेल तर पितृद्वेषी, नास्तिक.

बुध दशम स्थानीं मिथुन अथवा कन्या राशीचा असेल तर पितृसुख चांगलें, राज्याच्या भरभराटींत सुखी, व्यापारांत कुशल, कीर्तियुक्त. मेष किंवा वृश्चिक राशीचा असेल तर सत्कर्मी, राजसत्ता भोगणारा, धनवान्. वृषभ किंवा तूळ राशीचा असेल तर स्थावर मिळकतीचा मालक, बहुमित्र, मातृसुख, संततिसुख, पशुसुख, धनवान्. कर्क राशीचा असेल तर बापाशीं वांकडें राहील. सिंह राशीचा असेल तर दयाशील, राजसत्तायुक्त, धनाढ्य. धनु किंवा मीन राशीचा असेल तर पितृसुखहीन, व्यापारांत नुकसान, अपयश व अपकीर्ति. मकर किंवा कुंभ राशीचा असेल तर नीच जातींत मान मिळेल आणि नीच जातींपासून धनलाभ होईल.

बुध एकादश स्थानीं मिथुन अथवा कन्या राशीचा असेल तर अनेक प्रकारचा लाभ, वस्त्र व दागिने पुष्कळ. मेष किंवा वृश्चिक राशीचा असेल तर तामसी, राजसत्तेच्या योगानें धन मिळविणारा. वृषभ किंवा तूळ राशीचा असेल तर कन्यासंतति व स्त्रीच्या मदतीनें धनवान्. कर्क राशीचा असेल तर व्यापार करणारा, मोत्यापोंवळ्यांचा संग्रह करणारा. सिंह राशीचा असेल तर क्षत्रिय जातीपासून धन मिळवील. धनु किंवा मीन राशीचा असेल तर पुष्कळ रीतीनें नुकसान पावेल व दरिद्री होईल. मकर किंवा कुंभ राशीचा असेल तर म्लेंच्छ जातीपासून धन मिळवील.

बुध द्वादश स्थानीं मिथुन अथवा कन्या राशीचा असेल तर सत्कार्यी धन खर्चणारा, शरीरानें सुखी. मेष किंवा वृश्चिक राशीचा असेल तर राजविद्या जाणणारा, चपळ व लोभी. वृषभ किंवा तूळ राशीचा असेल तर सत्कार्यी धन खर्चणारा, *धोरणी, शास्त्रप्रवीण,

व्यापारकुशल, स्वधर्मरत, विश्वासू. कर्क राशीचा असेल तर मातुलपक्षाकडून द्वेष केला जाणारा व बहुत शत्रु असलेला. सिंह राशीचा असेल तर राजसेवक. धनु किंवा मीन राशीचा असेल तर फार खर्च करणारा, शरीरानें रोगी. मकर किंवा कुंभ राशीचा असेल तर नीच जातीची सेवा करणारा, विषयी, उधळ्या.

## गुरुभावफल.

गुरु प्रथम स्थानीं कर्क, धनु अथवा मीन राशीचा असेल तर पुष्कळ शास्त्रें जाणणारा, संतानाचें उत्तम सुख असलेला, ज्ञानी, धनसंपन्न, राजसत्ता भोगणारा, सुंदर व सुखी. मेष किंवा वृश्चिक राशीचा असेल तर साहसी किंवा चंचल. वृषभ किंवा तूळ राशीचा असेल तर स्थूलदेह, स्वभावानें गंभीर, घरकामांत कुशल, निरोगी, अल्प पण कोमल वाणीनें बोलणारा, वैभवी, सुखी, यशस्वी व अल्पसंतति. मिथुन किंवा कन्या राशीचा असेल तर स्त्रीपासून सुख, मार्गांत आणि व्यापारांत धनलाभ. सिंह राशीचा असेल तर मध्यमायु, संतानसुखी. मकर किंवा कुंभ राशीचा असेल तर स्वकुटुंबानें दूर केलेला, संतानसुखविरहित, कृतघ्न, गर्विष्ट, पुष्कळांचा द्वेष करणारा, प्रवासी, पापी, तंटेखोर, दुःखी व संतापी.

गुरु द्वितीय स्थानीं कर्क, धनु अथवा मीन राशीचा असेल तर धनसंपन्न, कुटुंबी, वैभवी, सुखी, सुभाषणी, बुद्धिमान्, धर्मशील, दीर्घायु. मेष किंवा वृश्चिक राशीचा असेल तर धैर्यवान्, बलवान्, लोभी, घरकामांत कुशल, डोळे मोठे, कपाळ मोठें, कुले मोठे. वृषभ किंवा तूळ राशीचा असेल तर विद्वान् पण विद्येंत विघ्न येईल, कुटुंबाशीं द्वेष करणारा, ठक. मिथुन किंवा कन्या राशीचा असेल तर चोर, धनवान्, कटुभाषणी, असत्यप्रीति. सिंह राशीचा असेल तर राजसत्तेनें धन मिळविणारा. मकर राशीचा असेल तर

मद्यपी, कुटुंबांतून भ्रष्ट झालेला, कुलाला कलंक लावणारा अथवा कुलाचा नाश करणारा, मध्यमायु, बहुस्त्रीक पण पुत्रहीन. कुंभ राशीचा असेल तर कटुभाषणी, निर्धन, कुटुंबसुखहीन.

गुरु तृतीय स्थानीं कर्क, धनु अथवा मीन राशीचा असेल तर भार्यापासून सुख, सत्कर्मी, दास बाळगणारा, पराक्रमी, पुण्यशाली, सुदैवी. मेष किंवा वृश्चिक राशीचा असेल तर व्यापार करणारा, पराक्रमी, पुण्यकर्मी, भावंडांचा सुखी, चांगला धंदा करणारा, दास बाळगणारा, भोळ्या स्वभावाचा. वृषभ किंवा तूळ राशीचा असेल तर भावंडांशीं वांकडें राहील. मिथुन किंवा कन्या राशीचा असेल तर बुद्धिमान्, भाग्यशाली, तीर्थाटनी. सिंह राशीचा असेल तर पापबुद्धिमान्, कर्णरोगी, दूरदृष्टि. मकर किंवा कुंभ राशीचा असेल तर भावडसुखहीन, निरुद्योगी, लाजाळू.

गुरु चतुर्थ स्थानीं कर्क, धनु अथवा मीन राशीचा असेल तर घर शेतवाडीचा मालक, बहुत आणि उत्तम मित्र, मातृपितृसुखयुक्त, वाहन—पशु—धन यापासून सुखी. मेष किंवा वृश्चिक राशीचा असेल तर शरीराचें व संसाराचें सुख चांगलें. वृषभ किंवा तूळ राशीचा असेल तर मित्रद्वेष, स्त्रीद्वेष. मिथुन किंवा कन्या राशीचा असेल तर जागा व वाहन यांपासून भय. सिंह राशीचा असेल तर वाहनसुख, मातृसुखहीन, बहुमित्र. मकर किंवा कुंभ राशीचा असेल तर मातृसुखहीन, मित्रांपासून दुःख, पशु व वाहन यांपासून घात.

गुरु पंचमस्थानीं धनु अथवा मीन राशीचा असेल तर विद्वान्, बुद्धिमान्, परंतु पुत्रसुखहीन. कर्क राशीचा असेल तर विद्वान्, सुसंतानी, द्रव्यलाभ मिळवून धनवान्. मेष किंवा वृश्चिक राशीचा असेल तर चतुर, तेजस्वी, वक्ता, प्रतापी, मोठ्या नेत्रांचा, अन्नदानप्रिय. वृषभ किंवा तूळ राशीचा असेल

तर पुत्रद्वेष्टा, अमिष्ट. मिथुन किंवा कन्या राशीचा असेल तर सनतिसुखी, प्रतिमान्. बुद्धिमान्, सिंह राशीचा असेल तर कुळामध्ये प्रिय, सेनानी, राजसत्तावान्. मकर किंवा कुंभ राशीचा असेल तर पुत्राचें सुख अल्प, मंदमति, म्लेंच्छविद्या जाणणारा, गंभीर स्वराचा, पितृधनभोगी, सहनशील.

गुरु षष्ठस्थानीं कर्क, धनु अथवा मीन राशीचा असेल तर मातुळपक्षाचें सुख, रोगहीन शत्रुहीन मेष किंवा वृश्चिक राशीचा असेल तर स्वज्ञातींचा बलिष्ठ शत्रु, दीर्घायु. वृषभ किंवा तूळ राशीचा असेल तर अपार फोड येऊन डाग राहतील, शत्रूची भीति फार. मिथुन किंवा कन्या राशीचा असेल तर शूळ आणि गुल्म रोग. सिंह राशीचा असेल तर मातुळपक्षसुख. मकर किंवा कुंभ राशीचा असेल तर रोगग्रस्त शरीर, नेहमीं शत्रूकडून त्रास.

गुरु सप्तमस्थानीं कर्क, धनु अथवा मीन राशीचा असेल तर सुंदर स्त्री मिळून तिजपासून सुख मिळेल. व्यापारात लाभ, परदेशीं कीर्ति, धन, यश. मेष किंवा वृश्चिक राशीचा असेल तर विद्वान्, धनवान्, पुष्कळ तन्त्रें लाभ मिळवून सुखी. वृषभ किंवा तूळ राशीचा असेल तर स्त्रीद्वेषी, स्त्रीआतुर मिथुन किंवा कन्या राशीचा असेल तर स्त्री विद्यायुक्त, परमेश्वरभक्ति करणारी व पतिव्रता. सिंह राशीचा असेल तर व्यापारात कीर्ति, धनवान्, शेतींत व परदेशात लाभ. मकर किंवा कुंभ राशीचा असेल तर स्त्रीपासून नेहमीं दुःख, व्यापारात नुकसान, प्रवासात व परदेशात अपयश, दारिद्र्य.

गुरु अष्टमस्थानीं कर्क धनु किंवा मीन राशीचा असेल तर पूर्णायु, निरोगी, धनवान्. मेष किंवा वृश्चिक राशीचा असेल तर अल्पायु, स्वमताचा अभिमानी वृषभ किंवा तूळ राशीचा असेल तर ज्ञाना पण भ्रष्ट. मिथुन किंवा कन्या राशीचा असेल तर गाईंट

स्त्रीशीं संग करून त्यापासून पुष्कळ दिवस रोगी. सिंह राशीचा असेल तर मध्यमायु, मध्यम धनवान्. मकर किंवा कुंभ राशीचा असेल तर अल्पायु, शरीरानें दुर्बळ व रोगी.

गुरु नवमस्थानीं कर्क, धनु अथवा मीन राशीचा असेल तर मोठा भाग्यवान्, परदेशात पुष्कळ लाभ मिळविणारा, पितृसुखी, देवरत, पुण्यकर्मी, तीर्थाटनी. मेष किंवा वृश्चिक राशीचा असेल तर पितृसुखी, धैर्यवान्, धनवान्. वृषभ किंवा तूळ राशीचा असेल तर पितृद्वेषी, परदेशवासी. मिथुन किंवा कन्या राशीचा असेल तर कीर्तिमान्, सत्कर्मी, परंतु सज्जनद्वेषी. सिंह राशीचा असेल तर पुष्कळ माणसांचें पालनपोषण करणारा. मकर किंवा कुंभ राशीचा असेल तर दुर्दैवी, नास्तिक, परदेशीं दुःख पावणारा.

गुरु दशमस्थानीं कर्क, धनु अथवा मीन राशीचा असेल तर भूमिगत धन, पितृसुख, राजसत्ता, व्यापारांत नफा, कीर्ति, मान, गृहसुख, मित्रसुख. मेष किंवा वृश्चिक राशीचा असेल तर सत्कर्मी, गायनकलेंत कुशल, कीर्तिमान्, प्रामाणिक. वृषभ किंवा तूळ राशीचा असेल तर पुष्कळ माणसांना प्रिय. मिथुन किंवा कन्या राशीचा असेल तर लेखक, ज्ञानी, कवि. सिंह राशीचा असेल तर राजसत्ता भोगणारा. मकर किंवा कुंभ राशीचा असेल तर पितृसुखहीन, राजभय, व्यापारांत नुकसान, अपकीर्ति, अपयश.

गुरु एकादश स्थानीं कर्क, धनु अथवा मीन राशीचा असेल तर अनेक प्रकारचा लाभ, वस्त्र व दागिन्यांचें वैभव, कीर्ति. मेष किंवा वृश्चिक राशीचा असेल तर संतानापासून दुःख, विद्वान्, धनवान्. वृषभ किंवा तूळ राशीचा असेल तर लाभ व पुढें नुकसान. मिथुन किंवा कन्या राशीचा असेल तर खंडितकीर्ति म्हणजे प्रारंभीं कीर्ति होऊन पुढें अपकीर्ति. सिंह राशीचा असेल तर धनसुख. मकर किंवा कुंभ राशीचा असेल तर दरिद्री.

गुरु द्वादश स्थानीं कर्क, धनु अथवा मीन राशीचा असेल तर शरीरास सुख, अनेक रीतींनें धन मिळवून त्याचा चांगला उपयोग करणारा, रोग आणि शत्रुनाश. मेष किंवा वृश्चिक राशीचा असेल तर ब्राह्मण अथवा क्षत्रिय आणि गर्भवती स्त्रीशीं संभोग करणारा, फार खर्च करणारा, रोग व शत्रु यांपासून वारंवार पीडित. वृषभ किंवा तूळ राशीचा असेल तर निर्धन संतति थोडी, साधारण बुद्धिमान्, विद्वान्. मिथुन किंवा कन्या राशीचा असेल तर कामी, पुष्कळ स्त्रिया भोगणारा, पोटांत किंवा अंगावर गांठींचा रोग, अंगावर डाग, अप्रामाणिक. सिंह राशीचा असेल तर व्यभिचारी, फार खर्च करणारा. मकर किंवा कुंभ राशीचा असेल तर शरीरास सुख मिळणार नाहीं, रोगापासून व शत्रूपासून दुःख.

## शुक्रभावफल.

शुक्र प्रथम स्थानीं वृषभ, तूळ अथवा मीन राशीचा असेल तर स्थूलदेह, निरोगी, शहाणा, सुस्वभावी, वजनदार, थोडें पण गोड बोलणारा, उंच कुळांत जन्म घेतलेला, धनवान्, पूर्णायुषी, प्रामाणिक, निष्कपटी, लोकप्रिय, परदेशवासी, स्त्री चांगली व स्त्रीपासून चांगलें सुख. मेष किंवा वृश्चिक राशीचा असेल तर पूर्णायुषी, निरोगी, चतुर, सुंदर, पराक्रमी. मिथुन किंवा कन्या राशीचा असेल तर कपटी, छलभेदी, मूर्ख, कृशदेही, कटु बोलणारा. कर्क राशीचा असेल तर सुखी, तसाच दुःखी, स्त्रीला प्रिय, वस्त्र आणि दागिन्यांचा शोकी. सिंह राशीचा असेल तर क्रोधी, छलभेदी, कपटी. धनु राशीचा असेल तर विद्वान्, वस्त्र व दागिन्यांची इच्छा करणारा, सुस्वरूप, ठक, वातविकारी. मकर किंवा कुंभ राशीचा असेल तर रूपवान्, नम्र, लोकप्रिय, गुणवान, धनसंपन्न.

शुक्र द्वितीय स्थानीं वृषभ, तूळ अथवा मीन राशीचा असेल तर द्रव्यवान्, कुटुंबापासून सुख पावणारा. मेष किंवा वृश्चिक राशीचा असेल तर हलकें अन्न खाणारा, नम्र, सुनेत्र. मिथुन किंवा कन्या राशीचा असेल तर कडू बोलणारा. वाचाळ, चंचल, विद्वान्, धनवान्. कर्क राशीचा असेल तर सुंदरमुख, नीच स्वभावाचा व मतलबी. सिंह राशीचा असेल तर राजवंशांतील लोकांच्या मदतीनें धनवान्, कुटुंबाशीं तंटा करणारा. धनु राशीचा असेल तर दयाशील, परोपकारी, उत्तम स्त्री. मकर किंवा कुंभ राशीचा असेल कुटुंबांत प्रेमानें रहाणारा, लोभी व धनसंपन्न.

शुक्र तृतीय स्थानीं वृषभ, तूळ अथवा मीन राशीचा असेल तर भावडाचें सुख, चांगला धंदा करणारा, पराक्रमी, दासदासी ठेवणारा. मेष किंवा वृश्चिक राशीचा असेल तर भावडसुखहीन, निरुद्योगी, पराक्रमहीन. कर्क राशीचा असेल तर दासदासी ठेवणारा. सिंह राशीचा असेल तर सत्कर्मी, सुदैवी. धनु राशीचा असेल तर पराक्रम करील पण मागून अपमान होईल, पाठीचीं भावडें होतील. मकर किंवा कुंभ राशीचा असेल तर शूद्राच्या मदतीनें पराक्रम करणारा.

शुक्र चतुर्थ स्थानीं वृषभ, तूळ अथवा मीन राशीचा असेल तर आईचें सुख, घरदार, शेत, जागा, मित्र, वाहन, धन यापासून सुख मेष किंवा वृश्चिक राशीचा असेल तर कुलदीपक, विद्वान्, आईबापांचें सुख मिळणारा. मिथुन किंवा कन्या राशीचा असेल तर आईपासून दूर रहाणारा, परदेशवासी, मित्ररहित, पशुरहित. कर्क राशीचा असेल तर सुस्वरूप, कीर्तिमान, क्षमाशील. सिंह राशीचा असेल तर बुद्धिमान्, पुष्कळ पशु बाळगणारा आणि गर्हितमित्र म्हणजे पहिल्यानें मित्र असणारे शत्रु होतील. धनु राशीचा असेल तर विद्वान्. मकर किंवा कुंभ

राशीचा असेल तर शूद्र लोकांच्या मदतीनें जागा मिळवील व नीच लोकांशी मैत्री करील.

शुक्र पंचम स्थानीं वृषभ, तूळ अथवा मीन राशींत असेल तर बुद्धिमान्, संतानसुखी. मेष किंवा वृश्चिक राशीचा असेल तर राजकीय विद्या जाणणारा, प्रधान, मुत्सद्दी. मिथुन किंवा कन्या राशीचा असेल तर मंदबुद्धि, संतानापासून दुःख. कर्क राशीचा असेल तर कन्यासंतति. सिंह राशीचा असेल तर पुत्रसंतति, राजाकडून मान. धनु राशीचा असेल तर शहाणा, विद्वान्, संतानरहित. मकर किंवा कुंभ राशीचा असेल तर मंदबुद्धि, अल्पसंतति, ठकबाजी करणारा.

शुक्र षष्ठ स्थानीं वृषभ, तूळ अथवा मीन राशीचा असेल तर मातुलपक्षाचें सुख, रोग व शत्रुविरहित. मेष किंवा वृश्चिक राशीचा असेल तर स्वज्ञातीशीं चांगला. मिथुन किंवा कन्या राशीचा असेल तर मातुलपक्षसुखहीन, रोगी, शत्रुयुक्त. कर्क राशीचा असेल तर सत्कार्यीं द्रव्य खर्च करणारा, वैश्यांचा शत्रु. सिंह राशीचा असेल तर आडमार्गी धन खर्च करणारा. राजवंशांत शत्रु असलेला. धनु राशीचा असेल तर मंत्रतंत्रज्ञ, किमया करणारा, लोकप्रिय, सुशील, पुत्रवान्. मकर किंवा कुंभ राशीचा असेल तर अंगावर डाग असून विषापासून घात होईल.

शुक्र सप्तम स्थानीं वृषभ, तूळ अथवा मीन राशीचा असेल तर स्थूल स्त्रीचा पति, परदेशवासी, व्यापारधंदा करणारा, देण्याघेण्यांत कुशल, भोळा, स्त्री उच्च कुळांतील असून चतुर असेल. मेष किंवा वृश्चिक राशीचा असेल तर निर्धन, शस्त्रांच्या आधारानें उपजीविका करणारा, मगचुंबन करणारा. मिथुन किंवा कन्या राशीचा असेल तर शरीरानें दुर्बळ व वाईट स्त्री, देश भटकणारा, दरिद्री. कर्क राशीचा असेल तर चपळ, रूपवती व वाईट चालीची स्त्री, छंदी

फंदी मित्र. सिंह राशीचा असेल तर स्त्रीचा द्वेष करणारा. धनु राशीचा असेल तर व्यभिचारी, धनवान्, वाहनसुखी, सर्व कामांत कुशल. मकर किंवा कुंभ राशीचा असेल तर कपटी, ठकबाजी करणारी व लबाड स्त्री मिळेल.

शुक्र अष्टम स्थानीं वृषभ, तूळ अथवा मीन राशीचा असेल तर पूर्णायु. शरीरानें सुखी, धनवान्, सशक्त, मध्यम बांध्याचा. मेष किंवा वृश्चिक राशीचा असेल तर लोभी, आनंदी, मध्यमायु व बाईला देवीचा रोग होईल. मिथुन किंवा कन्या राशीचा असेल तर अल्पायुषी, निर्धन, शरीरानें दुर्बळ व रोगी. कर्क राशीचा असेल तर मध्यमायुषी, रोगग्रस्त स्त्रीचा पति. सिंह राशीचा असेल तर अगावर फोड उठतील, अल्पायुषी. धनु राशीचा असेल तर फार कामी, पण धनवान्. मकर किंवा कुंभ राशीचा असेल तर बालरोग, गुल्मरोग, अल्पायु.

शुक्र नवम स्थानीं वृषभ, तूळ अथवा मीन राशीचा असेल तर नशीबवान्, परदेशांत यशस्वी, पुण्यशाली, यात्रा करणारा, मातृसुख व संतानसुख लाभणारा. मेष किंवा वृश्चिक राशीचा असेल तर पुत्रवान्, स्त्रीपासून सुखी, दीर्घायु. मिथुन किंवा कन्या राशीचा असेल तर कमनशिबी, परदेशांत राहून दुःख भोगणारा, नास्तिक, पापकर्मी. कर्क राशीचा असेल तर देशपर्यटन करणारा. सिंह राशीचा असेल तर सुदैवी. धनु राशीचा असेल तर आरंभीं देवशाली पण मागून दुर्दैवी. मकर किंवा कुंभ राशीचा असेल तर गुरुतल्पग, शूद्राच्या मदतीनें वैभव पावणारा.

शुक्र दशम स्थानीं वृषभ, तूळ अथवा मीन राशीचा असेल तर राज्याधिकारी, व्यापारापासून श्रीमान्, बापाचें सुख, मान, कीर्ति. मेष किंवा वृश्चिक राशीचा असेल तर प्रतापी, मनांत इच्छा येईल तें काम करणारा. मिथुन किंवा कन्या राशीचा असेल तर पितृ-

सुखहीन, परसेवेनें उपजीविका करणारा, अपकीर्ति व अपमान पावणारा. कर्क राशीचा असेल तर शुभकर्मे करणारा, वाहनांपासून सुख-पावणारा. सिंह राशीचा असेल तर राजसत्ता मिळून ती जाईल, राजापासून विघ्न, बंधन वगैरे येईल. धनु राशीचा असेल तर कुलदीपक व कीर्तिमान्. मकर किंवा कुंभ राशीचा असेल तर वाचाळ आणि शूद्रांच्या मदतीनें राज्य मिळविणारा.

शुक्र एकादश स्थानीं वृषभ, तूळ अथवा मीन राशीचा असेल तर बुद्धिमान्, संतानसुखी, अनेक रीतीनें लाभ मिळविणारा, वस्त्र व दागिने मिळविणारा. मेष किंवा वृश्चिक राशीचा असेल तर राजविद्या शिकणारा, धनवान्, जमिनीचा लाभ पावणारा. मिथुन किंवा कन्या राशीचा असेल तर दरिद्री. कर्क राशीचा असेल तर आरंभीं दैवशाली असून मागाहून दैवहीन, दयाळु सिंह राशीचा असेल तर वाहनसुखी. धनु राशीचा असेल तर पुत्रवान्, धनसंपन्न मकर अथवा कुंभ राशीचा असेल तर शूद्रांच्या मदतीनें धन मिळविणारा.

शुक्र द्वादश स्थानीं वृषभ, तूळ अथवा मीन राशीचा असेल तर मातुलपक्षाचें सुख मिळणारा. रोग—शत्रुरहित, फार श्रीमान्, सत्कार्यी द्रव्य खर्चणारा. मेष किंवा वृश्चिक राशीचा असेल तर वाईट कामांत धन खर्चणारा, दरिद्री. मिथुन किंवा कन्या राशीचा असेल तर सामानसुमान घेण्यामध्यें पैसा खर्च करील. कर्क राशीचा असेल तर व्यभिचारी, उधळ्या. सिंह राशीचा असेल तर दरिद्री. धनु राशीचा असेल तर धर्मार्थ पुष्कळ धन खर्च करील व मेल्यानंतर मुक्ति मिळेल. मकर किंवा कुंभ राशीचा असेल तर चोर लुटतील अथवा संपाचि आगीनें द्रव्य होऊन जाईल.

## शनिभावफल.

शनि तनुस्थानीं तूळ, मकर अथवा कुंभ राशीचा असेल तर मध्यम बांध्याचा, रूपवान्, ग्रामाधिपति अथवा जमीनदार, धन-

धान्ययुक्त, वडिलार्जित धन भोगणारा. मेष किंवा वृश्चिक राशीचा असेल तर काळा, दरिद्री, कुरूप. वृषभ राशीचा असेल तर पित्त-विकार, वातविकार. मिथुन किंवा कन्या राशीचा असेल तर कारा-गृहयोग होतो, बोलण्यांत अडखळतो व मुलांशीं पटत नाहीं. कर्क राशीचा असेल तर मातृद्वेषी. सिंह राशीचा असेल तर पितृ-द्वेषी. धनु किंवा मीन राशीचा असेल तर ब्राह्मणद्वेषी, संतसाधुद्वेषी, विद्वद्द्वेषी, भिक्षा मागणारा.

शनि द्वितीय स्थानीं तूळ, मकर अथवा कुंभ राशीचा असेल तर द्रव्यप्राप्ति, कुटुंबप्राप्ति. मेष किंवा वृश्चिक राशीचा असेल तर कुटुंबसुखहीन. वृषभ राशीचा असेल तर भिक्षा मागणारा परंतु धन संपादन करील व कुटुंबाचें रक्षण करील. मिथुन किंवा कन्या राशीचा असेल तर भिकारी. कर्क राशीचा असेल तर कुटुंबद्वेषी, दरिद्री. सिंह राशीचा असेल रोगी, नेत्ररोगी, दरिद्री. धनु किंवा मीन राशीचा असेल तर धनलोभी, कुटुंबाबरोबर कलह करणारा, साधारण धनिक.

शनि तृतीय स्थानीं तूळ, मकर अथवा कुंभ राशीचा असेल तर पराक्रमी, व्यापारनिपुण, नोकरयुक्त, बंधुसुखी. मेष किंवा वृश्चिक राशीचा असेल तर बंधुसुखहीन, दाससुखहीन, धंदारोजगाराचें सुखहि मिळणार नाहीं. वृषभ राशीचा असेल तर पराक्रमी. मिथुन किंवा कन्या राशीचा असेल तर बहिणी होतील. कर्क राशीचा असेल तर संपत्ति मिळवील, व्यापार करील पण कुटुंबाचें पोषण वाईट रीतीनें करील. सिंह राशीचा असेल तर बंधुद्वेषी, मोलमजुरी करून निर्वाह करणारा, दुराचरणी, पापकर्मी. धनु किंवा मीन राशीचा असेल तर बंधुसुख अल्प.

शनि चतुर्थ स्थानीं तूळ, मकर अथवा कुंभ राशीचा असेल तर माता, बंधु, जमीनजुमला यांचें सुख, मित्र व परांपासून लाभ.

मेष किंवा वृश्चिक राशीचा असेल तर मातृसुखहीन, मित्रसुखहीन. वृषभ राशीचा असेल तर मातृसुखहीन. मिथुन किंवा कन्या राशीचा असेल तर धनप्राप्ति होणार नाहीं. कर्क राशीचा असेल तर माता, घरदार, मित्र यांचें सुख चांगलें, विद्वानांचा स्नेह. सिंह राशीचा असेल तर मातृद्वेषी, पितृद्वेषी. धनु किंवा मीन राशीचा असेल तर परदेशवास, घरदार–जमीन यांपासून लाभ, वाहनसुख चांगलें नाहीं, मातृसुख, सन्मित्रप्राप्ति, भोळा स्वभाव.

शनि पंचम स्थानीं तूळ, मकर अथवा कुंभ राशीचा असेल तर बुद्धिमान्, संतानसुखी, म्लेंच्छ विद्येचा अभ्यास करणारा. मेष किंवा वृश्चिक राशीचा असेल तर मूर्ख संतानरहित. वृषभ राशीचा असेल तर दरिद्री, आपलें पोषण चांगले रीतीनें करतां येणार नाहीं, दत्तक पुत्र घ्यावा लागेल. मिथुन किंवा कन्या राशीचा असेल तर कन्यासंतति. कर्क राशीचा असेल तर व्यापारी. सिंह राशीचा असेल तर राजविद्या शिकेल. धनु किंवा मीन राशीचा असेल तर संतानसुखहीन, पापाचरणी.

शनि षष्ठ स्थानीं तूळ, मकर अथवा कुंभ राशीचा असेल तर रोगी, शत्रु पुष्कळ, मातुलपक्षसुखहीन. मेष किंवा वृश्चिक राशीचा असेल तर रोगी, शत्रु पुष्कळ, मातुलसुख. वृषभ राशीचा असेल तर स्वजातिशत्रु होईल, धनधान्यादिकांची प्राप्ति. मिथुन किंवा कन्या राशीचा असेल तर स्त्री शत्रु होईल. राजसत्तेचा लाभ. कर्क राशीचा असेल तर सदा रोगी असून शरीरावर कुष्ठ. सिंह राशीचा असेल तर मातुलद्वेषी. धनु किंवा मीन राशीचा असेल तर राजसत्ता भोगणारा, विद्वानांचा आदर करणारा.

शनि सप्तम स्थानीं तूळ, मकर अथवा कुंभ राशीचा असेल तर स्त्रीसुख चांगलें,-व्यापारापासून धनप्राप्ति. मेष किंवा वृश्चिक राशीचा असेल तर स्त्रीपासून दुःख, व्यापारांत नुकसान, चोरभय. वृषभ

राशीचा असेल तर काळी व कुरूप स्त्री, दीर्घकाल टिकणारी दुखणीं. मिथुन किंवा कन्या राशीचा असेल तर गुणवती स्त्री मिळेल. सिंह राशीचा असेल तर दुःख, चोरापासून भय. धनु किंवा मीन राशीचा असेल भगवद्भजन करणारा.

शनि अष्टम स्थानीं तूळ, मकर अथवा कुंभ राशीचा असेल तर दीर्घायुषी, शरीर निरोगी. मेष किंवा वृश्चिक राशीचा असेल तर अल्पायुषी, कृश शरीर. वृषभ राशीचा असेल तर दरिद्री, मध्यमायुषी. मिथुन किंवा कन्या राशीचा असेल तर परस्त्र्यांची सेवा करणारा, शूद्र स्त्रीबरोबर संभोग करणारा. कर्क राशीचा असेल तर अत्यंत कष्टानें कुटुंबाचें रक्षण करील. सिंह राशीचा असेल तर गुह्य रोग. धनु किंवा मीन राशीचा असेल तर भिक्षा मागून कुटुंबाचें रक्षण करील.

शनि नवम स्थानीं तूळ, मकर अथवा कुंभ राशीचा असेल तर द्रव्यप्राप्ति चांगली, पितृसुख, संतानसुख. मेष किंवा वृश्चिक राशीचा असेल तर दरिद्री, स्त्री मोठी, परदेशांत वास करणारा, परगृहीं वास करणारा. वृषभ राशीचा असेल तर कर्मभ्रष्ट, ज्ञातिभ्रष्ट. मिथुन किंवा कन्या राशीचा असेल तर पितृसुख अल्प. कर्क राशीचा असेल तर मंदभाग्य. सिंह राशीचा असेल तर पापी. धनु किंवा मीन राशीचा असेल तर पंडित, प्रवासी, द्रव्यसंपन्न.

शनि दशम स्थानीं तूळ, मकर अथवा कुंभ राशीचा असेल तर पितृसुख, राजदरबारी मान, व्यापारांत यश, कीर्ति, धनप्राप्ति, कायद्यानें उपजीविका करणारा. मेष किंवा वृश्चिक राशीचा असेल तर पित्याचें सुख कमी, राजदंड, कारागृहवास, व्यापारांत नुकसान. वृषभ राशीचा असेल तर तीर्थयात्रा करणारा, लोभी. मिथुन किंवा कन्या राशीचा असेल तर पित्तप्रकृति. कर्क राशीचा असेल तर मातृसुख कमी. सिंह राशीचा असेल तर पित्याचें सुख कमी, कार्यांत

विघ्नें येतील. धनु किंवा मीन राशीचा असेल तर राजवैभव भोगणारा.

शनि एकादश स्थानीं तूळ, मकर अथवा कुंभ राशीचा असेल तर अनेक प्रकारांनीं लाभ, अल्पसंतति. मेष किंवा वृश्चिक राशीचा असेल तर दरिद्री. वृषभ राशीचा असेल तर संततिहीन. मिथुन किंवा कन्या राशीचा असेल तर गृहसुख. कर्क राशीचा असेल तर व्यापारांत फायदा. धनु किंवा मीन राशीचा असेल तर विद्वान्, भाग्यवान्, धनवान्, वाहनसुखी.

शनि द्वादश स्थानीं तूळ, मकर व कुंभ राशीचा असेल तर शरीरसुख, धनप्राप्ति, मातुलसुख, शत्रु नाहींत परंतु लोभी. मेष किंवा वृश्चिक राशीचा असेल तर उधळ्या, शत्रु होतील, नुकसान होईल, आप्त फसवतील. वृषभ राशीचा असेल तर वेडा होईल व भ्रष्ट होईल. मिथुन किंवा कन्या राशीचा असेल तर सुंदर. कर्क राशीचा असेल तर नेत्रांस विकार, नेहमीं रोगग्रस्त. सिंह राशीचा असेल तर वाईट मार्गानें खर्च करणारा, मातुलसुखहीन. धनु किंवा मीन राशीचा असेल तर मातुलपक्षाचें सुख, कंजूर, शरीरास व्याधि.

## रवीचें दृष्टिफल.

सूर्याची प्रथम स्थानीं दृष्टि असेल तर अनेक प्रदेशांत भ्रमण, भाग्योदय, पुण्यकर्माची आवड थोडी, शरीरास किंचित् पीडा, स्त्रीसुख थोडें.

धन—वित्ताच्या धनाचा नाश, जनावरांचें सुख, स्वपराक्रमानें संसार करणारा.

सहज—पराक्रम, राजापासून यश, पहिल्या भावंडांचा नाश.

सुहृद्—मातेस पीडा, भावंडांस पीडा, घराची व सुखाची वृद्धि.

सुत—पहिल्या संततीचा नाश, शरीरास वातविकार, स्त्रीसुख अल्प.

रिपु–शत्रुनाश, उजव्या नेत्रास पीडा, मातृसुख.

जाया–स्त्रीनाश, पडुरोग, शत्रुपासून पीडा.

मृत्यु–गुदस्थानीं पीडा, व्यभिचारी, पित्याच्या वृत्तीप्रमाणें वृत्ति राहणार नाहीं, पित्यानें पराक्रमानें केलेला धंदा स्वतःस होणार नाहीं.

धर्म–मातृनाश, पितृनाश, गुरुनाश, पापाचरण, वृद्धापकाळीं सुख.

कर्म—सिद्धकर्मी, लहानपणीं मातृनाश; सूर्य स्वगृहींचा अथवा उच्च असेल तर मातृसुख, पराक्रम.

आय–सर्व वस्तूची प्राप्ति, प्रथम पुत्राचा नाश, बुद्धि.

व्यय–गृहनाश, वाहनापासून अथवा जनावरापासून पीडा.

## चंद्राचें दृष्टिफल.

तनु—दुष्टबुद्धि, प्रवासी, प्रवासापासून सुखी.

धन—कुटुंबसुख, बहुमतति, आठव्या वर्षी जलघात अथवा दगडापासून पीडा.

सहज–भाग्य, पराक्रम, पहिल्या अवस्थेंत बराचसा पैसा, वृद्धावस्थेंतहि सुख.

सुहृत्–शरीरसंपत्ति चांगली, पितृसुख.

सुत—पहिल्या अवस्थेंत पुत्रसंतान, परदेशीं उदरनिर्वाह.

रिपु—शत्रु फार, कफप्रकृति, धातुक्षय.

जाया—रूपवती स्त्री, अतिकामी, परस्त्रीचा संग करणारा, बोलल्याप्रमाणें आचरण करणारा.

मृत्यु–एकदां जिवावरचें दुखणें, नेहमीं रोगी, थंड शरीर आठव्या वर्षी फार पीडा.

धर्म—भाग्याचें सुख, धनसुख अल्प, फार खर्च करणारा.

कर्म—जनावरापासून फायदा, पुत्रसुख, स्त्रीसुख, कुटुंबसुख.

आय–धनप्राप्ति, मनोरथपूर्णता, पुत्रापासून व स्त्रीपासून पुष्कळ सुख, सुवर्णाप्रमाणें कांति, पण सर्व सुख सावकाश मिळेल.

व्यय–पितृसुख अल्प, राजापासून यश, न्यायी, निरंतर चांगल्या वस्तूंचा संग्रह करणारा.

## मंगळाचें दृष्टिफल.

लग्न—एका स्त्रीचा नाश, स्त्रीसुख अल्प, नेत्रांस उष्णतेपासून पीडा, पायांस थोडी इजा, पहिल्या पुत्राचा नाश.

धन—कुटुंबसुख अल्प, द्रव्यलाभ, कालांतरानें हळूहळू द्रव्यनाश, गुदस्थानीं उपद्रव.

सहज—कुटुंबसुख अल्प, राजापासून मान, भावंडांचा नाश.

सुहृन्—चवथ्या महिन्यांत मातेला पीडा, राजापासून व वाहनापासून किंचित् भय.

सुत—प्रथमसंततीचा नाश, जठराग्नि प्रदीप्त.

रिपु—शत्रुनाश, मातृपक्षाच्या सुखाचा अभाव, शोणितपीडेनें शरीरास त्रास, कारागृहवास.

जाया—स्त्रीनाश, रोग, स्त्रीपुत्रांचें सुख अल्प.

मृत्यु–मूळव्याधीचा उपद्रव, क्लेशयुक्त, चिंताग्रस्त, धन व सुख यांविरहित.

धर्म–भाग्योदय, मेहुण्यापासून सुख, भ्रातृसुखाचा नाश, धर्मशील, सद्बुद्धि.

कर्म–सर्वसिद्धि, गृहसुख, पराक्रम, चवथ्या वर्षी पित्यास पीडा.

आय—दीर्घायु, मुलें जगणार नाहींत, बहुधा गर्भपात, पुत्रसुखें व इतर सुखें वृद्धावस्थेमध्यें.

व्यय—अल्प सुख, मातृसुख पुष्कळ, शत्रुनाश, संतोषी स्वभाव.

## बुधाचें दृष्टिफल.

लग्न–व्यापारप्रिय, वस्त्रालंकारांपासून सुख, उदार, गर्वरहित.

धन–धनसंपत्तीचें पुष्कळ सुख, भाग्यवान्.

सहज–भावंडांचें सुख, व्यापार, नम्र स्वभाव, तीर्थयात्रा.

सुहृत्–मातृसुख, राजापासून सुख, धनवान्, वडिलोपार्जित धनाचा लाभ, सुंदर कांति.

सुत–कन्या जास्त, चार कन्या झाल्यानंतर पुत्र, यशस्वी, समृद्धिमान्.

रिपु–मातृपक्षाकडील सुख, परक्याबरोबर वादविवाद करणारा, शत्रु फार.

जाया–रूपवती स्त्री, शरीरसुख, दीर्घायु, सर्व धातूंचा क्रय-विक्रय करणारा.

मृत्यु–सर्व अरिष्टांचा नाश, राजकारणावर उपजीविका करणारा, पर्वताजवळ मृत्यु.

धर्म–अत्यंत सुखी, भाग्यवान, देशपर्यटन, राजापासून सन्मान व उपजीविका, पितृसुख.

कर्म–संसार चांगल्या रीतीनें करणारा, राजमान्य, कीर्तिमान्, पितृसुख.

आय–भाग्य, सर्व प्रकारचें सुख, पुत्रसुख, मोठा पराक्रमी.

व्यय–विवाहादि शुभ कार्यांत खर्च करणारा, छातीत रोग, वातपीडा.

## गुरुदृष्टिफल.

लग्न–स्त्रीसुख पुष्कळ, भाग्यवान्, धनसुख, नेहमीं शुभकार्यी पैसे खर्च करणारा.

धन–धनसुख, पितृधनसुखहीन, कुटुंबसुख, बापाच्या धंद्यापेक्षां निराळा धंदा करणारा.

सहज–भावंडांचें सुख, भाग्यवान, धनवान्, सोनें–रुपें इत्या-दिकांनीं परिपूर्ण.

सुहृत्–मातृपितृसुख, बंधुजनसुख, फार यशस्वी.

सुत–संतानसुख पुष्कळ, पांच पुत्र, धनसुख, विद्यासुख.

रिपु—शत्रु फार, शत्रूंपासून त्रास, गृहनाश, धननाश, मातेस पीडा.

जाया—द्रव्यलोभी, कामी, स्त्री चांगली—रूपवती—सुख देणारी.

मृत्यु—आठव्या वर्षी जिवावरचें दुखणें, राजापासून भीति, स्त्री-समागमानें द्रव्यनाश व बुद्धिनाश.

धर्म—धर्मशील, शास्त्रप्रिय, नियमानें वागणारा, पितृसुख पुष्कळ.

कर्म—कार्यसिद्धि, राजापासून मान, पुत्रसुख, स्त्रीसुख, वैभव भोगणारा.

आय—दीर्घायु, पुत्रसुख, स्त्रीसुख, धनसुख, मित्रसुख इत्यादि सर्व प्रकारचें सुख, निरोगी.

व्यय—सत्कार्यी द्रव्य खर्चणारा, सर्व प्रकारची पीडा, बुद्धि-नाश, शत्रु.

## शुक्रदृष्टिफल.

लग्न—शरीरसुख, महान् पराक्रमी, स्वरूपवान्.

धन—द्रव्यसुख, कुटुंबसुख, स्वपराक्रमानें द्रव्य मिळविणारा, सुखी.

सहज—भाऊबहिणींचें सुख, कनिष्ठ भावंड बधिर, राजापासून पदवीलाभ.

सुहृत्—कर्मवान्, धर्मवान्, मातृसुख, चतुष्पादसुख.

सुत—पुत्र थोडे, कन्या फार, धनसुख, स्त्रीसुख, मोठा विद्वान् पण वाईट बुद्धीचा.

रिपु—मातृपक्षाचें सुख, स्वपराक्रमानें भाग्यवान, किंचित् कर्ता, शत्रु फार.

जाया—फार रूपवती स्त्री, पहिला मुलगा, द्रव्यसुख.

मृत्यु—नेहमीं व्याधिग्रस्त, कष्टानें पैसा मिळविणारा, साधु-समागमी.

धर्म–दीर्घायु, कुटुंबवत्सल, धनवान्, कुलधर्म आचरण करणारा, शत्रुनाश करणारा.

कर्म–भाग्यशाली, राजापासून यश, शुभमार्गी पैसा खर्च करणारा.

आय–दीर्घायु, धनवान्, कुलाचाराप्रमाणें वागणारा.

व्यय–विवाहादि शुभ कार्यांत पैसा खर्चणारा, पुन लवकर मरतील

## शनिदृष्टिफल.

लग्न—तिसऱ्या वर्षी शरीरास पीडा, धन व मित्र यांचा नेहमीं नाश, तापापासून दुःख

धन—धननाश, कुटुंबास शत्रूप्रमाणें भासणारा, तेराव्या वर्षी जलापासून घात अथवा दगडापासून पीडा

सहज—फार पराक्रमी, फार बलवान्, बहीणभावडापासून दुःख, लाभ होताना नुकसान.

सुहृत्—पहिल्या वर्षी शरीरास पीडा, चवथ्या वर्षी आईबापास पीडा.

सुत—नेहमीं पुत्रनाश, धननाश, शरीर निरोगी.

रिपु—शत्रुनाश, मातृपक्षसुखहीन, मित्रांस व पायांस पीडा, परस्याचा विकार

जाया—स्त्रीच्या शरीरास मृत्युतुल्य पीडा, पडुरोग, अतिसार.

मृत्यु—चोराचा आरोप, दगड लागून पीडा, राजापासून भय, धननाश.

धर्म—म्लेच्छांपासून भाग्योदय, बंधुसुखहीन.

कर्म–मातृसुख पुष्कळ, पितृसुखहीन, स्वपराक्रमानें उपजीविका करणारा, कायद्याचा अभ्यास, कारागृहवास.

आय—सर्व प्रकारचें सुख, वृद्धावस्थेंत पुत्रसुख.

व्यय—कुमार्गाकडे पैसा खर्च करणारा, अति कामी, स्त्रीपुत्रांपासून नेहमीं क्लेश.

## राहुकेतुदृष्टिफल.

लग्न—शरीरसुख अल्प, वातापासून व रक्तदोषापासून शरीरास पीडा.

धन—कुटुंबसुखहीन, पाण्यापासून अथवा दगडापासून पीडा, आठव्या वर्षी शरीरास महापीडा.

सहज—स्वपराक्रमानें मनोरथ पूर्ण करणारा, पुत्रसुख.

सुहृत्—मातृसुखहीन, म्लेंच्छांपासून भाग्योदय.

सुत—एक पुत्र, थोड्या श्रमांनी मनोरथ पूर्ण.

रिपु—शत्रुनाश, धननाश, प्रांतांच्या चौपट खर्च.

जाया—अति कामी, वाणी मधुर, राहूचे महादशेंत स्त्रीनाश.

मृत्यु—वातपीडा. नीच कर्मानें उपजीविका करणारा.

धर्म—भावंडांपासून किंचित् पीडा, पुत्र धन चोरून नेतील.

कर्म—मातापित्यांचें सुख अल्प, म्लेंच्छविधेनें उपजीविका.

आय—दीर्घायु. धनवान्.

व्यय—आनंदी वृत्ति, शत्रुनाश, रोगनाश, नेत्रांस पीडा, वाईट मार्गाकडे द्रव्य खर्च करणारा.

## भावविचाराचे सामान्य नियम.

कोणत्याहि भावामध्यें जो राशि असेल त्या राशीचा जो स्वामी तोच त्या भावाचाहि स्वामी जाणावा.

शुभग्रह केंद्रीं अथवा त्रिकोणीं असतील तर बलवान् जाणावे.

कोणताहि ग्रह तिसरे अथवा अकरावे स्थानीं असल्यास बलवान् असतो.

शुभग्रह धनस्थानीं संपत्ति देतात.

पापग्रह धनस्थानीं स्वगृहीचे अथवा उच्च नसल्यास अनिष्ट जाणावे.

पापग्रह उपचयस्थानी असले तर बलवान् जाणावे.

पापग्रह त्रिकोणांत मध्यम बली असतात.

कोणताहि ग्रह त्रिकस्थानीं ( ६।८।१२ ) निर्बली जाणावा.

ज्या ग्रहाबरोबर शुभग्रह अथवा मित्रग्रह असेल किंवा ज्या ग्रहावर शुभग्रहाची दृष्टि असेल तो ग्रह बलवान् असतो.

जो ग्रह रवीनें युक्त असेल तो ग्रह निर्बली जाणावा.

गुरूच्या स्थानमाहात्म्यापेक्षां दृष्टिमाहात्म्य विशेष आहे.

राशींच्या फलापेक्षा भावाचीं फलें व दृष्टीचीं फलें विशेष बलवत्तर आहेत.

भावाचा स्वामी बलसंपन्न असेल तर फलें पूर्णपणें अनुभवास येतात.

नीच ग्रह, शत्रुक्षेत्रांत असलेला ग्रह, पापग्रहाचे राशींत असलेला ग्रह हे राशिनिर्बली जाणावे.

जो ग्रह त्रिकस्थानीं असेल अथवा त्रिकस्थानाचा स्वामी असेल तो स्थाननिर्बली जाणावा.

पापग्रहयुक्त, शत्रुयुक्त अथवा पापग्रहाची दृष्टि असलेला ग्रह निर्बली जाणावा.

कोणत्याहि भावाचा स्वामी शुभग्रह असेल अथवा शुभग्रहानें युक्त असेल अथवा शुभ ग्रहानें दृष्ट असेल तर त्या भावासंबंधीं फल मिळेल.

कोणत्याहि भावाचा स्वामी पापग्रह असून उच्च अथवा स्वगृहीं अथवा मित्रगृहीं अथवा शुभग्रहाच्या राशीस असेल, दुसऱ्या पापग्रहानें युक्त नसेल आणि दुसऱ्या पापग्रहानें दृष्ट नसेल तर त्या भावासंबंधीं पूर्ण फल मिळेल.

कोणत्याहि भावाचा स्वामी जर त्याच भावांत असेल तर त्या भावासबंधाचें पूर्ण सुख मिळेल.

कोणत्याहि भावांचे स्वामी परस्परांच्या स्थानीं असतील तर त्या

त्या भावासंबंधाचें पूर्ण सुख मिळेल.

कोणत्याहि भावाचे स्वामी परस्परांना पहात असतील तर त्या त्या भावासंबंधाचें सुख मिळेल.

कोणत्याहि भावाचा स्वामी केंद्रांत अथवा त्रिकोणांत असेल तर त्या भावासंबंधाचें सुख मिळेल.

कोणत्याहि भावाचा स्वामी स्वस्थानापासून १।४।७।१० अथवा ५।९ या स्थानांत असेल तर त्या भावासंबंधाचें सुख मिळेल.

कोणत्याहि भावाचा स्वामी उच्च भावांत असेल त्या भावासंबंधाचें जन्मणारास सुखदुःख होईल.

कोणत्याहि भावाचा स्वामी स्वस्थानापासून ६।८।१२ या स्थानीं असेल तर त्या भावासंबंधाचें सुख अल्प मिळेल.

कोणत्याहि भावाचा स्वामी पापग्रह, पापग्रहानें युक्त अथवा पापग्रहानें दृष्ट असेल, तर त्या भावासंबंधाचें सुख मिळणार नाहीं.

कोणत्याहि भावाचा स्वामी शुभग्रह असून नीच असेल, परंतु शुभग्रहानें युक्त अथवा दृष्ट असेल तर त्या भावाचें सुख मध्यम प्रमाणानें मिळेल.

कोणत्याहि भावाचा स्वामी शुभग्रह अथवा पापग्रह असून जर आपल्या शत्रूच्या घरांत असेल व तो कोणत्याहि शुभग्रहानें दृष्ट अथवा युक्त नसेल तर त्या भावासंबंधाचें पूर्ण फल मिळणार नाहीं.

कोणत्याहि भावाचा स्वामी ६।८।१२ या स्थानीं असेल तर त्या भावासंबंधाच्या सुखाची-हानि होईल,

कोणत्याहि भावाचा स्वामी सूर्याच्या तेजांत अस्तंगत असेल तर त्या भावासंबंधाचें सुख मिळणार नाहीं.

कोणत्याहि भावाचा स्वामी सूर्याच्या तेजांत अस्तंगत असेल तर त्या भावासंबंधीं व्यक्तीचा नाश होतो.

कोणत्याहि भावाचे स्वामीपासून ६।८।१२ या स्थानीं पापग्रह

असतील तर त्या भावासंबंधाचें सुख मिळणार नाहीं.

कोणत्याही भावाच्या स्वामीवर शनि अथवा मंगळ यांची दृष्टि असेल तर त्या भावासंबंधीं व्यक्तींचा नाश होतो.

कोणत्याही भावात रवि, शनि अथवा मंगळ कोणीहि असतील तर त्या भावासंबंधीं व्यक्तींचा नाश होतो.

कोणत्याही भावावर जितक्या शुभग्रहांची दृष्टि असेल तितक्या व्यक्तींचा त्या भावासंबंधीं लाभ होतो.

कोणत्याही भावावर जितक्या पापग्रहांची दृष्टि असेल तितक्या व्यक्तींचा त्या भावासंबंधीं नाश होतो.

कोणत्याही भावाचा स्वामी एकापेक्षा अधिक पापग्रहांनीं युक्त अथवा दृष्ट असेल तर तितक्या व्यक्तींचा नाश होतो.

कोणत्याही भावाचा स्वामी वक्री असेल तर त्या भावासंबंधीं सुखाशीं विरोध येईल.

## प्रथम भाव.

लग्नस्वामी पापग्रहयुक्त अथवा ६।८।१२ या स्थानात असेल तर शरीरसुख मिळणार नाहीं.

लग्नस्वामी पापग्रह असून तो अथवा बालचंद्र लग्नीं असेल तर रोगी होईल. परंतु तेच ग्रह केंद्रात अथवा त्रिकोणांत अथवा ११ व्या स्थानीं असतील तर निरोगी होईल.

लग्नस्वामी किंवा चंद्र ज्या राशीस असेल त्या राशीचा स्वामी ६।८।१२ या स्थानीं असेल अथवा नीच, अस्तंगत अथवा शत्रुगृहीं असेल तर जन्मणारा रोडका होईल.

लग्नस्वामी आपल्या उच्चात असून त्यावर शुभग्रहाची दृष्टि असेल तर जन्मणारा दीर्घायु होईल.

चंद्र, बुध, गुरु किंवा शुक्र यांपैकीं एक अथवा अनेक लग्नीं असतील तर राजलक्षणी होतो.

लग्नीं शनि अथवा राहु असेल तर शरीरांत व्यंग असेल.

लग्नीं शुभ ग्रह असून बलवान् असले तर धन, संतति, संपत्ति यांनीं युक्त असतो. बलवान् नसले व साधारण असले तर खाऊन पिऊन बरा असतो. पापग्रह असले तर अति दुःखी व दरिद्री असतो. पापग्रह व शुभग्रह दोन्ही असले तर अर्धे फल शुभ व अर्धे फल अशुभ मिळतें.

जितके जास्त ग्रह लग्नीं पहात असतील तितका जन्मणारा जास्त भाग्यवान् व संततिसंपत्तीनें युक्त असतो व त्याला शत्रु नसतात.

लग्नस्वामी पापग्रहांनीं युक्त असून ६।८।१२ या स्थानीं असेल व ६।८।१२ या स्थानचे स्वामी आपले स्थानींच असतील तर देहास सुख होणार नाहीं.

लग्नीं पापग्रह असून लग्नाधिपति निर्बल असेल तर नाना प्रकारच्या रोगांनीं युक्त असून चिंताक्रांत असतो.

लग्नाधिपति लग्नीं अथवा केंद्रांत उच्च बलवान् अथवा बुध-गुरु-शुक्रानें युक्त असेल तर सत्वगुणी, संततिसंपत्तियुक्त व राजमान्य असतो.

लग्नेश बलहीन असून लग्नीं नवमस्थानचा स्वामी, दशम स्थानचा स्वामी व चतुर्थ स्थानचा स्वामी यांचा योग असेल तर उत्तर वयांत राजपूज्य होतो. लग्नेश शुक्र असून चतुर्थ स्थानचे स्वामीनें युक्त असेल तर पूर्व वयांत सुखी असतो. लग्न, नवम व दशम स्थानांचे स्वामी बलवान् असतील तर जीवभर सौख्य असतें.

लग्नस्वामी, नवम स्थानचा स्वामी व दशम स्थानचा स्वामी पापग्रहानें युक्त असतील तर जन्मभर दारिद्र्य असतें. मिश्रयोग असेल तर मिश्रफल.

लग्नीं सूर्य असेल तर शूर, गंभीर, चतुर, स्वरूपवान्, पिंगट

नेत्र, पित्तप्रकृति, ठेंगणा असतो. मेष लग्नीं सूर्य असेल तर द्रव्यवान्, नेत्ररोगी. कर्क लग्नीं सूर्य असेल तर डोळ्यांत फूल पडतें. सिंह लग्नीं सूर्य असेल तर रातांधळा. तूळ लग्नीं सूर्य असेल तर आंधळा व दरिद्री. यांखेरीज इतर लग्नीं सूर्य असेल तर कज्जेखोर, निर्दय, आळशी, दरिद्री, विलंबानें कार्य साधणारा असतो.

लग्नीं चंद्र असेल तर रूपवान्, मधुरवाणी, विलासी, बुद्धिमान्, उंच, नेत्र मोठे व गोरा असतो. एकटा चंद्र लग्नांत असेल तर उन्मत्त, जड, अनुचित कर्म करणारा व बधिर असतो. परंतु मेष, वृषभ व कर्क लग्नीं एकटा चंद्र असेल तर द्रव्यवान् व राजाधिकारी असतो. मेष लग्नीं चंद्र असेल तर संतति पुष्कळ असते.

लग्नीं मंगळ असेल तर शरीराचा वर्ण तांबुस गोरा असतो. अति उदार, शूर, तामसी, गर्विष्ठ असतो. शरीराचे कोणते तरी भागास शस्त्र लागून क्षत पडतें. कांहीं काळानें लंगडा अथवा कुबडा होतो.

लग्नीं बुध असेल तर मध्यम शरीराचा, रजोगुणी, कलाकुशल व पंडित असतो.

लग्नीं गुरु असेल तर शरीराचा आकार बारीक असून उंच, सुंदरकांति, उदार, विद्यासंपन्न असतो. स्त्री रूपवती असून तिचें सुख चांगलें मिळतें.

लग्नीं शुक्र असेल तर गौरवर्ण, वातप्रकृति, स्त्रीलंपट, सुखी असून स्त्री चतुर व रूपवती व स्त्रीचें सुख उत्तम मिळतें.

लग्नीं शनि असेल तर काळा, आळशी, दरिद्री, रोगी, कामी व तोतरा असतो. तूळ, धनु, मकर अथवा कुंभ लग्नीं शनि असेल तर श्रीमंत असून मोठा मनुष्य असतो.

लग्नीं गुरु, धनस्थानीं शनि व सप्तम अथवा द्वादशस्थानीं पापग्रह असल्यास परिवाराचा नाश होतो. आई अशक्त होते अथवा

तिचा नाश होतो.

लग्नस्वामी मंगळाच्या राशीस बुधासह असेल तर मुखरोगी होईल.

लग्नस्वामी विरहित चंद्र व राहु लग्नीं असतील तर कुष्ठरोगी होईल.

लग्नीं रवि, मंगळ, शनि व राहु हे ग्रह एकत्र असतील तर नास्तिक व धर्मलंड होईल.

लग्नस्वामी लग्नीं असेल तर निरोगी, पराक्रमी व स्वच्छंदी असून दोन स्त्रिया होतील

लग्नस्वामी २ ऱ्या स्थानांत असेल तर द्रव्यचिंता होईल, पुष्कळ स्त्रिया भोगील.

लग्नस्वामी ३ ऱ्या स्थानांत असेल तर संपन्न व सिंहासारखा पराक्रमी होईल. दोन स्त्रिया वरील.

लग्नस्वामी ४ थ्या स्थानांत असेल तर आईचें सुख मिळेल. गुणवान् व सौंदर्यवान् होईल.

लग्नस्वामी ५ व्या स्थानांत असेल तर पुत्रसुख साधारण मिळेल. प्रथम अपत्याचा नाश होईल.

लग्नस्वामी ६ व्या स्थानांत असेल तर रोगी होईल.

लग्नस्वामी ७ व्या स्थानांत असेल तर स्त्री जगणार नाहीं. विरक्त प्रवासी व दरिद्री होईल.

लग्नस्वामी ८ व्या स्थानांत असेल तर वाईट मार्गाला लागेल.

लग्नस्वामी ९ व्या स्थानांत असेल तर भाग्यवान् होईल.

लग्नस्वामी १० व्या स्थानांत असेल तर राजापासून मान व पितृसुख मिळेल.

लग्नस्वामी ११ व्या स्थानांत असेल तर द्रव्यचिंता होईल. मानी, धर्मशास्त्रवेत्ता होईल. पुष्कळ स्त्रिया होतील.

लग्नस्वामी १२ व्या स्थानांत असेल तर चोर, जार, जुगाऱ्या होईल.

## द्वितीय भाव.

द्वितीय भावाचा स्वामी गुरु असून द्वितीय स्थानीं असेल अथवा मंगळानें युक्त असेल तर धनवान् होईल.

द्वितीय भावाचा स्वामी, किंवा तो ज्या राशींत असेल त्या राशीचा स्वामी ६।८।१२ स्थानीं असेल तर वाणींत दोष असेल.

द्वितीय भावाचा स्वामी शुक्रानें युक्त असेल अथवा पापग्रहानें दृष्ट असेल अथवा ६।८।१२ स्थानीं असेल; अथवा ज्याच्यावर शुभग्रहाची दृष्टि नाहीं असा पापग्रह द्वितीय स्थानीं असेल तर नेत्ररोगी व दरिद्री होईल; आणि भार्यासुख मिळणार नाहीं.

द्वितीय भावाचा स्वामी एकादश स्थानांत व एकादश स्थानाचा स्वामी २ ऱ्या स्थानांत असेल अथवा ते उभयतां केंद्रीं असतील तर अत्यंत श्रीमंत होईल.

द्वितीय भावाचा स्वामी केंद्रीं व एकादश स्थानाचा स्वामी त्याच्या त्रिकोणांत असून तो गुरु अथवा शुक्र यांनीं युक्त अथवा दृष्ट असेल तर अत्यंत द्रव्यलाभ होईल.

द्वितीय भावाचा स्वामी षष्ठ स्थानांत व एकादश स्थानाचा स्वामी द्वितीय स्थानांत असून ते उभयतां पापग्रहांनीं युक्त अथवा दृष्ट असतील तर अल्पायुषी होईल.

२।११ स्थानांचे स्वामी एकत्र दुसऱ्या स्थानांत पापग्रहानें युक्त असतील तर सर्व जन्म दारिद्र्यात जाईल.

२।११ स्थानांचे स्वामी एकत्र ६।८।१२ स्थानांत असतील व ११ ऱ्या स्थानांत मंगळ आणि दुसऱ्या स्थानांत राहु असेल तर राजकोपानें द्रव्यनाश होईल.

२ऱ्या स्थानीं शुक्र, ११ स्थानीं गुरु व २।११ स्थानांचे स्वामी शुभग्रहानें युक्त असतील तर धर्मसंबंधी कृत्यांत द्रव्याचा व्यय होईल.

धनस्थानीं सूर्य असेल तर द्रव्य पुष्कळ मिळवितो, पण राजा तें हरण करून नेतो. मुखरोग होतो. सूर्य पंचम स्थानाचा स्वामी असून धनस्थानीं असेल तर वेदान्तशास्त्रज्ञ व वेदप्रवीण होतो. सूर्य चतुर्थ स्थानचा स्वामी असून धनस्थानीं असेल तर खारट व उष्ण पदार्थ आवडतात.

धनस्थानीं चंद्र असेल तर त्याचा कुटुंबपरिवार मोठा असतो. चंद्र धनस्थानाचा स्वामी असून धनस्थानीं असेल तर धर्मशास्त्रज्ञ, विद्यासंपन्न व गणिती असून चपळ असतो. चंद्र चतुर्थ स्थानाचा स्वामी असून धनस्थानीं असेल तर दहीं, साखर वगैरे मिष्ट पदार्थ आवडतात व चांदीचें पात्र पाणी पिण्यास मिळतें.

धनस्थानीं मंगळ असेल तर वाईट अन्न खातो. मंगळ चतुर्थ स्थानाचा स्वामी असून धनस्थानीं असला तर खारट, आंबट, तिखट, मसाल्येदार पदार्थ आवडतात; न्यायचतुर असतो व युद्ध-कौशल्य असतें. धनस्थानावर मंगळाची दृष्टि असेल तर धनाची व परिवाराची हानि होते.

धनस्थानीं बुध असेल तर धनवान् असून गणित, ज्योतिष, गायन, वादन वगैरे नाना प्रकारच्या विद्यांमध्यें कुशल असतो; हास्यविनोदी असतो; मित्रांस प्रिय असतो. बुध चतुर्थ स्थानाचा स्वामी असून धनस्थानीं असला तर सात्विक अन्न आवडतें. धन-स्थानीं बुधाची दृष्टि असेल तर धनवान् व विद्वान् असतो.

धनस्थानीं गुरु असेल तर धनवान्, विद्वान्, व्याकरणशास्त्रज्ञ असून पुष्कळ कला अवगत असतात. वृत्ति सात्विक असून कथा कीर्तनें करण्याची व पुराणें अथवा व्याख्यानें देण्याची आवड असते. मधुर पदार्थ आवडतात. जवळ सुवर्ण पुष्कळ असतें.

धनस्थानीं शुक्र असेल तर कलह करणारा, मैथुनप्रिय, चांगल्या

नेत्रांचा असून बागबगीचा करण्याची आवड असते. मधुर व नानाप्रकारच्या रसांनीं युक्त असें अन्न आवडतें. रत्नपरीक्षा असून रत्नांचा संग्रह करणारा असतो.

धनस्थानीं शनि असेल तर धनवान् असतो, परंतु शत्रु किंवा चोर धन हिरावून नेतात. कठोर मनाचा, क्रोधी, मूर्ख, पिंगट नेत्रांचा असतो. तेलांत तळलेले पदार्थ आवडतात.

धनस्थानीं राहु अथवा केतु असेल तर तामसी व दुर्भाषणी असतो.

धनस्थानचा स्वामी शुभग्रह असून केंद्रांत अथवा त्रिकोणांत असला तर आपले दशेंत पुष्कळ विद्येची व धनाची प्राप्ति करतो. परंतु ६।८।१२ स्थानांत असला तर त्याचे दशेंत सर्व धन व शिकलेली विद्या जाते, नेत्रांची हानि होते. पापग्रह असला तर विशेष दुष्ट फल येतें.

तृतीय स्थानचा स्वामी दुर्बल असून धनस्थानीं असेल आणि लग्न व धन यांचे स्वामी ६।८।१२ या स्थानीं असले तर त्यांचे दशेंत नेत्रास विकार होतो.

धनस्थानाचा स्वामी दुर्बल असून गुरूनें युक्त असेल तर विशेष विद्या व संपत्ति मिळते.

धनस्थानीं सूर्य, मंगळ अथवा शनि यांची दृष्टि असेल तर धन रहात नाहीं.

धनस्थानीं बुधानें दृष्ट असा शनि असेल अथवा शनीनें दृष्ट असा रवि असेल अथवा शुभग्रह असतील तर पुष्कळ धन व विद्या प्राप्त होतात. धनस्थानीं चंद्रानें दृष्ट बुध अथवा बुधानें दृष्ट चंद्र असेल तर द्रव्याची हानि होते, परंतु बुधानें दृष्ट शुक्र असेल तर विशेष द्रव्य प्राप्त होतें.

२ ऱ्या स्थानाचा स्वामी लग्नीं असेल तर साधारण धनवान्, निर्दय, कामी व कुटुंबास त्रास देणारा होईल.

२ ऱ्या स्थानाचा स्वामी २ ऱ्या स्थानांत असेल तर द्रव्यवान्, होईल. दोन अथवा अधिक स्त्रिया होतील.

२ ऱ्या स्थानाचा स्वामी ३ ऱ्या स्थानांत असेल तर स्वपराक्रमानें द्रव्य मिळवील.

२ ऱ्या स्थानाचा स्वामी ४ थ्या स्थानांत असेल तर परस्त्रीसंभोग करणारा, लोभी व नास्तिक होईल.

२ ऱ्या स्थानाचा स्वामी ५ व्या स्थानांत असेल तर पुत्रवान्, बुद्धिमान् व विद्वान् होईल.

२ ऱ्या स्थानाचा स्वामी ६ व्या स्थानांत असेल तर शत्रूपासून द्रव्याचा नाश व गुह्यस्थानीं पीडा होईल.

२ ऱ्या स्थानाचा स्वामी ७ व्या स्थानांत असेल तर कुटुंबांतील स्त्रिया व्यभिचारी होतील.

२ ऱ्या स्थानाचा स्वामी ८ व्या स्थानांत असेल तर भूमीपासून लाभ. स्त्रीचें व ज्येष्ठ भावंडाचें सुख अल्प मिळेल.

२ ऱ्या स्थानाचा स्वामी ९ व्या स्थानांत असेल तर उद्योगी व द्रव्यवान् होईल.

२ ऱ्या स्थानाचा स्वामी १० व्या स्थानांत असेल तर कामी, मानी, पंडित व अल्पसतति होईल.

२ ऱ्या स्थानाचा स्वामी ११ व्या स्थानांत असेल तर धनवान् होईल.

२ ऱ्या स्थानाचा स्वामी १२ व्या स्थानांत असेल तर निर्धन होईल.

## तृतीय भाव.

तिसऱ्या स्थानाचा स्वामी मंगळ असून तो ६।८।१२ स्थानांत अथवा तिसऱ्या स्थानांत असेल तर मावंडें होणार नाहींत.

मंगळ अथवा तिसऱ्या स्थानाचा स्वामी पापग्रहानें युक्त अथवा

पापग्रहाच्या राशीस असेल तर भावंडें उत्पन्न होऊन मरतील.

३ ऱ्या स्थानाचा स्वामी स्त्रीग्रह असेल अथवा तिसऱ्या स्थानांत स्त्रीग्रह असेल तर जन्मणारास बहिणी असतील. पुरुषग्रह असेल तर भाऊ असतील.

तृतीय स्थानांत बुध असेल व तृतीय स्थानाचा स्वामी चंद्रानें युक्त असेल आणि मंगळ शनीनें युक्त असेल तर एक टाकून एक बहिणी होतील.

तिसऱ्या स्थानाचा स्वामी नीच राशीला असून मंगळ राहूनें युक्त असेल तर जन्मणारास लहान भावंडें असणार नाहींत. मोठीं भावंडें दोन असतील.

भावंडांसंबंधाचा ठोकळ नियम—तिसऱ्या स्थानावर जितक्या ग्रहांची दृष्टि असेल तितकीं भावंडें बहुधा असतात.

तृतीय स्थानीं सूर्य असेल तर बुद्धिमान् व पराक्रमी असतो. परंतु सूर्याचे दर्शेत वडील भाऊ व वडील बहीण यांचा नाश होतो.

तृतीय स्थानीं चंद्र असेल तर शत्रूचा घात करतो व क्रूर असतो.

तृतीय स्थानीं मंगळ असेल तर भाऊबहिणींचा घात करतो. मंगळ तृतीय स्थानाचा स्वामी असुन ६।८।१२ या स्थानीं असेल तर बंधुहीन होतो. मंगळ ज्या स्थानीं असेल त्या स्थानापासून तिसरे स्थानामध्यें जितके पुरुषग्रह असतील तितके बंधु व जितके स्त्रीग्रह असतील तितक्या बहिणी समजाव्या.

तृतीय स्थानीं बुध असेल तर दुर्जन होतो.

तृतीय स्थानीं गुरु असेल तर रूपवती, पतिव्रता व धर्मशील स्त्री मिळते. विद्यासंपन्न असतो पण कृपण असतो.

तृतीय स्थानीं शुक्र असेल तर कृपण असतो.

तृतीय स्थानीं शनि असेल तर धाकटे भाऊ व बहिणी यांचा घात करतो.

तृतीय स्थानाचा स्वामी पापग्रह असेल अथवा तृतीय स्थानांत पापग्रह असेल अथवा तृतीय स्थानीं पापग्रह पहात असतील तर भाऊ व बहिणी नसतात. परंतु त्या पापग्रहांपैकीं एखादा पापग्रह सर्व ग्रहांमध्यें बलवान् असून उच्च असेल तर जन्मणारा मोठा पराक्रमी असून चक्रवर्ती राजा होतो व सर्व जनांचें पालन करतो. ग्रह साधारण बलवान् असून उच्च अथवा स्वस्थानींचा असल्यास न्यायाधीश होतो व मोठा मान पावतो.

तृतीय स्थानाचा स्वामी शुभग्रह असेल अथवा तृतीय स्थानीं शुभग्रह पहात असतील तर भाऊ बहिणी असतात.

तृतीय स्थानीं शनि असून तो बुध व मंगळ यांनीं दृष्ट असेल तर बहीणभावांस रोग होतो.

तृतीय स्थानाचा स्वामी पापग्रह असून ६।८।१२ स्थानीं असेल अथवा नीच किंवा अस्तंगत असेल तर भावंडांस अरिष्ट आणतो. परंतु बुळी असल्यास एकमेकांचा नाश करूं शकत नाहींत. वरील प्रमाणें शुभग्रह असतील तर कांहीं वर्षांनीं अरिष्ट करतात.

शुभग्रह तृतीय स्थानाचा स्वामी असून शुभग्रहानें युक्त अथवा दृष्ट असेल तर भावापासून अथवा बहिणीपासून धन, वस्त्र, सुवर्ण यांचा लाभ होतो. याप्रमाणें चतुर्थ स्थानाविषयीं असल्यास आई-पासून, दशम स्थानाविषयीं असल्यास बापापासून, पंचम स्थाना-विषयीं असल्यास मुलापासून अथवा मुलीपासून आणि सप्तम स्था-नाविषयीं असल्यास भार्येपासून लाभ होतो.

तिसऱ्या स्थानाचा स्वामी केंद्रीं असून त्याच्या त्रिकोणांत मंगळ असेल अथवा तो उच्च असून गुरूनें युक्त असेल तर बारा भावंडें होतील.

तिसऱ्या स्थानांत मंगळ असेल अथवा मंगळाची दृष्टि असेल तर मोठा पराक्रमी होईल.

तिसऱ्या स्थानाचा स्वामी लग्नीं असेल तर स्वपराक्रमानें द्रव्य मिळवील. साहसी, रोगी, कृश व कीर्तिमान् होईल.

तिसऱ्या स्थानाचा स्वामी २ ऱ्या स्थानांत असेल तर दुःखी होईल.

तिसऱ्या स्थानाचा स्वामी ३ ऱ्या स्थानांत असेल तर पराक्रमी, धनवान् होईल. अनेक प्रकारचें सुख भोगील.

तिसऱ्या स्थानाचा स्वामी ४ थ्या स्थानांत असेल तर सुखी होईल.

तिसऱ्या स्थानाचा स्वामी ५ व्या स्थानांत असेल तर बुद्धिमान् होईल.

तिसऱ्या स्थानाचा स्वामी ६ व्या स्थानांत असेल तर मातुलसुख मिळणार नाहीं. भावंडें शत्रु होतील.

तिसऱ्या स्थानाचा स्वामी ७ व्या स्थानांत असेल तर दुःखी होईल.

तिसऱ्या स्थानाचा स्वामी ८ व्या स्थानांत असेल तर त्यास राजद्वारीं मरण येईल. चोर व जारकर्मी होईल.

तिसऱ्या स्थानाचा स्वामी ९ व्या स्थानांत असेल तर स्त्रियांपासून द्रव्यप्राप्ति होईल, सदा रड गाणारा होईल. त्याचा बाप चोर होईल.

तिसऱ्या स्थानाचा स्वामी १० व्या स्थानांत असेल तर धनवान् होईल.

तिसऱ्या स्थानाचा स्वामी ११ व्या स्थानांत असेल तर स्वपराक्रमानें द्रव्य संपादन करील.

तिसऱ्या स्थानाचा स्वामी १२ व्या स्थानांत असेल तर दरिद्री होईल.

## चतुर्थ भाव.

चतुर्थ स्थानाचा स्वामी केंद्रांत अथवा त्रिकोणांत असेल व शुभग्रहानें युक्त असेल तर उत्तम घर मिळेल.

चतुर्थ स्थानाचा स्वामी गुरु असेल तर क्षेत्रचिंता, शुक्र किंवा बुध असेल तर स्त्री, वाहनें व भूषणें यांची चिंता, शनि असेल तर आयुष्यचिंता, रवि असेल तर पितृचिंता व चंद्र असेल तर मातृचिंता होईल.

चतुर्थ स्थानीं मंगळ असेल अथवा चतुर्थ स्थानाचा स्वामी मंगळ असेल तर योद्धा, सेनापति, मोठा पराक्रमी होतो. कारागृहवास घडतो. चतुर्थ स्थानाचा स्वामी मंगळ असून तो चतुर्थ स्थानीं असेल तर देशभक्त असून दिगंत कीर्ति पावतो. राजास अप्रिय असतो व बंधन पावतो.

चतुर्थ स्थानाचा स्वामी स्वगृहीं अथवा उच्च अथवा पंचमस्थानीं असेल तर अत्यंत सुखी होतो.

चतुर्थ स्थानांत शुभग्रह असेल अथवा चतुर्थ स्थानाचा स्वामी शुभग्रहानें युक्त असेल तर माता पुष्कळ दिवस जगेल.

चतुर्थ स्थानांत रवि–शनि, ९ व्या स्थानांत चंद्र व ११ व्या स्थानांत मंगळ असा योग असेल तर गाई व म्हशी यांचा लाभ होतो.

चतुर्थ स्थानांत सूर्य, मंगळ अथवा शनि असतील तर दुःखी असतो व अंतःकरण निरंतर उद्विग्न असतें.

चतुर्थ स्थानांत चंद्र, गुरु अथवा शुक्र असेल तर सुखी असतो.

चतुर्थ स्थानीं बुध असेल तर पंडित होतो.

चवथ्या स्थानाचा स्वामी चवथ्या स्थानांत असून शुभग्रहानें युक्त अथवा दृष्ट असेल व नवव्या स्थानाच्या स्वामीनें युक्त असेल तर मांडलिक राजा असतो व चतुर्थ स्थानाच्या स्वामीचे दशेंत राज्याधिकार प्राप्त होतात.

चतुर्थ स्थानाधिपति लग्नीं असून गुरूनें दृष्ट असेल तर गाडीघोडे यांची प्राप्ति होते.

चतुर्थ स्थानाचा स्वामी चतुर्थ स्थानीं असून लग्नस्वामीनें युक्त असेल तर यत्नावांचून छानदार घर मिळतें.

चतुर्थ स्थानाच्या स्वामीच्या मित्रग्रहांची त्यावर दृष्टि असेल तर मित्रांची प्रीति फार असते.

चतुर्थ स्थानाचा स्वामी अन्यगृहीं असल्यास मालकाचें घर मिळणार नाहीं. परंतु शुभग्रहांनीं युक्त अथवा दृष्ट असल्यास आयासानें घर मिळेल किंवा बांधील.

दुसऱ्या, चवथ्या, आठव्या व दहाव्या स्थानांचे स्वामी ६।८।१२ स्थानीं असतील तर अथवा पापग्रहांनीं युक्त असतील तर घर पडेल किंवा जळेल.

चतुर्थ स्थानीं पापग्रह असतील व शुभग्रहानें युक्त अथवा दृष्ट नसतील तर उत्तम वाहनें असलीं तरी नाश पावतील.

चतुर्थ स्थानाचा स्वामी गुरुशुक्रांनीं युक्त असून केंद्रांत, त्रिकोणांत, दुसऱ्या, तिसऱ्या किंवा अकराव्या स्थानीं असेल तर मातृसुख चांगलें मिळतें. इच्छेप्रमाणें अन्न, वस्त्र, सुगंध पदार्थ, शेतें, पुरें, बगीचा, हवेल्या, बंगले, पलंग, नरम बिछाने, गाया, तक्ये, हत्ती घोडे, घोड्यांच्या गाड्या, पालख्या, मेणे, उत्तम मित्र वगैरे ऐश्वर्य प्राप्त होतें. ह्याच ग्रह नीच असेल तर ऐश्वर्य असलें तरी देखील जातें.

चतुर्थ स्थानाचा स्वामी लग्नीं असेल तर मोठा विद्वान् होईल, परंतु सभेमध्यें वक्तृत्व चमकणार नाहीं.

चतुर्थ स्थानाचा स्वामी २ ऱ्या स्थानांत असेल तर संपत्तिमान व कुटुंबी होईल.

चतुर्थ स्थानाचा स्वामी ३ ऱ्या स्थानांत असेल तर नेहमीं रोगग्रस्त असेल.

चतुर्थ स्थानाचा स्वामी ४ थ्या स्थानांत असेल तर गृहसुख व मातृसुख मिळेल. स्त्रीप्रिय व सुखी होईल.

चतुर्थ स्थानाचा स्वामी ५ व्या स्थानांत असेल तर विष्णुभक्त, सुखी व सर्व लोकांत प्रिय होईल.

चतुर्थ स्थानाचा स्वामी ६ व्या स्थानांत असेल तर सावत्रमाता असतील. चोर व व्यभिचारी होईल.

चतुर्थ स्थानाचा स्वामी ७ व्या स्थानांत असेल तर विद्वान् आणि वडिलोपार्जित धनाचें दान करणारा होईल.

चतुर्थ स्थानाचा स्वामी ८व्या स्थानांत असेल तर दुःखी, नपुंसक होईल. पितृसौख्य अल्प मिळेल व माता वाईट चालीची असेल.

चतुर्थ स्थानाचा स्वामी ९ व्या स्थानांत असेल तर स्वपराक्रमानें द्रव्य मिळवील व सुखी होईल.

चतुर्थ स्थानाचा स्वामी १० व्या स्थानांत असेल तर राजमान्य होईल व अनेक प्रकारचें सुख भोगील.

चतुर्थ स्थानाचा स्वामी ११ व्या स्थानांत असेल तर रोगी होईल.

चतुर्थ स्थानाचा स्वामी १२ व्या स्थानांत असेल तर दुःखी होईल.

## पंचम भाव.

पंचम स्थानाचा स्वामी गुरु असेल तर चांगले सद्गुणी पुत्र होतील.

पंचम स्थानाचा स्वामी केंद्रीं अथवा त्रिकोणांत असेल तर पुत्र होतील.

पंचम स्थानाचा स्वामी ६।८।१२ स्थानांत असेल तर पुत्र होणार नाहीं.

शनि अथवा राहु यांनीं युक्त अथवा दृष्ट असेल तर दत्तक पुत्र घ्यावा लागेल.

पंचम स्थानाचा स्वामी चंद्रानें युक्त असेल तर कन्यासंतति होईल.

पंचम स्थानाचा स्वामी स्त्रीग्रह असेल अथवा त्या स्थानांत स्त्रीग्रह असेल तर कन्यासंतति होईल.

पंचम स्थानाचा स्वामी पुरुषराशीस, चंद्र राहूनें युक्त आणि पंचम स्थानांत शनि असेल तर दुसऱ्यापासून संतति होईल.

पंचम स्थानाचा स्वामी पंचम स्थानीं राहुसंयुक्त असेल व चंद्र अथवा गुरु यांनीं दृष्ट नसेल तर दुसऱ्यापासून संतति होईल.

पंचम स्थानाचा स्वामी उच्च असून २।५।९ स्थानांत असेल व त्यावर गुरूची दृष्टि असेल तर पुत्र भाग्यवान् होतील.

तिसऱ्या व चवथ्या स्थानांत पापग्रह असतील, पंचम स्थानाचा स्वामी पापग्रहानें युक्त असेल अथवा द्वादश स्थानांत असेल तर पुत्र वाईट स्थितीमध्यें दिवस काढतील.

पंचम स्थानांत गुरु असेल व पंचम स्थानाचा स्वामी शुक्रानें युक्त असेल तर ३२ वर्षांनंतर संतति होईल.

नवम स्थानांत गुरु व गुरूच्या नवमस्थानांत शुक्र असून तो लग्नस्वामीनें युक्त असेल तर ४० वे वर्षी पुत्रसंतति होईल.

पंचमस्थानांत राहु व पंचम स्थानाचा स्वामी पापग्रहानें युक्त असेल आणि गुरु नीच राशीस असेल तर ३२व्या वर्षी पुत्र मरेल.

पंचम स्थानांत अथवा गुरूपासून पांचव्या स्थानांत पापग्रह असेल तर २६।३२।४० या वर्षी सुतक्षय होईल.

लग्नीं राहु व लग्नस्वामी नीच राशीस असेल तर ५६ व्या वर्षी पुत्रशोक होईल.

४ थ्या व ६ व्या स्थानांत पापग्रह व पंचम स्थानाचा स्वामी उच्च असून लग्नस्वामीनें युक्त असेल तर संतति १० होईल.

नवमस्थानाचा स्वामी नवम स्थानांत असेल तर संतति ९ होईल.

पंचम स्थानाच्या नवम स्थानांत गुरु असेल, पंचम स्थानाचा स्वामी बलवान् असेल व द्वितीय स्थानाचा स्वामी दशम स्थानांत असेल तर संतति ८ होईल.

पंचम स्थानाचा स्वामी पंचम स्थानांत असून पंचम स्थानाच्या पंचम स्थानांत शनि असेल तर संतति ७ होईल व २ गर्भपात होतील.

द्वितीय स्थानाचा स्वामी पंचम स्थानांत असेल व पंचम स्थानाचा स्वामी पंचम स्थानांत असेल तर संतति ६ होईल व त्यांत ३ जगतील.

पंचम स्थानांत गुरु, त्याच्या पंचमांत शनि व त्याच्या पंचमांत राहु असेल तर एक पुत्र होईल.

पंचम स्थानांत पापग्रह व गुरूच्या पंचम स्थानांत शनि असेल तर तीन स्त्रिया होतील व तिसरीस किंवा दुसरीस संतति होईल.

पंचम स्थानांत पापग्रह असतील तर संतति जगणार नाही.

पंचम स्थानांत सूर्य, मंगळ अथवा शनि असेल तर संतति होत नाही. झाली तर सूर्याचे दशेंत नष्ट होते व दारिद्र्य येतें.

पंचम स्थानांत चंद्र असेल तर पुत्राला कन्या संतति होते. बुध असेल तर पुत्र शिक्षक अथवा हिशोबाचे कामावरचा अधिकारी होतो. गुरु असेल तर पुत्र विचारी होतो. शुक्र असेल तर पुत्र सुखी होतो.

पंचम स्थानांत कन्या राशीचा सूर्य असेल किंवा पंचम स्थानीं सिंह अथवा मकर राशीचा मंगळ असेल तर त्या ग्रहाचे दशेंत संतति होते व जाते.

पंचम स्थानाचा स्वामी पापग्रह असेल, पंचम स्थानांत बलिष्ठ पापग्रह असतील अथवा पंचम स्थान पापग्रहानें दृष्ट असल आणि त्यामध्यें शुभग्रह नसेल अथवा त्यावर शुभग्रहाची दृष्टि नसेल तर संतति मुळीच होत नाही.

पंचम स्थानीं क्षीण चंद्र आणि लग्न, सप्तम स्थान व द्वादश

स्थान या स्थानीं पापग्रह असतील तर स्त्री व पुत्र नसतात.

पंचम स्थानाचा स्वामी ६।८।१२ स्थानीं असेल तर विद्याहीन होतो.

पंचम स्थानाचा स्वामी पंचम स्थानी, स्वक्षेत्रीं अथवा नवम स्थानीं बुध अथवा गुरूनें युक्त असेल तर विद्वान् होतो.

पंचम स्थानाचा स्वामी अथवा गुरु ६।८।१२ स्थानीं असेल तर मुका होतो; शुभग्रह अथवा मित्रग्रह यांनीं युक्त अथवा दृष्ट असा ६।८।१२ स्थानीं असेल तर वाणीत दोष असतो.

पंचम स्थानी गुरु व नवमस्थानीं पापग्रह असेल तर संतति होणार नाहीं.

गुरूपासून ६ व्या, ८ व्या अथवा १२ व्या स्थानांत पंचमाधिपति असेल आणि लग्नेश, पंचमेश व नवमेश यांचा योग असेल तर संतति मुळींच होणार नाहीं.

पंचम स्थानीं स्वगृहींचा चंद्र असेल तर कन्यासंतति होईल. स्वगृहींचा शुक्र असेल तर पुष्कळ कन्या होतील. पंचमस्थानीं चंद्र, बुध व शुक्र यांपैकीं कोणताहि ग्रह असेल तरी कन्यासंतति अधिक होईल.

मकर अथवा कुंभ राशीपासून पंचम स्थानी शनि असेल तर एक पुत्र होईल. कुंभ राशीचा शनि पंचम स्थानीं असेल तर पांच मुलगे होतील. मकर राशीचा शनि पंचम स्थानी असेल तर संततींपैकीं तीन कन्या होतील. मकर राशीचा मंगळ पंचम स्थानीं असेल तर तीन पुत्र होतील. गुरु स्वगृहींचा अथवा उच्च पंचम स्थानीं असेल तर पांच पुत्र होतील. पंचम स्थानी राहु अथवा केतु मेष, वृषभ अथवा कर्क राशीचा असल्यास अल्पवयांत संतति होईल. चतुर्थ स्थानी पापग्रह किंवा पंचम स्थानी गुरु, आणि अष्टम स्थानीं चंद्र असेल तर ३० वर्षांनंतर संतति होऊं लागेल.

लग्नीं, द्वितीय किंवा तृतीय स्थानीं एखादा असेल तर पहिला पुत्र होतो.

शुक्र, मंगळ आणि चंद्र धनु खेरीज द्विस्वभाव राशीत असले तर संतति व्यक्त होईल. हे ग्रह धनु राशीस असले तर संतति होणार नाहीं.

पंचम स्थानीं सूर्य स्वगृहींचा असेल तर प्रथम पुत्र होतो. अन्य राशींचा असेल तर गर्भस्राव करितो.

पंचम स्थानीं बुध, गुरु किंवा शुक्र असेल तर बुद्धिमान्, कीर्तिमान्, ग्रंथकार व मित्रापासून सुख पावणारा होतो.

पंचम स्थानीं शनि स्वगृहींचा असून चंद्रानें दृष्ट असेल तर दत्तक पुत्र घेतो.

पंचम स्थानाचा स्वामी लग्नीं असेल तर मायावी, दुष्ट व अत्यंत लोभी होईल.

पंचम स्थानाचा स्वामी २ऱ्या स्थानांत असेल तर धनवान् होईल.

पंचम स्थानाचा स्वामी ३ ऱ्या स्थानांत असेल तर अत्यंत लोभी होईल.

पंचम स्थानाचा स्वामी ४ थ्या स्थानांत असेल तर मातृसुख मिळेल व धनवान् होईल.

पंचम स्थानाचा स्वामी ५ व्या स्थानांत असेल तर संतति जगणार नाहीं.

पंचम स्थानाचा स्वामी ६ व्या स्थानांत असेल तर संतति होऊन मरेल व दत्तक पुत्र होईल.

पंचम स्थानाचा स्वामी ७ व्या स्थानांत असेल तर धनवान् व पराक्रमी होईल.

पंचम स्थानाचा स्वामी ८ व्या स्थानांत असेल तर दम्याचा विकार होईल.

पंचम स्थानाचा स्वामी ९ व्या स्थानांत असेल तर पंडित व ग्रंथकर्ता होईल.

पंचम स्थानाचा स्वामी १० व्या स्थानांत असेल तर संतति राजासारखी होईल.

पंचम स्थानाचा स्वामी ११ व्या स्थानांत असेल तर ग्रंथकर्ता होईल.

पंचम स्थानाचा स्वामी १२ व्या स्थानांत असेल तर संतति जगणार नाहीं.

षष्ठ भाव.

षष्ठ स्थानाचा स्वामी पापग्रह असून तो १।८।१० स्थानांत असेल तर भगरोगी होईल.

रवि षष्ठ स्थानाच्या स्वामीनें युक्त असेल तर मस्तकावर व्रण होईल.

चंद्र षष्ठ स्थानाच्या स्वामीनें युक्त असेल तर मुखावर व्रण होईल.

मंगळ षष्ठ स्थानाच्या स्वामीनें युक्त असेल तर गळ्यावर व्रण होईल.

बुध षष्ठ स्थानाच्या स्वामीनें युक्त असेल तर नाभीच्या ठायीं व्रण होईल.

गुरु षष्ठ स्थानाच्या स्वामीनें युक्त असेल तर नाकावर व्रण होईल.

शुक्र षष्ठ स्थानाच्या स्वामीनें युक्त असेल तर डोळ्यावर व्रण होईल.

शनि षष्ठ स्थानाच्या स्वामीनें युक्त असेल तर पायावर व्रण होईल.

राहु–केतु षष्ठ स्थानाच्या स्वामीनें युक्त असतील तर कुशीवर व्रण होईल.

षष्ठ व अष्टम स्थानांचे स्वामी जरी रविग्रह असतील तर नागानें अपमृत्यु येईल. चंद्रग्रह असतील तर पाणी व कफ यांपासून भय प्राप्त होईल. मंगळग्रह असतील तर शस्त्रादिकांनी जखमा होतील. बुधग्रह असतील तर पित्तरोग होईल. गुरुग्रह असतील तर

निरोगी होईल. शुक्रासह असतील तर धातुरोग होईल. शनीसह असतील तर वातरोग होईल.

षष्ठ स्थानात पापग्रह असेल किंवा षष्ठ स्थानचा स्वामी पापग्रहानें युक्त असेल किंवा षष्ठ स्थानीं राहुशनियोग असेल तर सदा रोगी असेल.

षष्ठ स्थानात मंगळ असेल व षष्ठ स्थानचा स्वामी अष्टम स्थानांत असेल तर ६ आणि १२ या वर्षी ज्वररोगी होईल.

षष्ठ स्थानांत गुरु व गुरूच्या गृहीं चंद्र असेल तर अंगावर कोड उठेल.

द्वादश स्थानाचा स्वामी षष्ठ स्थानांत व षष्ठ स्थानाचा स्वामी द्वादश स्थानात असेल तर ३० व्या वर्षी गुल्मरोग होईल.

षष्ठ स्थानात चंद्र शनीसह असेल तर ५५ व वर्षी रक्तकुष्ठ होईल.

लग्नस्वामी लग्नीं व षष्ठ स्थानाच्या स्वामीसह शनि षष्ठ स्थानीं असेल तर ५९ वे वर्षी वातरोग होईल.

अष्टम स्थानाचा स्वामी षष्ठ स्थानात, द्वादश स्थानाचा स्वामी लग्नांत व चंद्र षष्ठ स्थानाच्या स्वामीसह असेल तर ८ व्या वर्षी पशूपासून भय होईल.

षष्ठ स्थानाच्या अष्टम स्थानांत राहु व त्याच्या अष्टम स्थानात शनि असेल तर एक वर्षानें अग्निभय जाणावें.

एकादश स्थानाचा स्वामी षष्ठ स्थानात व षष्ठ स्थानाचा स्वामी एकादश स्थानात असेल तर ३१ व्या किंवा ४१ व्या वर्षी शत्रुसंबधानें संपत्तीचा क्षय होईल.

पंचम स्थानाचा स्वामी षष्ठ स्थानांत, षष्ठ स्थानाचा स्वामी गुरूनें युक्त व द्वादश स्थानाचा स्वामी लग्नीं असेल तर त्याचे पुत्रच त्याला शत्रु होतील.

षष्ठ स्थानीं सूर्य असेल तर जठराग्नि प्रदीप्त असतो; कामी,

श्रीमान्, शक्तिमान्, कीर्तिमान्, न्यायाधीश असतो; शत्रूचा व रोगाचा नाश करतो.

षष्ठ स्थानीं चंद्र असेल तर शत्रूपासून पीडा, अग्नि मंद, कुलदेवतेचा कोप व आळशी स्वभाव हीं प्राप्त होतात.

षष्ठ स्थानीं मंगळ असेल तर शत्रूपासून जय मिळवतो.

षष्ठ स्थानीं बुध असेल तर पत्नीला रोग होतो. भटकणारा असतो. शत्रु नसतात.

षष्ठ स्थानीं गुरु असेल तर आळशी, रागीट, दुष्ट वाक्य बोलणारा, पराजय पावणारा, स्त्रीच्या आधीन, अल्पाहारी होईल. शत्रु नसतात.

षष्ठ स्थानीं शुक्र असेल तर कुकर्मी, दरिद्री, दुष्टबुद्धि व भितरा असतो. शत्रु नसतात.

षष्ठ स्थानीं शनि असेल तर मस्तकावर दगड पडून इजा होते. बीज पडते.

षष्ठ स्थानीं शनि, राहु अथवा अथवा केतु असेल तर अल्पाहारी, शत्रूवर जय मिळविणारा असतो.

षष्ठ स्थानाचा स्वामी सूर्य असून लग्नीं असेल तर मस्तकावर कुष्ट उत्पन्न करतो.

षष्ठ स्थानीं पापग्रह असले किंवा त्यांची दृष्टि असली तर शत्रूंचा नाश होतो. शुभग्रह अथवा शुभग्रहांची दृष्टि असली तर शत्रूंची वृद्धि होते.

लग्नेश षष्ठ स्थानीं सूर्यानें युक्त असला तर जनावरापासून खाइक होते. चंद्रानें युक्त असला तर जलचराचे योगानें खाइक होते. मंगळानें युक्त असला तर शस्त्र लागून खाइक होते. बुधानें युक्त असला तर पित्तरोग होतो. गुरूनें युक्त असला तर जिभेस रोग होतो. शुक्रानें युक्त असला तर पंडुरोग होतो. शनीनें युक्त

असला तर चोरांपासून उपद्रव होऊन खोड्क होतें. राहु अथवा केतु यानें युक्त असेल तर महामारीचा किंवा देवीचा उपद्रव होतो.

षष्ठ स्थानाचा स्वामी लग्नीं असेल तर शत्रूचा नाश होतो. धनस्थानीं असेल तर पुत्रापासून धन मिळेल. सहज स्थानीं असेल तर सर्व लोकांस त्रास देतो.

षष्ठ स्थानाचा स्वामी लग्नांत असेल तर नित्य रोगी होईल.

षष्ठ स्थानाचा स्वामी २ ऱ्या स्थानांत असेल तर वक्ता व कुलदीपक होईल.

षष्ठ स्थानाचा स्वामी ३ ऱ्या स्थानांत असेल तर संपत्तिमान्, दुष्ट व द्वेषी होईल.

षष्ठ स्थानाचा स्वामी ४ थ्या स्थानात असेल तर रागीट व स्वच्छंदी होईल.

षष्ठ स्थानाचा स्वामी ५ व्या स्थानांत असेल तर आत्मकार्यांत चतुर व दयाळू होईल.

षष्ठ स्थानाचा स्वामी ६ व्या स्थानांत असेल तर स्वजातीचे लोक शत्रु होतील परजातीचे लोक मित्र होतील.

षष्ठ स्थानाचा स्वामी ७ व्या स्थानात असेल तर धनवान् व पुत्रहीन होईल.

षष्ठ स्थानाचा स्वामी ८ व्या स्थानांत असेल तर रोगी, सर्वांचा शत्रु व जारकर्मी होईल.

षष्ठ स्थानाचा स्वामी ९ व्या स्थानांत असेल तर व्यापारी होईल व धंद्यास नित्य भरतीओहोटी असेल.

षष्ठ स्थानाचा स्वामी १० व्या स्थानांत असेल तर कीर्तिमान् होईल.

षष्ठ स्थानाचा स्वामी ११ व्या स्थानांत असेल तर धनवान् परंतु निपुत्रिक होईल.

षष्ठ स्थानाचा स्वामी १२ व्या स्थानांत असेल तर हिंसक होईल.

## सप्तम भाव.

सप्तम स्थानाचा स्वामी गुरु असून तो सप्तम स्थानीं असेल अथवा सप्तम स्थानीं पहात असेल तर स्त्री सुंदर, सद्गुणी व पतिव्रता मिळेल.

सप्तम स्थानाचा स्वामी शुक्र असून तो सप्तम स्थानीं असेल अथवा सप्तम स्थानीं पहात असेल तर स्त्री रूपवती मिळेल.

सप्तम स्थानीं जितके शुभग्रह असतील अथवा पहात असतील तितक्या स्त्रिया मिळतील.

सप्तम स्थानाचा स्वामी जर ६।८।१२ स्थानांत उच्च अथवा स्वगृह सोडून असेल तर स्त्री रोगी मिळेल.

शुक्र सप्तम स्थानांत असेल तर अति कामी होईल. तोच कोणत्याहि ठिकाणीं पापग्रहानें युक्त असेल तर स्त्री मरण पावेल.

सप्तम स्थानाचा स्वामी उच्च, वक्र, शत्रुक्षेत्री, नीच अगर अस्तंगत असेल तर अनेक लग्नें होतील.

सप्तम स्थानांत रवि असेल तर वंध्या स्त्रीशीं संग घडेल. चंद्र असेल तर स्वजातीच्या स्त्रीशीं संग होईल. मंगळ असेल तर रजस्वलासंग, बुध असेल तर हीनस्त्रीसंग, गुरु असेल तर ब्राह्मणस्त्रीसंग किंवा गर्भिणीसंग, शनि राहु किंवा केतु असेल तर महारमांग वगैरे जातीच्या स्त्रीशीं संग घडेल.

सप्तम स्थानीं रवि असेल तर स्त्रीचे स्तन कठिण व उभे असतील; मंगळ असेल तर बारीक स्तन असतील; शनि किंवा राहु असेल तर स्त्री लंबस्तनी असेल; इतर ग्रह असतील तर स्थूल व उत्तम स्तनांची स्त्री मिळेल.

सप्तम स्थानांत शनि किंवा मंगळ असेल किंवा ते सप्तम स्थानाचे

स्वामी अमतील व शुभग्रहांचा योग नसेल तर स्त्री वेश्या किंवा जारिणी होईल.

शुक्र मंगळाच्या राशीस, मंगळानें युक्त अथवा दृष्ट असेल तर जन्मणारा अत्यंत विषयी होईल.

सप्तम स्थानाचा स्वामी नीच किंवा पापग्रहाच्या राशीस किंवा अनेक पापग्रहांनी युक्त असून सप्तम स्थानांत नपुंसक ग्रह असेल तर दोन स्त्रिया होतील.

सप्तम स्थानांत मंगळ, चंद्राच्या सप्तमांत शुक्र व लग्नस्वामी अष्टम स्थानांत असा योग असेल तर तीन स्त्रिया होतील.

शुक्र द्विस्वभाव राशीस असेल व त्या राशीचा स्वामी उच्च असून सप्तम स्थानाचा स्वामी बलवान् असेल तर पुष्कळ स्त्रिया होतील.

सप्तम स्थानाचा स्वामी शुभग्रहाच्या राशीस असून शुक्र उच्च किंवा स्वगृही असेल तर ९ व्या वर्षी विवाह होईल.

सप्तम स्थानांत सूर्य व सप्तम स्थानाचा स्वामी शुक्रानें युक्त असेल तर ११ व्या वर्षी विवाह होईल.

केंद्री शुक्र, लग्नस्वामी शनीच्या राशीस असा योग असेल तर ११ व्या वर्षी विवाह होईल.

शुक्र २ ऱ्या स्थानांत व सप्तम स्थानाचा स्वामी ११ व्या स्थानांत असेल तर १६ व्या वर्षी विवाह होईल.

केंद्री शुक्र व शुक्राच्या केंद्री शनि असेल तर १९ व्या वर्षी विवाह होईल.

द्वितीय स्थानाचा स्वामी ११ व्या स्थानांत व लग्नस्वामी १० व्या स्थानांत असेल तर १५ व्या वर्षी विवाह होईल.

द्वितीय स्थानाचा स्वामी ११ व्या स्थानांत व ११ व्या स्थानाचा स्वामी द्वितीय स्थानांत असेल तर १३ व्या वर्षी विवाह होईल.

चंद्राच्या सप्तम स्थानांत शुक्र व शुक्राच्या सप्तम स्थानांत शनि असेल तर १८ व्या वर्षी विवाह होईल.

अष्टम स्थानाच्या सप्तम स्थानांत (म्हणजे द्वितीय स्थानीं) शुक्र असून त्या स्थानाचा स्वामी मंगळाशीं संयुक्त असेल तर २२ व्या किंवा २७ व्या वर्षी विवाह होईल.

अष्टम स्थानाचा स्वामी सप्तम स्थानांत व लग्नांत शुक्र असेल तर २५ व्या किंवा ३३ व्या वर्षी विवाह होईल.

नवम स्थानाच्या सप्तम स्थानांत शुक्र व त्याच्या सप्तम स्थानांत सप्तम स्थानाचा स्वामी असेल तर २७ व्या किंवा ३० व्या वर्षी विवाह होईल.

सप्तम स्थानाचा स्वामी नीच असून शुक्र ६ व्या किंवा ८ व्या स्थानांत असेल तर १८ व्या किंवा ३३ व्या वर्षी स्त्री मरण पावेल.

सप्तम स्थानाचा स्वामी १२ व्या स्थानांत व १२ व्या स्थानाचा स्वामी सप्तम स्थानांत असेल तर १९ व्या वर्षी स्त्री मरण पावेल.

द्वितीय स्थानांत राहु व सप्तम स्थानांत मंगळ असेल तर पाणिग्रहणानंतर तीन दिवसांनीं सर्पदंश होऊन स्त्री मरेल.

अष्टम स्थानांत शुक्र व अष्टम स्थानाचा स्वामी शनीच्या राशीस असेल तर १२ व्या किंवा १९ व्या वर्षी स्त्री मरण पावेल.

सप्तमस्वामी नीच राशीस असून द्वितीय स्थानाचा स्वामी अष्टम स्थानांत असेल तर ४० व्या वर्षी स्त्री मरण पावेल.

शुक्राच्या सप्तम स्थानांत चंद्र, चंद्राच्या सप्तम स्थानांत बुध व अष्टम स्थानाचा स्वामी पंचम स्थानांत असेल तर १०।१२।२२ या या वर्षी तीन निरनिराळे विवाह होतील.

लग्नीं गुरु व सप्तम स्थानीं शनि असेल तर वात होऊन लड्ड होतो व शेवटीं अंधळा होतो.

लग्नीं सूर्य व सप्तम स्थानीं शनि असेल तर स्त्रीचा अतिशय जाच करतो.

सप्तमेश लग्नापासून किंवा चंद्रापासून सप्तम स्थानीं शुभग्रहांनीं युक्त अथवा दृष्ट असेल तर त्यात मनाजोगती स्त्री मिळेल.

. सप्तमेश सप्तमांत व द्वितीयेश द्वितीयांत असेल तर एकच विवाह होतो.

कन्यालग्नीं सूर्य असेल व शनि मीनस्थ असेल तर स्त्रीचा नाश होतो. सूर्य, मंगळ व शनि हे शुक्रापासून चतुर्थ किंवा अष्टम असले तर स्त्री जळून मरेल.

शुक्रापासून एक पापग्रह द्वितीय स्थानीं व दुसरा एकादश स्थानीं असेल तर स्त्री घरावरून पडून मरेल.

जन्मकाळीं शुक्र शुभग्रहांनीं युक्त अथवा दृष्ट नसेल तर त्याची पहिली स्त्री मरेल.

शुक्र व चंद्र एका राशीस असून त्यांचे सप्तम स्थानीं शनि व मंगळ असले तर जन्मणारास स्त्री नसते.

ज्याच्या कुंडलींत सप्तम स्थानीं शनि व मंगळ असून ते शुभग्रहांनीं दृष्ट नसतील त्याची स्त्री विधवा होते.

चंद्र व शनि यांचा सप्तम स्थानीं योग असेल तर पुनर्विवाह करितो अथवा पाट लावतो.

सप्तम स्थानीं पापग्रहानें युक्त शुक्र अथवा चंद्र असेल तर वेश्यागमनी होतो, केतु असेल तर रखेली ठेवतो.

बुध व शुक्र यांचा सप्तम स्थानीं योग असेल तर स्त्री वांचत नाहीं. शुभग्रह पहात असतील तर कालान्तरानें स्त्री मिळते.

षष्ठ स्थानीं मंगळ, सप्तमांत राहु व अष्टमांत शनि असेल तर स्त्रीला गंडांतर येतें.

सप्तम स्थानीं सूर्य, मंगळ अथवा शनि असेल तर स्त्रीच्या

आर्धन असतो. चंद्र असेल तर स्वस्त्रीवर अतिशय प्रेम करतो, परंतु लोकांचे संततीचा द्वेष करतो. बुध असेल तर धर्म जाणणारा होतो. गुरु अथवा शुक्र असेल तर पित्यापेक्षा जास्त गुणांनीं युक्त असतो.

सप्तम स्थानाचा स्वामी शनि असेल तर दुष्ट व वातरोगी होईल.

सप्तम स्थानाचा स्वामी २ ऱ्या स्थानांत असेल तर अनेक स्त्रिया भोगील.

सप्तम स्थानाचा स्वामी ३ ऱ्या स्थानांत असेल तर संतति जगणार नाहीं.

सप्तम स्थानाचा स्वामी ४ थ्या स्थानांत असेल तर स्त्री पतिव्रता असेल.

सप्तम स्थानाचा स्वामी ५ व्या स्थानांत असेल तर आनंदी, धनवान् व मानी होईल.

सप्तम स्थानाचा स्वामी ६ व्या स्थानांत असेल तर स्त्री रोगी मिळेल.

सप्तम स्थानाचा स्वामी ७ व्या स्थानांत असेल तर परस्त्रीलंपट व धैर्यवान् होईल.

सप्तम स्थानाचा स्वामी ८ व्या स्थानांत असेल तर स्त्रीसंबंधानें दुःख पावेल.

सप्तम स्थानाचा स्वामी ९ व्या स्थानांत असेल तर स्त्रीच्या ठिकाणीं निरंतर चित्त असेल.

सप्तम स्थानाचा स्वामी १० व्या स्थानांत असेल तर धर्मशील व सत्यवादी होईल.

सप्तम स्थानाचा स्वामी ११ व्या स्थानांत असेल तर संतति जगणार नाहीं.

सप्तम स्थानाचा स्वामी १२ व्या स्थानांत असेल तर दरिद्री आणि कृपण होईल.

## अष्टम भाव.

अष्टम स्थानाचा स्वामी व लग्नस्वामी पापग्रहांनी युक्त असतील तर अल्पायुषी होईल.

षष्ठ स्थानाचा स्वामी ६ व्या किंवा १२ व्या स्थानांत आणि द्वादश स्थानाचा स्वामी १२ व्या किंवा ६ व्या स्थानांत असेल आणि दोन्ही स्थानांचे स्वामी लग्नांत किंवा अष्टमांत असतील तर दीर्घायुषी होईल.

लग्नस्वामी किंवा अष्टम स्थानाचा स्वामी स्वगृही किंवा मित्रक्षेत्री असे असतील तर दीर्घायुषी होईल.

अष्टम स्थानाचा स्वामी केंद्री व लग्नस्वामी बलहीन असेल तर अल्पायु होईल.

अष्टम स्थानाचा स्वामी नीच राशीत असून अष्टम स्थानांत पापग्रह असतील व लग्नस्वामी दुर्बल असेल तर अल्पायु होईल.

अष्टम स्थानाचा स्वामी पापग्रहानें युक्त व अष्टम स्थानांत पापग्रह असतील व १२ व्या स्थानांतहि पापग्रह असतील तर अल्पायु होईल.

केंद्र व त्रिकोण यांत पापग्रह आणि षष्ठ स्थानांत व अष्टम स्थानांत शुभग्रह असतील तर अल्पायुषी होईल.

५ व्या व ८ व्या स्थानांत पापग्रह असून अष्टम स्थानाचा स्वामी पापग्रहानें युक्त असेल तर अल्पायुषी होईल.

अष्टम स्थानाचा स्वामी अष्टम स्थानांत व चंद्र पापग्रहानें युक्त असेल तर अल्पायुषी होईल.

लग्नस्वामी उच्च, ११ व्या स्थानांत चंद्र व ८ व्या स्थानांत गुरु असेल तर दीर्घायुषी होईल.

लग्नेश व अष्टमेश शुभग्रह असून त्यांचा योग असेल तर आरोग्य होतें. हाच योग पापग्रहांचा असेल तर शरीरास दुःख

अष्टम स्थानीं सूर्य, मंगळ अथवा शनि असेल तर संतति थोडी व मन उद्विग्न असतें. चंद्र असेल तर चपळ बुद्धीचा व रोगी असतो. बुध असेल तर प्रख्यात व गुणी असतो. गुरु अथवा शुक्र असेल तर उचित कर्मे करतो.

चतुर्थ स्थानीं चंद्र व सूर्य यांचा योग अथवा दृष्टि असेल आणि शुभ ग्रहांचा योग अथवा दृष्टि नसेल तर लवकर मृत्यु पावतो. अष्टम स्थानाचा स्वामी मंगळ असून अष्टम स्थानीं गुरु असेल व त्यावर सूर्य, चंद्र व शनि यांची दृष्टि असेल आणि शुक्राची दृष्टि नसेल तर लवकरच मरतो. दशम स्थानाचा स्वामी मंगळ किंवा शनि असून दशम स्थानीं सूर्य असेल व त्यावर पापग्रहांची दृष्टि असेल तर लवकरच अरिष्ट येतें. चंद्र सहाव्या किंवा आठव्या स्थानीं असून पापग्रहांनीं दृष्ट असेल तर लवकरच अरिष्ट येतें. त्या चंद्रावर पापग्रहांबरोबर शुभ ग्रहांचीहि दृष्टि असेल तर कांहीं काळानंतर अरिष्ट येतें. लग्न, सप्तम अथवा अष्टम स्थानीं चंद्र पापग्रहांनीं युक्त असून त्यावर शुभग्रहाची दृष्टि नसेल व केंद्रांतही शुभग्रह नसेल तर लवकरच अरिष्ट येतें. अष्टम स्थानांत व केंद्रांत पापग्रह असून लग्नीं क्षीण चंद्र असेल तर लवकरच अरिष्ट येतें.

सप्तम व अष्टम स्थानीं पापग्रह असून ते पापग्रहांनीं दृष्ट असतील व त्यांवर शुभ ग्रहाची दृष्टि नसेल तर मातेसुद्धां बालकावर अरिष्ट येतें.

लग्नीं पापग्रहांनीं युक्त चंद्र व अष्टम स्थानांत मंगळ असेल तर मातेसुद्धां बालकावर अरिष्ट येतें.

अष्टम स्थानामध्यें एक पापग्रह शत्रुक्षेत्रींचा असेल तर एक वर्षानें अरिष्ट येतें.

जन्मकुंडलीमध्यें चंद्र ज्या राशीस असेल त्या राशीचा

स्वामी ६।८ किंवा १२ स्थानीं असेल तर त्याचे दर्शीत निर्वाण असून तें स्वदेशामध्यें होतें.

अष्टम स्थानांत जो ग्रह बलवान् असेल त्याच्या विकारानें आयुष्याचा नाश होतो. अष्टम स्थानांत ग्रह नसल्यास अष्टम स्थानीं जितक्या ग्रहांची दृष्टि असेल त्यांपैकीं जो बलवान् असेल त्याच्या विकारानें आयुष्याचा नाश होतो.

अष्टम स्थानांत जो राशि असेल ती राशि कालपुरुषाच्या ज्या अवयवावर असेल त्या अवयवावर रोग होऊन तो मरणास कारण होतो.

सूर्याचा विकार पित्त. चंद्राचा वात, कफ, अतिसार. मंगळाचा ज्वर, पित्त. बुधाचा वात, पित्त. कफ यापासून ज्वर. गुरूचा वात व कफ. शुक्राचा वात व कफ. शनीचा वात. राहुकेतूचा वात व पिशाचबाधा.

अष्टम स्थानीं सूर्य असेल तर अग्नीपासून मृत्यु. सूर्य स्वक्षेत्रींचा अथवा उच्च असल्यास सौख्य देतो. अन्य राशींचा असल्यास फार दुःख देतो. शत्रुक्षेत्रींचा असल्यास वीज पडून अथवा सर्प डसून मरतो, परंतु शुभ राशीचा असल्यास तीर्थाचे ठिकाणीं मरतो. चंद्र अष्टम स्थानीं पापग्रहाचे राशीस असेल तर त्रिदोषज्वर येऊन मरतो. मंगळ अष्टम स्थानीं असेल तर शस्त्र अथवा अग्नीपासून किंवा स्त्रियांपासून रोग होऊन शस्त्रप्रयोगानें मरतो. बुध असेल तर ज्वर अथवा शूल होऊन मरतो, परंतु तीर्थावर मरतो व मरणाचे वेळीं शुद्धीवर असतो. गुरु असेल तर रोगाचें ज्ञान होत नाहीं, परंतु सावध असतां मरतो. शुक्र असेल तर तहानेनें व्याकुळ होऊन तीर्थाचे ठिकाणीं मरतो. शनि असेल तर दुष्काळामध्यें अथवा परदेशांत भुकेनें मरतो व स्वकुळाचा, आणि मामाचे कुळाचा नाश करतो; शत्रूपासून, विष खाऊन, सर्प

दसून अथवा अग्नीनें जळूनहि मरतो. शनि क्रूर ग्रहानें युक्त असल्यास चोरापासून मरण येतें. राहु केतु अष्टम स्थानीं असल्यास नाना प्रकारच्या वेदना होऊन मरतो.

अष्टम स्थानीं चर राशि असल्यास परदेशांत किंवा परगृहीं मरतो, स्थिर राशि असल्यास स्वदेशांत किंवा स्वतःच्या घरीं मरतो व द्विस्वभाव राशि असल्यास रस्त्यांत मृत्यु होतो.

अष्टम स्थानांत शुभ ग्रह असतील तर शुभ कर्मामध्यें मरण येतें व पापग्रह असतील तर पापकर्मामध्यें व मोठ्या कष्टानें मरण येतें.

शनि चतुर्थ स्थानीं, चंद्र सप्तम स्थानीं व मंगळ दशम स्थानीं असतील तर विहिरींत पडून मरतो. जन्मलग्न द्विस्वभाव राशीचें असून तेथें सूर्य व चंद्र असतील तर जलांत पडून मरतो. शनि कर्कस्थ व चंद्र मकर राशीस असेल तर जलोदर होऊन मरतो. चंद्र मेष किंवा वृश्चिक राशीस असून चंद्रापासून १२ व्या स्थानीं पापग्रह असतील तर शस्त्रापासून किंवा अग्नीपासून मृत्यु येतो.

सप्तम स्थानीं कन्या राशीचा चंद्र पापग्रहांनीं युक्त, मेष राशीस शुक्र व लग्नीं सूर्य असल्यास जन्मणाराची स्त्री त्याला ठार मारते.

केंद्रीं, षष्ठ अथवा अष्टम स्थानीं गुरु स्वक्षेत्रीचा असल्यास ईश्वरस्वरूपाचें ज्ञान होऊन स्वर्गास पावतो. मीन लग्न असून गुरु सर्व ग्रहांत बलवान् असेल व बाकीचे ग्रह बलहीन असतील तर मोक्षपदास जातो.

कुंभ लग्न असून बृहस्पति धन किंवा व्ययस्थानांत असेल आणि लग्नीं रवि असेल तर १००० वर्षें आयुष्य असतें व अंतीं कैवल्यगति प्राप्त होते.

सिंह लग्न असून लग्नीं गुरु, धनस्थानीं बुध, व्ययस्थानीं शुक्र आणि पापग्रह ३।६।१०।११ या स्थानीं असतील तर १००० वर्षें आयुष्य असतें.

शुक्र पक्षांत दिवसास जन्म असून कर्क लग्न असेल आणि केंद्री गुरु, चतुर्थ स्थानीं शनि व सप्तमांत मंगळ असेल तर १००० वर्षे आयुष्य असतें.

गुरु, शनि, मंगळ व शुक्र हे जर परस्पर केंद्रीं अथवा त्रिकोणांत येतील तर १००० वर्षे आयुष्य प्राप्त होतें.

लग्नीं शनि, चतुर्थ स्थानांत रवि आणि मंगळ, द्वादश स्थानांत राहु असून बाकीचे सर्व ग्रह अष्टम स्थानीं असतील तर २००० वर्षे आयुष्य असतें.

मेष लग्न असून चतुर्थ स्थानीं रवि, सप्तम स्थानीं मंगळ, दशम स्थानीं शनि व द्वादश स्थानीं पूर्ण बलवान् असा चंद्र असेल तर २००० वर्षे आयुष्य असतें.

केंद्रांमध्यें सर्व ग्रह अथवा त्रिकोणांत सर्व ग्रह असतील तर जन्मणारा तावडतोब तरी मरेल किंवा युगाच्या अंतापर्यंत वांचेल.

सिंह लग्न असून चारी केंद्रांत शुभग्रह असतील आणि पापग्रह ३।६।११ या स्थानीं असतील तर ६०००० वर्षे आयुष्य असेल.

अष्टम स्थानाचा स्वामी लग्नीं असेल तर व्रणरोगी आणि नास्तिक होईल.

अष्टम स्थानाचा स्वामी २ ऱ्या स्थानांत असेल तर दरिद्री होऊन एकदां नष्ट झालेलें धन पुन्हां मिळणार नाहीं.

अष्टम स्थानाचा स्वामी ३ ऱ्या स्थानांत असेल तर दुर्बल होईल.

अष्टम स्थानाचा स्वामी ४ थ्या स्थानांत असेल तर मातापिता लहानपणीं मरतील.

अष्टम स्थानाचा स्वामी ५ व्या स्थानांत असेल तर पुत्रसंतति अल्प होईल व बुद्धि स्थिर असेल.

अष्टम स्थानाचा स्वामी ६ व्या स्थानांत असेल तर जल, सर्प इत्यादिकांपासून भय उत्पन्न होईल.

अष्टम स्थानाचा स्वामी ७ व्या स्थानांत असेल तर दोन स्त्रिया होतील.

अष्टम स्थानाचा स्वामी ८ व्या स्थानांत असेल तर जुगार खेळणारा, चोर व गुरुनिंदक होईल आणि त्याची स्त्री व्यभिचारिणी होईल.

अष्टम स्थानाचा स्वामी ९ व्या स्थानांत असेल तर मोठा पापी, नास्तिक, परस्त्रीगमन करणारा आणि मृतसंतति होईल.

अष्टम स्थानाचा स्वामी १० व्या स्थानांत असेल तर दुःखी आणि दुष्ट होईल.

अष्टम स्थानाचा स्वामी ११ व्या स्थानांत असेल तर संपत्ति घरांत टिकणार नाहीं.

अष्टम स्थानाचा स्वामी १२ व्या स्थानांत असेल तर रोगी आणि दुःखी होईल.

## नवम भाव.

नवम स्थानाचा स्वामी केंद्रीं शुभग्रहानें युक्त किंवा दृष्ट असेल तर अति भाग्यवान् होईल.

नवम स्थानाचा स्वामी पापग्रहांनीं युक्त किंवा ३।११ किंवा ६।८।१२ या स्थानीं असेल तर भाग्यहीन होईल.

४ थ्या स्थानाचा स्वामी ९ व्या स्थानांत गुरु व शुक्र या शुभ ग्रहांनीं युक्त असेल व ९ व्या स्थानाचा स्वामी केंद्रीं अथवा त्रिकोणांत असेल तर अनेक प्रकारची संपत्ति प्राप्त होईल.

नवम स्थानांत गुरु, नवम स्थानाचा स्वामी केंद्रीं व लग्नस्वामी बळवान् असेल तर भाग्यशाली होईल.

नवम स्थानाच्या २ ऱ्या किंवा ४ थ्या स्थानांत मंगळ असेल व नवम स्थानाचा स्वामी नीच असेल तर पिता निर्धन जाणावा.

नवम स्थानाचा स्वामी उच्च, नवम स्थानांत गुरु व केंद्रीं शुक्र असेल तर पिता दीर्घायुषी होईल.

नवम स्थानाचा स्वामी केंद्री असून त्यावर गुरूची दृष्टि असेल तर पिता राजा किंवा राजासारखा असेल.

नवम स्थानाचा स्वामी दशम स्थानांत व दशम स्थानाचा स्वामी नवम स्थानांत असेल तर पिता धनवान् व कीर्तिमान् होईल.

सूर्य उच्च व ९ व्या स्थानाचा स्वामी ११ व्या स्थानांत असेल तर धर्मिष्ठ व राजपूज्य होईल.

५ व्या किंवा ९ व्या स्थानांत सूर्य व ७ व्या स्थानांत नवम स्थानाचा स्वामी गुरूनें युक्त अथवा दृष्ट असेल तर पितृभक्त होईल.

नवम स्थानाचा स्वामी द्वितीय स्थानांत व द्वितीय स्थानाचा स्वामी नवम स्थानांत असेल तर ३२ वर्षांनंतर भाग्यशाली होईल.

तिसऱ्या स्थानाचा स्वामी नवव्या स्थानाच्या स्वामीनें युक्त असून तो निर्बळी, नीच किंवा अस्तंगत असेल तर राजा असला तरी भिक्षेकरी होईल.

६।८।१२ या स्थानांत रवि, अष्टम स्थानाचा स्वामी नवम स्थानांत, द्वादश स्थानाचा स्वामी लग्नांत व षष्ठ स्थानाचा स्वामी पंचम स्थानांत असेल तर जन्मणाराच्या जन्मापूर्वी पिता मृत्यु पावला असें जाणावें.

अष्टम स्थानांत रवि, अष्टम स्थानाचा स्वामी तोच नवम स्थानाचा स्वामी असेल तर जन्मणाराच्या पहिल्याच वर्षी पित्यावर अरिष्ट येईल.

द्वादश स्थानाचा स्वामी नवम स्थानांत व नवम स्थानाचा स्वामी नीच असेल तर जन्मणाराच्या ३ ऱ्या किंवा १६ व्या वर्षी बापावर अरिष्ट येईल.

केवळ ८ व्या स्थानांत व ८ व्या स्थानाचा स्वामी रवीनें युक्त असेल तर जन्मणाराच्या २ ऱ्या किंवा १२ व्या वर्षी बापावर अरिष्ट येईल.

नवम स्थानाच्या अष्टम स्थानांत राहु व नवम स्थानाच्या नवम स्थानांत रवि असेल तर जन्मणाराच्या १६ व्या किंवा १८ व्या वर्षी बापावर अरिष्ट येईल.

सूर्य राहूनें युक्त असेल व चंद्राच्या नवम स्थानांत शनि असेल तर जन्मणाराच्या ७ व्या किंवा १९ व्या वर्षी बापावर अरिष्ट येईल.

९ व्या स्थानाचा स्वामी १२ व्या स्थानांत व १२ व्या स्थानाचा ९ व्या स्थानांत असेल तर जन्मणाराच्या ४४ व्या वर्षी बापावर अरिष्ट येईल.

चंद्र सिंह राशीस असून लग्नस्वामी अष्टम स्थानांत असेल तर जन्माच्या ३५ व्या किंवा ४१ व्या वर्षी बापावर अरिष्ट येईल.

नवम स्थानाचा स्वामी सूर्य असून तो शनिमंगळानें युक्त असेल तर जन्मणाराच्या ६ व्या वर्षी बापावर अरिष्ट येईल.

नवम स्थानाच्या ७ व्या स्थानांत रवि व ३ ऱ्या स्थानाच्या सप्तम स्थानांत राहु असेल तर जन्मणाराच्या २५ व्या वर्षी बापावर अरिष्ट येईल.

अष्टम स्थानाच्या ७ व्या स्थानांत शनि व शनीच्या ७ व्या स्थानांत रवि असेल तर जन्मणाराच्या २१ व्या, २६ किंवा ३० व्या वर्षी बापावर अरिष्ट येईल.

नवम स्थानाचा स्वामी नीच राशीस असून त्या राशीचा स्वामी ९ व्या स्थानांत असेल तर जन्मणाराच्या २६ व्या किंवा ३३ व्या वर्षी बापावर अरिष्ट येईल.

शुक्र आपल्या परमोच्च अंशांत असेल व तो नवम स्थानाच्या स्वामीनें युक्त असेल तर व ३ ऱ्या स्थानांत शनि असेल तर जन्मणारा अत्यंत भाग्यवान् होईल.

बुध आपल्या परमोच्च अंशांत असेल व नवम स्थानाचा स्वामी नवम स्थानांत असेल तर ३६ वर्षांनंतर भाग्योदय होईल.

लग्नस्वामी नवव्या स्थानांत व नवम स्थानाचा स्वामी लग्नांत असून गुरु सप्तम स्थानांत असेल तर संपत्ति आणि वाहनें यांचा लाभ होईल.

नवम स्थानांत शनि व चंद्र यांचा योग असून लग्नस्वामी नीच असेल तर जन्मणारा भिक्षा मागून उदरनिर्वाह करील.

नवम स्थानांत सूर्य स्वक्षेत्रींचा असेल तर त्याचे भाऊ रहाणार नाहींत; कदाचित् एखादा राहिल्यास फार नशीबवान् होईल.

नवम स्थानाचा स्वामी नवम स्थानीं असेल अथवा नवम स्थानावर पहात असेल तर स्वदेशांत भाग्योदय होतो.

बलवान् नवमेश लग्नीं असून गुरूनें दृष्ट असेल तर शौर्यानें राजवंद्य होतो. निर्बल नवमेश लग्नीं असून गुरूनें दृष्ट असेल तर विद्येनें राजवंद्य होतो.

नवम स्थानीं सूर्य अथवा बुध अथवा शनि असेल तर पुत्र, द्रव्य व सौख्य मिळतें. परंतु पापग्रहांनीं युक्त अथवा दृष्ट असेल सर्वांचा नाश करतो. परम उच्च असेल तर राजपदवी देतो व तीर्थयात्रादि पुण्यकर्मे करवितो. नवम स्थानीं चंद्र असेल तर सर्वांस प्रिय, पुत्र-मित्र-द्रव्यवान् असतो. चंद्र जितका अधिक बलवान् असेल तितकें अधिक फळ देतो. मंगळ असेल तर पापकर्मी असतो, परंतु मकर राशीचा असल्यास कुशल होतो व धन जमा करतो. गुरु अथवा शुक्र असेल तर भाग्यवान् असून तीर्थयात्रा, आईबापांची सेवा, यज्ञयाग वगैरे धर्मकृत्यें करतो; अंतकाळीं तपस्वी अथवा संन्यासी होतो. या ग्रहांची नवम स्थानीं दृष्टि असल्यास हेंच फळ मिळतें.

नवम स्थानीं गुरु किंवा गुरूची दृष्टि असेल किंवा नवम स्थानाचा स्वामी गुरु असेल तर काशीयात्रा घडेल.

नवम स्थानाचा स्वामी लग्नीं असेल तर गुणवान् व कीर्तिमान् होईल.

नवम स्थानाचा स्वामी २ ऱ्या स्थानांत असेल तर सदा भाग्योदयाची काळजी वहाणारा होईल.

नवम स्थानाचा स्वामी ३ ऱ्या स्थानात असेल तर धनवान्, गुणवान्, कामी, पंडित व लोकांस प्रिय होईल.

नवम स्थानाचा स्वामी ४ थ्या स्थानांत असेल तर वक्ता, साहसी व आनंदी होईल.

नवम स्थानाचा स्वामी ५ व्या स्थानांत असेल तर गुरुभक्ति करणारा व बुद्धिमान् होईल.

नवम स्थानाचा स्वामी ६ व्या स्थानांत असेल तर भाग्यहीन व मातुलपक्षसुखहीन होईल.

नवम स्थानाचा स्वामी ७ व्या स्थानांत असेल तर जन्मणाराचीं कामें सिद्धीस जात नाहींत.

नवम स्थानाचा स्वामी ८व्या स्थानांत असेल तर भाग्यहीन होईल.

नवम स्थानाचा स्वामी ९ व्या स्थानांत असेल तर धनधान्ययुक्त, गुणी व सुंदर होईल.

नवम स्थानाचा स्वामी १० व्या स्थानात असेल तर मंत्री किंवा सेनापति, पुण्यवान् व यशस्वी होईल.

नवम स्थानाचा स्वामी ११ व्या स्थानांत असेल तर भाग्यवान् व लोकप्रिय होईल.

नवम स्थानाचा स्वामी १२ व्या स्थानांत असेल तर भाग्यहीन होईल.

## दशम भाव.

दशम स्थानीं मंगळ असेल तर मोठा पराक्रमी, ऐश्वर्ययुक्त व दैववाळी होतो. फक्त राशीचा असेल तर उलट फळ देतो.

दशम स्थानाचा स्वामी बलवान् असेल तर मोठा पराक्रमी होईल.

दशम स्थानाचा स्वामी निर्बल असेल तर कर्मे सिद्धीस जाणार नाहींत.

राहु पंचम स्थानांत किंवा केंद्री असेल तर ज्योतिष्टोमादि यज्ञकर्ता होईल.

दशम स्थानांत व लग्नीं पापग्रह असतील तर वाईट कार्ये करणारा होईल व आप्तजनांस दुःख देणारा होईल.

दशम स्थानाचा स्वामी अष्टम स्थानांत राहुयुक्त असेल तर लोकांचा द्वेष्टा व महामूर्ख होईल.

दशम स्थानाचा स्वामी सप्तम स्थानांत शनिमंगळानें युक्त असेल व सप्तम स्थानाचा स्वामी पापग्रहांनी युक्त असेल तर अति विषयी होईल.

दशम स्थानाचा स्वामी शुभग्रह असून दशम स्थानीं शनि अथवा मंगळ किंवा शनीची अथवा मंगळाची दृष्टि असेल तर सत्कार्याकरितां संकटें येतील व बंधन पावेल.

दशम स्थानीं शनि असेल किंवा शनीची दृष्टि असेल आणि शुभग्रह अथवा शुभग्रहाची दृष्टि नसेल तर दुष्कर्माचे योगानें बंधन पावतो.

दशम स्थानीं मंगळ अथवा मंगळाची दृष्टि असेल तर मोठा पराक्रमी व शूर होतो.

दशम स्थानाचा स्वामी उच्च असून गुरूनें युक्त असेल व नवम स्थानाचा स्वामी दशम स्थानांत असेल तर पराक्रमी व ऐश्वर्यवान होईल.

लग्नस्वामी दशम स्थानांत व दशम स्थानाचा स्वामी लग्नांत असेल किंवा ते उभयतां केंद्री असतील तर अत्यंत सुखी होईल.

दशम स्थानाचा स्वामी बलवान् असून लग्नस्वामी दशम स्थानांत असेल तर वस्त्रें, अलंकार इत्यादिकांचा लाभ होतो.

दशम स्थानांत राहू उच्च असेल तर भागीरथीचें स्नान घडेल.

दशम स्थानांत गुरुशुक्रयुति असून लग्नस्वामी बलवान् असेल व चंद्र उच्च असेल तर जन्मणार मोठा ज्ञानी होईल.

१० व्या स्थानाचा स्वामी ११ व्या स्थानांत, ११ व्या स्थानाचा स्वामी लग्नांत व १० व्या स्थानांत शुक्र असेल तर रत्नादिकांच्या ऐश्वर्यानें युक्त होईल.

दशम स्थानाचा स्वामी लग्नांत लग्नस्वामीनें युक्त असेल व चंद्र केंद्रीं अथवा त्रिकोणांत असेल तर सत्कर्मी होईल.

दशम स्थानाचा स्वामी शुभग्रह असून दशमांत असेल तर सत्यप्रिय व प्रामाणिक असतो.

दशम स्थानाचा स्वामी शनि अथवा दशमस्थानीं शनि अथवा दशम स्थान शनीनें दृष्ट असेल तर कायद्यामध्यें प्रवीण होतो, व वकीली करतो.

दशम स्थानाचा स्वामी लग्नीं असेल तर काव्यकर्ता, बालपणीं रोगी व वृद्धपणीं सुखी असा होईल.

दशम स्थानाचा स्वामी २ ऱ्या स्थानांत असेल तर वक्ता होईल.

दशम स्थानाचा स्वामी ३ ऱ्या स्थानांत असेल तर स्वच्छंदी होईल.

दशम स्थानाचा स्वामी ४ थ्या स्थानांत असेल तर अत्यंत सुखी होईल.

दशम स्थानाचा स्वामी ५ व्या स्थानांत असेल तर पुत्रवान् होईल.

दशम स्थानाचा स्वामी ६ व्या स्थानांत असेल तर दुःखी व शत्रूंनीं ग्रस्त असा होईल.

दशम स्थानाचा स्वामी ७ व्या स्थानांत असेल तर स्वच्छंदी होईल.

दशम स्थानाचा स्वामी ८ व्या स्थानांत असेल तर दुःखी होईल.

दशम स्थानाचा स्वामी ९ व्या स्थानांत असेल तर भाग्यवान् होईल.

दशम स्थानाचा स्वामी १० व्या स्थानांत असेल तर गुरु व देव यांची भक्ति करणारा आणि खरें बोलणारा होईल.

दशम स्थानाचा स्वामी ११ व्या स्थानांत असेल तर धनवान् व आनंदी होईल.

दशम स्थानाचा स्वामी १२ व्या स्थानांत असेल तर दुःखी होईल.

## एकादश भाव.

एकादश स्थानाचा स्वामी एकादश स्थानांत, केंद्रांत, त्रिकोणांत अथवा उच्च असेल तर अनेक प्रकारचे लाभ होतील.

११ व्या स्थानाचा स्वामी दुसऱ्या स्थानांत, दुसऱ्या स्थानाचा स्वामी केंद्रीं व अकराव्या स्थानांत गुरु असेल तर मोठे मोठे लाभ होतील व ३६ व्या वर्षी २००० निष्कांचा (१निष्क=५ रुपये) मालक होईल.

एकादश स्थानांत गुरु, २ ऱ्या स्थानांत चंद्र व नवम स्थानांत शुक्र असेल तर ६००० निष्कांचा मालक होईल.

११ व्या स्थानाच्या ११ व्या स्थानांत गुरुचंद्रयोग असेल तर धनधान्यांचा संग्रह करणाऱ्यामध्यें श्रेष्ठ व रत्नांचे अलंकारांचा संग्रह करणारा होईल.

एकादश स्थानाचा स्वामी लग्नीं व लग्नस्वामी एकादश स्थानांत असेल तर ३३ व्या वर्षी १००० निष्कांचा धनी होईल.

द्वितीय स्थानाचा स्वामी एकादश स्थानांत व ११ व्या स्थानाचा स्वामी द्वितीय स्थानांत असेल तर विवाहानंतर भाग्योदय होईल.

तृतीय स्थानाचा स्वामी एकादश स्थानांत व एकादश स्थानाचा स्वामी तृतीय स्थानांत असेल तर भाऊबंदांपासून द्रव्यप्राप्ति होईल.

अष्टम किंवा एकादश स्थानांचा स्वामी एकादश स्थानीं, केंद्रीं अथवा त्रिकोणांत असेल तर दीर्घायु होतो.

एकादश स्थानीं सूर्य किंवा सूर्याची दृष्टि असेल तर राजापासून पुष्कळ द्रव्य मिळतें.

एकादश स्थानीं चंद्र किंवा चंद्राची दृष्टि असेल तर उत्तम स्त्री, नानाप्रकारचीं मोत्यें, रत्नें, गांव, बागबगीचे वगैरे प्राप्त होतात.

एकादश स्थानीं मंगळ किंवा मंगळाची दृष्टि असेल तर सोनें, चांदी, नाना प्रकारचे धातु, राजापासून द्रव्य, मान, बढती वगैरे प्राप्त होतात.

एकादश स्थानीं बुध किंवा बुधाची दृष्टि असेल तर लेखन, छापखाना, विणकाम, सावकारी, व्यापार अथवा राजाधिकार यांपासून धन मिळतें.

एकादश स्थानीं गुरु किंवा गुरूची दृष्टि असेल तर राजाश्रय, सज्जनांची संगति, नित्य मिष्टान्न, नाना प्रकारचीं वस्त्रें, धान्यें, घर वगैरे प्राप्त होतात.

एकादश स्थानीं शुक्र किंवा शुक्राची दृष्टि असेल तर वाईट छंदाच्या स्त्रियांपासून लाभ, कायद्याची परीक्षा पास होऊन होणारा लाभ इत्यादि प्राप्त होतात.

एकादश स्थानीं शनि किंवा शनीची दृष्टि असेल तर चोरी, लांचलुचपत, खोटें काम, वकीली वगैरेपासून धन मिळवितो.

एकादश स्थानाचा स्वामी लग्नीं असेल तर धनवान्, सात्विक, समदृष्टि, वक्ता व आनंदी होईल.

एकादश स्थानाचा स्वामी २ ऱ्या स्थानांत असेल तर अनेक प्रकारचीं सुखें मिळतील.

एकादश स्थानाचा स्वामी ३ ऱ्या स्थानांत असेल तर सुख-रोगी व सर्वकाळ सुदृढ होईल.

एकादश स्थानाचा स्वामी ४ थ्या स्थानांत असेल तर अनेक प्रकारचीं सुखें मिळतील.

एकादश स्थानाचा स्वामी ५ व्या स्थानांत असेल तर पुत्रवान होईल.

एकादश स्थानाचा स्वामी ६ व्या स्थानांत असेल तर रोगी, प्रवासी व सेवक होईल.

एकादश स्थानाचा स्वामी ७ व्या स्थानांत असेल तर स्त्री जगणार नाहीं.

एकादश स्थानाचा स्वामी ८ व्या स्थानांत असेल तर मूर्ख होईल.

एकादश स्थानाचा स्वामी ९ स्थानांत असेल तर भाग्यवान् होईल.

एकादश स्थानाचा स्वामी १० व्या स्थानांत असेल तर राजपूज्य होईल.

एकादश स्थानाचा स्वामी ११ व्या स्थानांत असेल तर वक्ता, पंडित व काव्यकर्ता होईल.

एकादश स्थानाचा स्वामी १२ व्या स्थानांत असेल तर अति खर्चिक होईल.

## द्वादश भाव.

द्वादश स्थानाचा स्वामी चंद्र असून तो ५।१० व ११ स्थानीं स्वगृही किंवा उच्च असेल तर पर्यंक, दीप, सुगंधी पदार्थ व वस्त्रें इत्यादि शयनसुखें प्राप्त होतील.

राहु, रवि किंवा मंगळ किंवा शनि यानें युक्त द्वादश स्थानांत असेल किंवा द्वादश स्थानाचा स्वामी रवीनें युक्त द्वादश स्थानांत असेल तर जन्मणारा अंतीं नरकवास भोगील.

द्वादश स्थानाचा स्वामी पापग्रहानें युक्त असून त्या स्थानांत पापग्रह असतील तर देशोदेशीं भटकत राहील.

द्वादश स्थानाचा स्वामी शुभग्रह असून त्या स्थानांत शुभग्रह असेल तर स्वदेशांत कीर्तिमान् होईल.

द्वादश स्थानांत शनि, मंगळ व राहु एकत्र असून त्यांच्यावर शुभग्रहांची दृष्टि असेल तर पापकृत्यांनीं द्रव्य मिळवील.

लग्न स्वामी १२ व्या स्थानांत व १२ व्या स्थानाचा स्वामी लग्नांत शुक्रासह असेल तर धर्मकृत्यांत द्रव्य खर्च होईल.

द्वादश स्थानाचा स्वामी लग्नीं स्वराशीचा असला तर कृपण असतो व गांवावर व पशूंवर अध्यक्ष असतो.

द्वादश स्थानीं सूर्य, मंगळ अथवा शनि असेल तर स्वधर्मापासून भ्रष्ट होतो, कृपण पण प्रामाणिक असतो व राजा द्रव्य हरण करतो. चंद्र असेल तर लोकांचा घात करणारा व कृपण असतो. बुध, गुरु, शुक्र अथवा पूर्ण चंद्र असेल तर धनाचा संचय करतो, परंतु क्रूर व लेंडिखोर असतो.

द्वादश स्थानाचा स्वामी लग्नीं असेल तर रोगी, निर्धन, मधुरभाषणी व सुंदर होईल.

द्वादश स्थानाचा स्वामी २ ऱ्या स्थानांत असेल तर खरें बोलणारा आणि गुणवान् होईल.

द्वादश स्थानाचा स्वामी ३ ऱ्या स्थानांत असेल तर आपलपोट्या होईल.

द्वादश स्थानाचा स्वामी ४ थ्या स्थानांत असेल तर दरिद्री होईल.

द्वादश स्थानाचा स्वामी ५ व्या स्थानांत असेल तर मंत्री होईल.

द्वादश स्थानाचा स्वामी ६ व्या स्थानांत असेल तर पापी, क्रोधी आणि संतानापासून दुःख पावणारा होईल.

द्वादश स्थानाचा स्वामी ७ व्या स्थानांत असेल तर स्त्रीसुख मिळणार नाहीं.

द्वादश स्थानाचा स्वामी ८ व्या स्थानांत असेल तर ईश्वरभक्त आणि धार्मिक होईल.

द्वादश स्थानाचा स्वामी ९ व्या स्थानांत असेल तर भाग्यहीन होईल.

द्वादश स्थानाचा स्वामी १० व्या स्थानांत असेल तर मध्यम संपत्तिमान् होईल.

द्वादश स्थानाचा स्वामी ११ व्या स्थानांत असेल तर पुत्रसौख्य मिळणार नाहीं.

द्वादश स्थानाचा स्वामी १२ व्या स्थानांत असेल तर परस्त्रीरत होईल.

# भाग सातवा.

## महादशांचीं फलें.

### रवि-महा-दशा.

मेषस्थ रवीच्या दशेंत स्वधर्माच ठायीं अभिरुचि, पित्यापासून द्रव्य व गृह यांचा लाभ, स्त्रिया व पुत्र यांपासून अनेक प्रकारचें सुख प्राप्त होईल.

वृषभस्थ रवीच्या दशेंत स्त्री-पुत्र शेती-वाहनें यांस पीडा व हृदयास विकार होईल.

मिथुनस्थ रवीच्या दशेंत काव्यकर्ता, मांत्रिक, पुराणांवर भक्ति ठेवणारा असा होईल व धनधान्याची अभिवृद्धि होईल.

कर्कस्थ रवीच्या दशेंत मित्रांशीं वैर व राजाच्या ठायीं प्रीति करील; स्त्रियांनीं जिंकलेला व सदा सतत असा होईल.

सिंहस्थ रवीच्या दशेंत किल्ले, अरण्यें यांच्या ठायीं प्रीति, धन-धान्यसमृद्धि व राजाकडून सन्मान होईल.

कन्यास्थ रवीच्या दशेंत देव-द्विज यांच्या ठायीं पूज्यबुद्धि, पशुलाभ वगैरे गोष्टी प्राप्त होतात.

तुलास्थ रवीच्या दशेंत क्षेत्र, संपत्ति, स्त्री यांस धोका व चोर, अग्नि यांपासून भीति उत्पन्न होईल.

वृश्चिकस्थ रवीच्या दशेंत विष, अग्नि, शस्त्र यांपासून भय व मातापितरांकडून अपमान होईल.

धनुस्थ रवीच्या दशेंत स्त्री, पुत्र, धन यांची प्राप्ति, राजापासून व ब्राह्मणापासून मान, संगीतशास्त्र इत्यादिकांचे ठायीं प्रीति या गोष्टी प्राप्त होतात.

मकरस्थ रवीच्या दशेंत स्त्री, पुत्र, धन यांपासून अल्प सुख व पापाचरणानें अपार दुःख हीं होतात.

कुंभस्थ रवीच्या दशेंत हृद्रोग, धन-सुत-कांता यांपासून दुःख व शत्रूपासून उपद्रव होतात.

मीनस्थ रवीच्या दशेंत ज्वरादि पीडा होतात.

लग्नस्थ रवीच्या दशेंत देशांतर व रोग होतात.

द्वितीयस्थ रवीच्या दशेंत क्लेश, बंधुवियोग धार्मामध्यें दोष, स्त्रीनाश, धननाश, राजभय या गोष्टी प्राप्त होतात.

तृतीयस्थ रवीच्या दशेंत पराक्रम, धैर्य, सुख, राजमान, द्रव्य-प्राप्ति, भ्रातृवैर या गोष्टी प्राप्त होतात.

चतुर्थस्थ रवीच्या दशेंत चोर-अग्नि-शस्त्र यांपासून नाश होतो.

पंचमस्थ रवीच्या दशेंत संततीस अपाय होतो. ठक्क.श्री, मंत्रविद्या, द्रव्यसंचय करील.

षष्ठस्थ रवीच्या दशेंत व्रणादि पीडा, मायापासून दुःख व मूत्र-कृच्छ्रादि पीडा होईल.

सप्तमस्थ रवीच्या दशेंत स्त्रीनाश व खाण्यापिण्याचे हाल होतील.

अष्टमस्थ रवीच्या दशेंत उद्विग्नता, देहास कष्ट, नेत्रविकार, ज्वरादि रोग होतील.

नवमस्थ रवीच्या दशेंत दुष्कर्मांमुळें चित्तास समाधान अस-णार नाहीं.

दशमस्थ रवीच्या दशेंत राज्य—द्रव्य यांचा लाभ, उद्योगाची सिद्धि, राजापासून मान मिळेल.

एकादशस्थ रवीच्या दशेंत धनप्राप्ति, उद्योगसिद्धि, पुत्र, स्त्री यांस सौख्य व देहसौख्य ही प्राप्त होतात.

द्वादशस्थ रवीच्या दशेंत क्लेश, द्रव्यनाश, पायांस रोग, जिकडे तिकडे कलह व राजापासून भय [illegible] प्राप्त होतात.

## चंद्र-महादशा.

मेषस्थ चंद्राच्या दशेंत क्लेश, प्रवास यांचे ठायीं पुत्रबुद्धि व

स्थलान्तर होईल.

वृषभस्थ चंद्राच्या दशेंत राज्यप्राप्ति, भाग्योदय, स्त्रीसौख्य, धनप्राप्ति, अश्वगजादि प्राप्ति होईल.

मिथुनस्थ चंद्राच्या दशेंत देव-ब्राह्मण यांचे ठायीं पूज्यबुद्धि होईल.

कर्कस्थ चंद्राच्या दशेंत पशु-द्रव्य क्षेत्र यांची अभिवृद्धि, पर्वत, वन यांच्या ठायीं प्रीति व गुप्त विकार होतील.

सिंहस्थ चंद्राच्या दशेंत नित्य द्रव्यप्राप्ति होईल, मानमरातब वाटेल व शरीरास दुःख होईल.

कन्यास्थ चंद्राच्या दशेंत स्त्रीप्राप्ति, परदेशगमन, पापबुद्धि, व अल्प द्रव्यप्राप्ति होईल.

तुलास्थ चंद्राच्या दशेंत स्त्रियांच्या ठायीं प्रीति, किल्लेकांबरोबर वाद, दारिद्य, उत्साहभंग व नीच लोकांशीं मैत्री होईल.

वृश्चिकस्थ चंद्राच्या दशेंत व्याधि, दारिद्य, स्वजनांचा वियोग, किंचित् मान व काळजी होईल.

धनुस्थ चंद्राच्या दशेंत अश्व-गज यांची वृद्धि व पूर्वार्जित वित्ताचा नाश होईल.

मकरस्थ चंद्राच्या दशेंत धन व संतति यांपासून सौख्य मिळेल.

कुंभस्थ चंद्राच्या दशेंत कर्ज होईल, व्यसनें जडतील व शरीरास सुख मिळणार नाहीं.

मीनस्थ चंद्राच्या दशेंत जलोद्भव पदार्थांची प्राप्ति, स्त्रीपुत्रांचे सौख्य व शत्रुक्षय होईल.

उच्चस्थ चंद्राच्या दशेंत दारिद्य येईल व शरीर दुर्बळ होईल.

त्रिकोणस्थ चंद्राच्या दशेंत धन-स्त्री-पुत्र यांपासून सौख्य, मिष्टभोजन व पुण्यप्राप्ति होईल.

तृतीयस्थ चंद्राच्या दशेंत मधूंपासून सौख्य व भूषणांची प्राप्ति होईल.

चतुर्थस्थ चंद्राच्या दशेंत राजकीय लाभ व स्त्रीपुत्रांपासून सुख मिळेल.

पंचमस्थ चंद्राच्या दशेंत सर्व प्रकारची सिद्धी व संततीपासून सुख होईल.

षष्ठस्थ चंद्राच्या दशेंत कलह, द्रव्यनाश, वाईट वस्त्रें, वाईट भोजन, स्त्रीपुत्रांस पीडा, मूत्रकृच्छ्रादि रोग व धननाश होईल.

सप्तमस्थ चंद्राच्या दशेंत स्त्रीसौख्य, व्यापारांत लाभ, शत्रूपासून दुःख होतें.

अष्टमस्थ चंद्राच्या दशेंत देहास कृशता, पाण्यापासून भीति, परदेशांत गमन, सर्वांशीं वैर व मातेस पीडा होईल.

नवमस्थ चंद्राच्या दशेंत भाग्योदय होईल.

दशमस्थ चंद्राच्या दशेंत राजकीय लाभ, मातापितरांपासून सौख्य व द्रव्यप्राप्ति होईल.

एकादशस्थ चंद्राच्या दशेंत अनेक प्रकारचे लाभ व मनोरथ पूर्ण होतील. स्त्रीपुत्र-धन यांचा लाभ होईल.

द्वादशस्थ चंद्राच्या दशेंत भाग्यहानि व मोठें दुःख होईल.

## मंगळ–महादशा.

मेषस्थ मंगळाच्या दशेंत युद्धांत जय, राज्यप्राप्ति, राजापासून मान, शारीरिक पीडा होतील.

वृषभस्थ मंगळाच्या दशेंत गुरु–देव–भक्ति घडेल.

मिथुनस्थ मंगळाच्या दशेंत प्रवास, पितृकोप, अत्यंत खर्च व स्वजनांबरोबर कलह होईल आणि अनेक प्रकारच्या कला शिकेल.

कर्कस्थ मंगळाच्या दशेंत बागबगीचा मिळेल, बलहीनता, क्लेश, स्त्रीपुत्रांचा वियोग होईल.

सिंहस्थ मंगळाच्या दशेंत पुष्कळांचा मुख्य, कांता व सुत यांचा वियोग व अग्नीपासून भय होईल.

कन्यास्थ मंगळाच्या दशेंत सदाचारतत्परता, यज्ञादि क्रिया व धनधान्यसमृद्धि होईल.

तुलास्थ मंगळाच्या दशेंत कांता व धन मिळेल व अंगास कृशता प्राप्त होईल.

वृश्चिकस्थ मंगळाच्या दशेंत शेतीकडे व चांगला संग्रह करण्याकडे लक्ष जाईल, पुष्कळांचा द्वेष करील व फार बोलणारा होईल.

धनुस्थ मंगळाच्या दशेंत ब्राह्मण आणि देव यांची भक्ति करील व वादांत पराजय पावेल.

मकरस्थ मंगळाच्या दशेंत राज्यप्राप्ति, युद्धांत व वादांत जय व अनेक प्रकारचे सौख्य प्राप्त होईल.

कुंभस्थ मंगळाच्या दशेंत वाटावाट करील, पुत्रादिकांपासून काळजी व फार खर्च होईल.

मीनस्थ मंगळाच्या दशेंत पुत्रचिंता, कर्ज, परदेशांत गमन व खरूज वगैरे त्वग्रोग होतील.

लग्नस्थ मंगळाच्या दशेंत दुःख, स्त्रीपासून दुःख, राज्यापासून भय, शत्रूपासून पराभव व देशांतर हीं होतील.

द्वितीयस्थ मंगळाच्या दशेंत धनवृद्धि, कुलदीपकता आणि मुख व नेत्र यांस विकार होतील.

तृतीयस्थ मंगळाच्या दशेंत मोठा पराक्रम करील व राजापासून प्रतिष्ठा मिळवील.

चतुर्थस्थ मंगळाच्या दशेंत पुत्रनाश, बुद्धिनाश व रोग होईल.

पंचमस्थ मंगळाच्या दशेंत नेत्ररोग व द्रव्यनाश होईल.

षष्ठस्थ मंगळाच्या दशेंत शत्रूचा पराभव, संपत्तीची अंशवृद्धि व अपमृत्यु येईल.

सप्तमस्थ मंगळाच्या दशेंत स्त्रीमृत्यु, व्यापारासंबंधी परदेशांत गमन व शत्रूपासून पराभव होईल.

अष्टमस्थ मंगळाच्या दशेंत मरणप्राय दुःख व देवी, गोवर वगैरे स्फोटक रोग होतील.

नवमस्थ मंगळाच्या दशेंत गुरूला कष्ट, मोठें भय व कार्यामध्यें विघ्न येईल.

दशमस्थ मंगळाच्या दशेंत भाग्योदय होईल.

एकादशस्थ मंगळाच्या दशेंत राज्यप्राप्ति, राजापासून सन्मान, युद्धांत जय आणि महत्कीर्ति होईल.

द्वादशस्थ मंगळाच्या दशेंत धननाश, स्त्रीनाश व राजापासून भीति उत्पन्न होईल.

## बुध-महादशा.

मेषस्थ बुधाच्या दशेंत अनेक ठिकाणीं वास, चोरी, लबाडी, असत्य भाषण करील, जुगार खेळेल व दारिद्र्य भोगील.

वृषभस्थ बुधाच्या दशेंत फार खर्च करील, आईबापांपासून दुःख पावेल व स्त्रीपुत्रांपासून काळजी उत्पन्न होईल.

मिथुनस्थ बुधाच्या दशेंत मातेपासून दुःख व स्त्रीपुत्रांपासून सुख मिळेल.

कर्कस्थ बुधाच्या दशेंत परदेशांत वास, दुःख, काव्यलेखनादि-कांपासून द्रव्यप्राप्ति होईल व लोकांच्या नेहमीं उपयोगीं पडणारा होईल.

सिंहस्थ बुधाच्या दशेंत वैभव, धैर्य, स्त्रीपुत्रांपासून दुःख व बुद्धिनाश होईल.

कन्यास्थ बुधाच्या दशेंत वैभवशाली, लेख लिहिणारा, काव्यक-थादिकांचे ठायीं अनुरक्त, नीतिमान् व शत्रूचा पराजय करणारा होईल.

तुलस्थ बुधाच्या दशेंत क्षीणता प्राप्त होईल, कारागिरीचीं कामें करील व व्यापारांत द्रव्यनाश होईल.

वृश्चिकस्थ बुधाच्या दशेंत खर्च करील, स्वजनांपासून दूर राहील.

धनुस्थ बुधाच्या दशेंत खर्च करील, स्वजनांपासून दूर राहील.

मकरस्थ बुधाच्या दशेंत फार खर्च होईल, पुष्कळ ठिकाणीं भटकेल, मोठ्यांशीं कपट करील व हलकटांशीं सख्य करील.

कुंभस्थ बुधाच्या दशेंत द्रव्यहीन होईल व मित्रांपासून दुःख पावेल.

मीनस्थ बुधाच्या दशेंत अल्पलाभ व शरीरास कृशता होईल.

लग्नस्थ बुधाच्या दशेंत राजापासून मान, शेतीमध्यें फायदा व जगांत कीर्ति होईल.

द्वितीयस्थ बुधाच्या दशेंत विद्याप्राप्ति, मोठी कीर्ति व राजासारखें माग्य होईल.

तृतीयस्थ बुधाच्या दशेंत शारीरिक पीडा होईल.

चतुर्थस्थ बुधाच्या दशेंत गृह, धान्य यांचा व उद्योगाचा नाश होईल.

पंचमस्थ बुधाच्या दशेंत अति कष्ट व राजसेवा करूनही द्रव्यप्राप्ति अल्प होईल.

षष्ठस्थ बुधाच्या दशेंत अनेक तऱ्हेचे रोग होतील.

सप्तमस्थ बुधाच्या दशेंत स्त्री–पुत्र–धन यांपासून सौख्य व राजाशीं मैत्री होईल.

अष्टमस्थ बुधाच्या दशेंत स्वदोष व मरणप्राय दुःख उत्पन्न होईल, परंतु सर्वत्र विजयी होईल.

नवमस्थ बुधाच्या दशेंत पुत्र, संपत्ति यांपासून सौख्य, तीर्थयात्रा, यज्ञादि कर्में हीं होतील.

दशमस्थ बुधाच्या दशेंत राजासारखा भाग्यवान् होईल.

एकादशस्थ बुधाच्या दशेंत अनेक प्रकारांनीं द्रव्य मिळेल.

द्वादशस्थ बुधाच्या दशेंत ऐश्वर्य प्राप्त होईल व शत्रु भयभीत होतील.

## गुरु–महादशा.

मेषस्थ गुरूच्या दशेंत स्त्रीपुत्रलाभ व लोकांचा नायक होईल.

वृषभस्थ गुरूच्या दशेंत अतिदुःख, परदेशवास, धाडसाचीं कृत्यें व द्रव्यप्राप्ति हीं होतील.

मिथुनस्थ गुरूच्या दशेंत पवित्र कृत्यें करील, स्वजनांशीं वैर आणि स्त्रीपासून दुःख होईल.

कर्कस्थ गुरूच्या दशेंत राज्यप्राप्ति होईल, किताब धारण करील व वैभवशाली होईल.

सिंहस्थ गुरूच्या दशेंत धनवान् व दाता होईल आणि राजापासून सन्मान मिळेल.

कन्यास्थ गुरूच्या दशेंत राजापासून सन्मान, स्त्रीपुत्रांपासून अत्यंत सुख व शूद्रादि नीच जातींशीं कलह होईल.

तुलास्थ गुरूच्या दशेंत बुद्धिहीन, स्त्रीपुत्रांचा शत्रु व उत्साहभंग होईल.

वृश्चिकस्थ गुरूच्या दशेंत बुद्धिमान् व सर्वशक्तिमान् होईल.

धनुस्थ गुरूच्या दशेंत देवभक्त होईल, यज्ञादि कर्में करील व चतुष्पादांकडे लक्ष लागेल.

मकरस्थ गुरूच्या दशेंत उदररोगी किंवा गुह्यरोगी होईल; दरिद्री व बंधूंपासून वियोग होईल.

कुंभस्थ गुरूच्या दशेंत कलानिपुण, तीव्रबुद्धि व स्त्रियांचा भोक्ता होईल; विवेकडे लक्ष लागेल.

मीनस्थ गुरूच्या दशेंत स्वच्छंदी, संपत्तिमान् व राजापासून सुख होईल.

लग्नस्थ गुरूच्या दशेंत शारीरिक सौख्य व ऐश्वर्य मिळेल.

द्वितीयस्थ गुरूच्या दशेंत राजापासून मान व सर्वत्र विजय मिळेल.

तृतीयस्थ गुरूच्या दशेंत बंधूंपासून सुख व राजापासून द्रव्य-प्राप्ति होईल.

चतुर्थस्थ गुरूच्या दशेंत, कुंडलीत राजयोग असेल तर राजा होईल, नाहींतर राजासारखा होईल.

पंचमस्थ गुरूच्या दशेंत मांत्रिक होईल, पुत्रप्राप्ति, वेद-पुराणें यांचें श्रवण होईल.

षष्ठस्थ गुरूच्या दशेंत आरोग्यप्राप्ति, स्त्रीपुत्रांचा लाभ होईल. ही फळें दशेच्या आरंभीं मिळतील. अंतीं चोर व रोग यांपासून भयप्राप्ति होईल.

सप्तमस्थ गुरूच्या दशेंत धन-सुत-दारा यांची प्राप्ति, युद्धांत जय व पुण्यकर्म होईल.

अष्टमस्थ गुरूच्या दशेंत सुख, बंधुजनांची हानि व परदेशांत गमन होईल. अंतीं राजापासून मान मिळेल.

नवमस्थ गुरूच्या दशेंत स्त्री-पुत्र-धान्य यांपासून सौख्य व सर्व प्रकारचें ऐश्वर्य मिळेल.

दशमस्थ गुरूच्या दशेंत राज्यप्राप्ति, स्त्री-पुत्र-धन यांपासून सौख्य होईल.

एकादशस्थ गुरूच्या दशेंत राज्यलाभ, धनलाभ व राजाशीं वैर होईल.

द्वादशस्थ गुरूच्या दशेंत वाहनांची प्राप्ति व अनेक प्रकारचें दुःख होईल.

## शुक्र महादशा.

मेषस्थ शुक्राच्या दशेंत अनेक प्रकारचें सुख, प्रवास व विद्येची संपन्नता होईल.

वृषभस्थ शुक्राच्या दशेंत पशूंपासून सौख्य, शास्त्रांच्या ठायीं प्रेमभाव, दारा व कन्याप्राप्ति होईल.

मिथुनस्थ शुक्राच्या दर्शेत ग्रंथकर्ता होईल व मन सदा प्रफुल्लित राहील.

कर्कस्थ शुक्राच्या दर्शेत आपल्या कार्याचे ठायीं अनुरक्त व अनेक प्रकारचे उद्योग करणारा होईल.

सिंहस्थ शुक्राच्या दर्शेत स्त्रियांपासून द्रव्यप्राप्ति व पशु–पुत्रां-पासून अल्प सुख होईल.

कन्यास्थ शुक्राच्या दर्शेत द्रव्यप्राप्ति अल्प होईल, मनोरथ तडीस जाणार नाहीत.

तुलास्थ शुक्राच्या दर्शेत शेतीकडे लक्ष लागेल व संपत्तिमान् होईल.

वृश्चिकस्थ शुक्राच्या दर्शेत प्रवासी, कलह करणारा, दुसऱ्याचें कार्य करणारा व कर्जमुक्त होईल.

धनुस्थ शुक्राच्या दर्शेत राजमान्यता व शत्रूपासून त्रास होईल.

मकरस्थ शुक्राच्या दर्शेत शत्रूचा नाश करील, कफरोग व कुटुंबचिंता होईल.

कुंभस्थ शुक्राच्या दर्शेत शास्त्रविद्या, कलाकुशलता प्राप्त होईल.

मीनस्थ शुक्राच्या दर्शेत राजाचा प्रधान, श्रीमंत व धनधान्य-समृद्ध होईल.

लग्नस्थ शुक्राच्या दर्शेत राजमान्य होईल.

द्वितीयस्थ शुक्राच्या दर्शेत धननाश व धनप्राप्ति होईल.

तृतीयस्थ शुक्राच्या दर्शेत भावांपासून सौख्य व मनास उत्साह होईल.

चतुर्थस्थ शुक्राच्या दर्शेत राज्यप्राप्ति, शेती-पशु यांपासून सौख्य व प्रतापी होईल.

पंचमस्थ शुक्राच्या दर्शेत पुत्रप्राप्ति व राजापासून मान मिळेल.

षष्ठस्थ शुक्राच्या दर्शेत द्रव्यनाश व कार्यनाश होईल.

सप्तमस्थ शुक्राच्या दशेंत स्त्रीनाश, गुल्मादि रोग व राज्यापासून भ्रष्ट होईल.

अष्टमस्थ शुक्राच्या दशेंत शत्रु, अग्नि व चोर यांपासून बाधा होईल.

नवमस्थ शुक्राच्या दशेंत राजापासून मान मिळेल, यज्ञादि कर्मे करील व गुरु, पिता यांपासून सौख्य मिळेल.

दशमस्थ शुक्राच्या दशेंत विद्या व धन यांची प्राप्ति, राजास पूज्य व अनेक प्रकारें लाभ होईल.

एकादशस्थ शुक्राच्या दशेंत राजापासून मान, अनेक प्रकारचे लाभ, पुत्रप्राप्ति होईल, किताब मिळेल.

द्वादशस्थ शुक्राच्या दशेंत मातृवियोग, प्रवास व द्रव्यप्राप्ति होईल.

## शनि—महादशा.

मेषस्थ शनीच्या दशेंत रोग, खरूज कांटा वगैरे व्याधि, शरीर कृश व दुःख होईल.

वृषभस्थ शनीच्या दशेंत तीव्रबुद्धि व युद्धांत जय होईल.

मिथुनस्थ शनीच्या दशेंत चोर, विलासी बनेल व स्त्रियांपासून द्रव्यप्राप्ति होईल.

कर्कस्थ शनीच्या दशेंत पुत्र, स्त्री, मित्र यांच्या ठायीं रममाण होईल, नेत्रास पीडा व शरीर निर्बल होईल.

सिंहस्थ शनीच्या दशेंत अनेक प्रकारच्या पीडा व स्त्रीपुत्रांशीं कलह होईल.

कन्यास्थ शनीच्या दशेंत द्रव्याची भरभराट होईल.

तुलास्थ शनीच्या दशेंत राज्य, गज, अश्व, सुवर्ण व रत्नें यांची प्राप्ति होईल.

वृश्चिकस्थ शनीच्या दशेंत धाडसाचीं कामें करील, देशोदेशीं भटकेल व नीचांची संगत धरील.

धनुस्थ शनीच्या दशेंत युद्धांत धैर्यवान् व स्त्रीपुत्रांचें कोड पुरविणारा होईल.

मकरस्थ शनीच्या दशेंत संपत्तीकरितां फार श्रम, नपुंसक व स्त्रिया यांच्या ठायीं प्रीति करील व विश्वासघातानें द्रव्यनाश होईल.

कुंभस्थ शनीच्या दशेंत मानमरातब वाढेल, मोठ्या पदवीस चढेल व स्त्री, पुत्र, द्रव्य यांवर प्रीति करील.

मीनस्थ शनीच्या दशेंत अनेक नगरें किंवा गांवें यांपासून व स्त्रीपुत्रादिकांपासुन अत्यंत सुख मिळेल.

लग्नस्थ शनीच्या दशेंत शरीरास बाधा व चोर आणि राजा यांपासून दुःख होईल.

द्वितीयस्थ शनीच्या दशेंत द्रव्यनाश, नेत्रांस पीडा, राजकोप व मनास निरंतर दुःख होईल.

तृतीयस्थ शनीच्या दशेंत बंधुनाश व बुद्धिभ्रंश होईल.

चतुर्थस्थ शनीच्या दशेंत मातेला भीति, चोर आणि राजा यांपासून पीडा व घर जळेल.

पंचमस्थ शनीच्या दशेंत पुत्रनाश, राजकोप, बंधु, स्त्री, द्रव्य, यांचा नाश व चित्तास भ्रम होईल.

षष्ठस्थ शनीच्या दशेंत शत्रूपासून पीडा, शरीरास व्याधि, चोर व विष यांपासून पीडा आणि गृह व भूमि यांचा नाश होईल.

सप्तमस्थ शनीच्या दशेंत शत्रुपीडा, मूत्रकृच्छ्रादि रोग व स्त्रियांपासून अत्यंत दुःख होईल.

अष्टमस्थ शनीच्या दशेंत अनेक प्रकारें नाश होईल.

नवमस्थ शनीच्या दशेंत बापास मरणप्राय दुःख होईल.

दशमस्थ शनीच्या दशेंत नित्य कलह, पुत्र-मित्र स्त्री-बंधु यांचा नाश, कर्मनाश आणि राजपीडा होईल.

एकादशस्थ शनीच्या दशेंत अनेक प्रकारचे लाभ होऊन श्रीमंत होईल.

द्वादशस्थ शनीच्या दशेंत चोर, अग्नि, राजा यांपासून अनेक प्रकारचें दुःख होईल.

## राहु-महादशा.

उच्चस्थ राहूच्या दशेंत राज्य, मित्र, धन यांची प्राप्ति होईल.

नीचस्थ राहूच्या दशेंत चोर, अग्नि, राजा यांपासून भीति उत्पन्न होईल.

लग्नस्थ राहूच्या दशेंत बुद्धिहीनता, विष, अग्नि व शस्त्र यांपासून बाधा व युद्धांत पराजय होईल.

द्वितीयस्थ राहूच्या दशेंत राज्यहरण व मानसदुःख होईल.

तृतीयस्थ राहूच्या दशेंत पुत्र, स्त्री, बंधु यांपासून सुख मिळेल.

चतुर्थस्थ राहूच्या दशेंत मातेचा नाश, क्षेत्र-धन यांची हानि, राजाचा कोप व अनेक प्रकारचें दुःख होईल.

पंचमस्थ राहूच्या दशेंत बुद्धिनाश, सुतनाश व कलह होईल.

षष्ठस्थ राहूच्या दशेंत चोर, अग्नि, राजा यांपासून भय, प्रमेह, गुल्म, क्षय इत्यादि पित्तरोग होतील अथवा मरण येईल.

सप्तमस्थ राहूच्या दशेंत स्त्रीनाश, प्रवास, भाग्यहानि, सर्पापासून भय होईल.

अष्टमस्थ राहूच्या दशेंत महामृत्यु येईल, द्रव्याचा नाश व पशूंपासून भय होईल.

नवमस्थ राहूच्या दशेंत बापापासून दुःख, गुरु व बंधु यांचा नाश, समुद्रस्नान किंवा गंगास्नान होईल.

दशमस्थ राहूच्या दशेंत पुराणें व धर्मग्रंथ यांचें श्रवण व गंगास्नान होईल.

एकादशस्थ राहूच्या दशेंत राजापासून मान, द्रव्यप्राप्ति व स्त्रीप्राप्ति होईल.

द्वादशस्थ राहूच्या दशेंत मनास दुःख, स्त्रीपुत्रांचा नाश व शेती, पशु, धन, धान्य यांचा नाश होईल.

## केतु–महादशा.

लग्नस्थ केतूच्या दशेंत मोठें भय, ज्वर विंता अतिसार यांची पीडा व महामारीचा रोग यांची भीति होईल.

द्वितीयस्थ केतूच्या दशेंत धननाश, वाणींत कठोरता व मनास अत्यंत दुःख होईल.

तृतीयस्थ केतूच्या दशेंत मोठें सुख व भावांजवळ तंटे होतील.

चतुर्थस्थ केतूच्या दशेंत सुखाचा नाश होईल, घरदार जळेल व स्त्रीपुत्रांचा नाश होईल.

पंचमस्थ केतूच्या दशेंत सुतनाश, बुद्धिभ्रम, राजकोप व धननाश होईल.

षष्ठस्थ केतूच्या दशेंत मोठें भय उत्पन्न होईल.

सप्तमस्थ केतूच्या दशेंत स्त्रीपुत्रांचा नाश, मूत्रकृच्छ्रादि रोग व मनास दुःख होईल.

अष्टमस्थ केतूच्या दशेंत बापास मृत्यु, खोकला, संग्रहणी, क्षय इत्यादि रोग होतील.

नवमस्थ केतूच्या दशेंत बापापासून दुःख व कर्मनाश होईल.

दशमस्थ केतूच्या दशेंत मानहानि व मनाला दुःख होईल.

एकादशस्थ केतूच्या दशेंत अनेक प्रकारचें सुख मिळेल.

द्वादशस्थ केतूच्या दशेंत प्रवास, राजपीडा व नेत्रांस विकार होतील.

---

# भाग आठवा.

## अंतर्दशांचीं फलें.

### रवीच्या महादशेमधील अंतर्दशा.

रवि—तेजस्विता, बंधुसौख्य, सन्मान.
चंद्र—शत्रूशीं कलह, वित्तलाभ, सौख्य.
मंगळ—सुवर्ण व रत्नें यांची प्राप्ति.
राहु—संशयग्रस्त मन, व्याधि, द्रव्यनाश.
गुरु—द्रव्यलाभ, पुत्रलाभ, राज्यलाभ.
शनि—ब्राह्मण, देव इत्यादिकांचे ठायीं प्रीति.
बुध—देहपीडा, धनक्षय, पाप.
केतु—स्वदेशत्याग, बंधुनाश, द्रव्यनाश, सुतक्षय.
शुक्र—शिरोरोग, शूळ, प्रवासापासून अतिसाराचा विकार.

### चंद्राच्या महादशेमधील अंतर्दशा.

चंद्र—स्त्रीलाभ, रतिलाभ, सुतलाभ, वस्त्रलाभ, स्वजनांपासून मान.
मंगळ—अग्निभय, पित्तपीडा, राजभय, चोरभय, बंधुवैर.
राहु—रोग, अग्निभय, शत्रुत्व, बंधुनाश, धनक्षय, दुःख.
गुरु—धर्मशीलता, धनलाभ, सौख्य, वस्त्रालंकारादि लाभ, विजयप्राप्ति.
शनि—बंधुकलह, शोक, भय, हानि, संकट.
बुध—गाई, हत्ती, यांची प्राप्ति.
केतु—बंधुहानि, दारिद्र्य.
शुक्र—बहुस्त्रीसंग, कन्याप्राप्ति, द्रव्यादि लाभ.
रवि—सौख्य, व्याधिनाश, शौर्य, रिपुक्षय, ऐश्वर्य.

### मंगळाच्या महादशेमधील अंतर्दशा.

मंगळ—शत्रुनाश, स्वजनांशीं कलह, परस्त्रीसंग, वेश्यासंग.

राहु—शस्त्रभय, चोरभय, शत्रुभय, धननाश, पीडा.
गुरु—तीर्थयात्रा, देवब्राह्मणांचें पूजन, राजापासून भय.
शनि—दुःख, जलभय, संकट, राजापासून पीडा.
बुध—शत्रूंपासून व अग्नीपासून नाश, पीडा.
केतु—विजेपासून भय, शस्त्रभय, क्लेश.
शुक्र—व्याधि, क्रोध, देहपीडा, धनक्षय, निरंतर प्रवास.
रवि—अल्प राजदंड, युद्धामध्यें जय.
चंद्र—नाना प्रकारच्या द्रव्याची प्राप्ति, रत्नवस्त्रादिकांची प्राप्ति, स्त्रीसुख, पुत्रसुख, मित्रसुख.

## राहूच्या महादशेमधील अंतर्दशा.

राहु—बंधुनाश, बांधवनाश, द्रव्यनाश, परदेशीं मानमान्यता.
गुरु—सद्गुणप्राप्ति, देवब्राह्मणांचे ठायीं पूज्यता, धर्मेच्छा, तीर्थेच्छा, लाभ.
शनि—वातपीडा, पित्तपीडा, स्वजनकलह, देशत्याग.
बुध—मित्रलाभ, बंधुलाभ, आरोग्य, तीव्रबुद्धि, धनलाभ, अल्प कष्ट.
केतु—अग्नि, शत्रु अथवा शस्त्र यांपासून संकट अथवा मृत्यु.
शुक्र—स्त्रीलाभ, द्रव्यसंचय, बांधवकलह.
रवि—शस्त्रापासून जखम, राजभय, अग्निभय, चोरभय.
चंद्र—शत्रु उत्पन्न होणें, व्याधिभय, बंधुनाश, द्रव्यनाश, कलह.
मंगळ—शत्रु, अग्नि व चोर यांपासून नेहमीं भय.

## गुरूच्या महादशेमधील अंतर्दशा.

गुरु—पुत्र, सद्बुद्धि, धन, धर्मप्रीति, कीर्ति, वस्त्र, यांचा लाभ.
शनि—वेश्यागमन, कामेच्छा, दुःख, अधर्म.
बुध—मित्रप्राप्ति, योगज्ञान, गुरु व देव यांची भक्ति, सत्कर्मनिष्ठा.

केतु—निरंतर प्रवास, पुत्र व बंधु यांच्या कृत्यांविषयीं नापसंती.
शुक्र—कलह, शत्रुवैर, वित्तनाश, स्त्रीपासून नाश.
रवि—राजासारखें वैभव, व्याधिनाश, स्त्रीसुख, पण अल्प संतोष.
चंद्र—शत्रुहानि, सुख, विजय, राजाशीं मैत्री.
मंगळ—शौर्य, शत्रुभय, कीर्ति, सुख, आरोग्य.
राहु—बंधुद्वेष, कलह, मृत्युभय, स्थानांतर.

## शनीच्या महादशेमधील अंतर्दशा.

शनि—स्वजननाश, पीडा, परदेशवास, दुःख.
बुध—सौभाग्य, विजय, द्रव्यलाभ.
केतु—रक्त व पित्त यांपासून पीडा, दुष्ट स्वप्नें, बंधन.
शुक्र—मित्र व बंधु वश, स्त्रीलाभ, धनलाभ, विजय, सुख.
रवि—पुत्रनाश, कलत्रनाश, धननाश, मृत्युसंभव.
चंद्र—स्त्रीविरह, दुःख, बंधूंपासून उद्वेग, रोग.
मंगळ—देशांतरवास, दुःख, व्याधि, भय.
राहु—कुक्षिपीडा, देशांतरवास, बंधुद्वेष, दुःख.
गुरु—गुरु व देव यांचें पूजन, सौख्य, सद्गुण, नोकरीची प्राप्ति, स्थानप्राप्ति.

## बुधाच्या महादशेमधील अंतर्दशा.

बुध—प्रियमित्राची भेट, सुवर्णलाभ, वस्त्रलाभ, विद्यालाभ धनलाभ, स्थिर चित्त.
केतु—दुःख, शोक, चित्तभ्रम, शरीरक्लेश.
शुक्र—गुरु व देव यांचें पूजन, दानधर्म, छत्रचामरादि प्राप्ति.
रवि—सुवर्णप्राप्ति, वस्त्रप्राप्ति, यश.
चंद्र—आचारशीलता, धनप्राप्ति, सुख.
मंगळ—शिरोरोग, गुदपीडा, शस्त्रभय, चोरभय, राजभय, बंधु व पुत्र यांपासून पीडा.

राहु—एकाएकीं शत्रूपासून नाश व धननाश.
गुरु—व्याधि, शत्रुभय, धर्मशीलता.
शनि—द्रव्यभोगी, गंभीर, निष्काम, मित्रस्नेह, उत्साही.

### केतूच्या महादशेमधील अंतर्दशा.

केतु—पुत्रनाश, राजभय, रोगभय, अग्निभय, स्त्रीकलह.
शुक्र—प्रियजनांशीं कलह, अग्निभय, उष्णता, ज्वरपीडा, स्त्रीसुखाचा नाश.
रवि—राजाशीं तंटा, ज्वरपीडा, उष्णता, विदेशगमन.
चंद्र—धनहानि, कांहीं सुख, कांहीं दुःख.
मंगळ—बांधव व चोर यांपासून भीति, शरीरास पीडा.
राहु—चोरभय, शत्रुभय, स्वदेशत्याग.
गुरु—कीर्ति, सुख, परोपकार.
शनि—वातपीडा, पित्तपीडा, स्वजनकलह, विदेशगमन.
बुध—मित्रभेट, बंधुभेट, सद्बुद्धि, धनप्राप्ति.

### शुक्राच्या महादशेमधील अंतर्दशा.

शुक्र—लाभ, स्त्रीसंग, धर्मबुद्धि, सुख, कीर्ति, कौशल्य.
रवि—उदररोग, कारागृहवास, बंधन.
चंद्र—स्त्रीसंग, शरीरक्लेश.
मंगळ—वातरोग, पित्तरोग, क्षयरोग, क्षीणता.
राहु—दुर्जनांपासून पीडा, बंधूंपासून दुःख.
गुरु—धान्य व रत्नें यांची समृद्धि, भूमिसुख, स्त्रीसुख, पुत्रसुख, द्रव्यलाभ, कीर्तिलाभ.
शनि—वृद्धस्त्रीसंग, पुत्रनाश, द्रव्यभय, मित्रप्राप्ति.
बुध—धनप्राप्ति, सौख्य, इच्छासाफल्य, स्त्रीसुख, यश.
केतु—स्वजनांशीं व शत्रूशीं कलह, चित्ताची अस्वस्थता, भय.

---

# भाग नववा.

## योग.

### द्विग्रहयोग.

रवि–चंद्र—स्त्रियांच्या अधीन, विनयहीन, धनवान्, मद्य-विक्रयी.

रवि–मंगळ—तेजस्वी, साहसी, मूर्ख, बळवान्, असत्यभाषणी, पापबुद्धि.

रवि–बुध—अस्थिर धन, धनवान्, प्रियभाषणी, यशस्वी, विद्वान्.

रवि–गुरु—धर्मबुद्धि, राजाचा प्रधान, समृद्धिमान्.

रवि–शुक्र—शस्त्रविद्, नेत्ररोगी, मर्मज्ञ, स्त्रीपासून धनप्राप्ति.

रवि–शनि—स्वधर्मरत, स्त्रीनाश, संततिनाश, क्षुद्रवर्तनी.

चंद्र–मंगळ—शूर, मल्ल, रक्तदोषानें रोगी.

चंद्र–गुरु—मित्रसुखी, विनयशील, शीलवान्, देवब्राह्मणांचे ठायीं रत.

चंद्र–शुक्र—आळशी, क्रयविक्रयकुशल, श्वेतवस्त्र प्रिय असा.

चंद्र–शनि—वृद्धस्त्रीसंगी, आचारहीन, धनहीन, पराजित.

मंगळ–बुध—स्त्रीसुखहीन, अस्त्रविद्, सुवर्ण व लोह यांचे ज्ञान असलेला, वैद्य.

मंगळ–गुरु—शिल्पज्ञ, बुद्धिमान्, वक्ता.

मंगळ–शुक्र—पूज्य, गणिती, परस्त्रीरत, धूर्त.

मंगळ–शनि—इंद्रजालिक, वंचक, चोर, कलहप्रिय.

बुध–गुरु—नृत्यज्ञानी, प्राज्ञ, गवई, बुद्धिमान्, सुखी.

बुध–शुक्र—अतिधनवान्, मुत्सद्दी, विद्वान्, सुभाषणी, हास्यप्रिय.

बुध-शनि--कर्जबाजारी, कवि, सुभाषणी.
गुरु-शुक्र--विद्येनें उपजीविका करणारा, उत्तम भार्येनें युक्त.
गुरु-शनि—शूर, धनसंपन्न, ग्रामाधिपति, यशस्वी.
शुक्र-शनि—शिल्पज्ञ, प्रवासी.

## त्रिग्रहयोग.

रवि चंद्र मंगळ—निर्लज्ज, पापी, यंत्रविद्या जाणणारा, शूर.
रवि चंद्र बुध—तेजस्वी, बुद्धिमान्, राजकार्य करणारा, धीट.
रवि चंद्र गुरु—क्रोधी, मायावी, सेवाकर्मांत चतुर, विदेशगमनी, बुद्धिमान्.
रवि चंद्र शुक्र—परधन हरण करण्यामध्यें निपुण, परस्त्रीरत, शास्त्रनिपुण.
रवि चंद्र शनि—कलहकुशल, मूर्ख, परतंत्रानें चालणारा, दरिद्री.
रवि मंगळ बुध—मल्ल, साहसी, निष्ठुर, निर्लज्ज, धनसुतस्त्रीहीन.
रवि मंगळ गुरु–वक्ता, राजा अथवा राजमंत्री, सत्यवचनी.
रवि मंगळ शुक्र–नेत्ररोगी, कुलीन, सुदैवी, वैभवी.
रवि मंगळ शनि–विकलांग, धनरहित, रोगी, अतिमूर्ख.
रवि बुध गुरु–अतिधनवान, नेत्ररोगी, मूर्ख, काव्यरत, शिल्पज्ञ.
रवि बुध शुक्र—मान्य, वाचाळ, प्रवासी, स्त्रीच्या कारणानें त्रास पावणारा.
रवि बुध शनि—नपुंसकाप्रमाणें वागणारा, सर्वांनीं जित, बांधवांनीं त्यक्त.
रवि गुरु शुक्र—नेत्ररोगी, शूर, प्राज्ञ, निर्धन, राजमंत्री.
रवि गुरु शनि—पूज्य, सज्जनांनीं द्वेष केलेला, उत्तम स्त्री, पुत्र व मित्र, निर्भय.
रवि शुक्र शनि–शत्रुभयत्रस्त, दुष्ट आचरणाचा, कुष्ठरोगी.

चंद्र मंगळ बुध–पापी, नीच आचरण करणारा, मित्रहीन.

चंद्र मंगळ गुरु–लंपट, चोर, स्त्रियांना प्रिय.

चंद्र मंगळ शुक्र–माता व स्त्री दुःशील, प्रवासी, थंडीपासून भय.

चंद्र मंगळ शनि–बाल्यवयांत मातृनाश, तिरसट, लोकांनी द्वेष केलेला.

चंद्र बुध गुरु–धनवान्, तेजस्वी, कीर्तिमान्, बहुपुत्र.

चंद्र बुध शुक्र–विद्वान् परंतु नीच आचरणाचा, सौम्यस्वभावी, धनलोभी.

चंद्र बुध शनि–अस्तरप, प्राज्ञ, पूज्य, राजा.

चंद्र गुरु शुक्र–माता साध्वी, प्राज्ञ, कलाकुशल, बहुश्रुत, साधु.

चंद्र गुरु शनि–शास्त्रज्ञ, वृद्ध स्त्रीशीं संग करणारा, निरोगी, ग्रामांचा स्वामी.

चंद्र शुक्र शनि–लेखक, सुदैवी.

मंगळ बुध गुरु–कवि, राजा, उत्तम स्त्रीचा पति, गवई.

मंगळ बुध शुक्र–अकुलीन, विकृतांग, दुष्ट, उत्साही.

मंगळ बुध शनि–चाकर, प्रवासी, मुखरोगी.

मंगळ गुरु शुक्र–राजप्रिय, सत्पुत्रवान्, स्त्रियांपासून सुख पावणारा, सकल जनांस आनंद देणारा.

मंगळ गुरु शनि–राजसंमत, नीच आचरणाचा, निर्दय, मित्रांनी निंदा केलेला.

मंगळ शुक्र शनि–चारित्र्यहीन मातेचा पुत्र, सुखहीन, प्रवासी.

बुध गुरु शुक्र–सत्पुत्रवान्, कीर्तिमान्, सत्यभाषणी, सुदैवी.

बुध गुरु शनि–धनवान्, ऐश्वर्यवान्, प्राज्ञ, भोगी, स्वस्त्रीरत, सुदैवी.

बुध शुक्र शनि—धूर्त, अनृतभाषणी, परस्त्रीरत, कलाकुशल, स्वदेशरत.

गुरु शुक्र शनि—हीन कुळामध्यें असला तरी राजा, कीर्तिमान्, सुशील.

## चतुर्ग्रहयोग.

रवि चंद्र मंगळ बुध—लेखक, तस्कर, रोगी, मायावी.

रवि चंद्र मंगळ गुरु—धनवान्, तेजस्वी, नीतिमान्, निपुण.

रवि चंद्र मंगळ शुक्र—सुखी, निपुण, द्रव्यसंचयी, विद्वान्, स्त्रीपुत्रयुक्त.

रवि चंद्र मंगळ शनि—विकृत शरीर, ठेंगू, धनहीन, याचक.

रवि चंद्र बुध गुरु—सुवर्णकार, शिल्पकार, धनवान्, धैर्यशील.

रवि चंद्र बुध शुक्र—सुदैवी, ठेंगू, राजसंमत, कलाहीन.

रवि चंद्र बुध शनि—मातृपितृवियुक्त, धनहीन, प्रवासी, भिक्षावृत्ति, असत्यभाषणी.

रवि चंद्र गुरु शुक्र—जल, पशु व अरण्यें यांचा स्वामी, सुखी, निपुण.

रवि चंद्र गुरु शनि—तीक्ष्ण, बहुपुत्र, धनवान्, सुंदर स्त्रीचा पति.

रवि चंद्र शुक्र शनि—स्त्रियांप्रमाणें आचार करणारा, पुढारी, दुर्बल शरीर, भीरु.

रवि मंगळ बुध गुरु—शूर, निर्धन, स्त्रीहीन, दुःखी, प्रवासी.

रवि मंगळ बुध शुक्र—परदारारत, चोर, दुर्जन.

रवि मंगळ बुध शनि—योद्धा, ग्राह, तीक्ष्ण, दुराचारी, मंत्री अथवा राजा.

रवि मंगळ गुरु शुक्र—सुदैवी, पूज्य, धनवान, कीर्तिमान, नीतिमान्.

रवि मंगळ गुरु शनि—उन्मत्त, यशस्वी, बंधुयुक्त, मित्रयुक्त, नृपसंमत.

रवि मंगळ शुक्र शनि—कलाहीन, दुराचारी, बंधूंनीं द्वेष केलेला, सर्वत्र पराभव पावणारा.

रवि बुध गुरु शुक्र–धनवान्, सुखी, यशस्वी, बंधुमान्.

रवि बुध गुरु शनि–नपुंसकाप्रमाणें आचरण करणारा, मानी, कलहप्रिय, निरुत्साही.

रवि बुध शुक्र शनि–सुदैवी, प्राज्ञ, अल्पसुखी, सत्त्वगुणी, शुद्ध, धैर्यशील.

रवि गुरु शुक्र शनि—लोभी, कवि, राजसंमत, नीचांचा पुढारी.

चंद्र मंगळ बुध गुरु—शास्त्रकुशल, पुढारी, मुत्सद्दी, बुद्धिमान्.

चंद्र मंगळ बुध शुक्र—कलहप्रिय, निद्राप्रिय, नीच, बंधुद्वेषी, सुदैवी.

चंद्र मंगळ बुध शनि–शूर, मातृपितृहीन, बहुकलत्र, बहुपुत्र, सत्कर्मी.

चंद्र मंगळ गुरु शुक्र–विकृतांग, उत्तम स्त्रीचा पति, प्राज्ञ, मानी.

चंद्र मंगळ गुरु शनि–बधिर, धनवान्, शूर, उन्मत्त, उदार, स्थिरचित्त.

चंद्र मंगळ शुक्र शनि–कुलटा स्त्रीचा पति, धीट, दुःखी.

चंद्र बुध गुरु शुक्र–विद्वान्, मातृपितृहीन, सुंदर, धनयुक्त, सुदैवी.

चंद्र बुध गुरु शनि–कीर्तिमान्, तेजस्वी, पुढारी, बंधुप्रिय, बुद्धिमान्, कवि.

चंद्र बुध शुक्र शनि–परस्त्रीरत, दुःशील भार्येचा पति, प्राज्ञ, लोकांनीं द्वेष केलेला.

चंद्र गुरु शुक्र शनि–मातृहीन, भाग्यशाली, स्वरोगी, दुःखी, सत्यप्रिय.

मंगळ बुध गुरु शुक्र–स्त्रीप्रिय, कलहप्रिय, धनवान्, पूज्य, सुशील.

मंगळ बुध गुरु शनि–शूर, विद्वान्, वक्ता, धनहीन, सत्यप्रिय.

मंगळ बुध शुक्र शनि–मल्ल, कुत्रीं बाळगणारा, परोपजीवी.

मंगळ गुरु शुक्र शनि–तेजस्वी, धनयुक्त, स्त्रीलंपट, साहसी.

## पंचग्रहयोग.

रवि चंद्र मंगळ बुध गुरु—दुःखी, जायाविरहानें तप्त, बहुप्रपंच.

रवि चंद्र मंगळ बुध शुक्र—परकार्यरत, बंधु व सुहृत यांनीं सर्वस्व हरण केलेला, नपुंसकांशीं स्नेह करणारा.

रवि चंद्र मंगळ बुध शनि—अल्पायु, बंधन पावणारा, सर्वसुखहीन, भार्याहीन, पुत्रहीन, धनहीन.

रवि चंद्र मंगळ गुरु शुक्र—जन्मांध, बहुदुःखी, मातापित्यांनीं सदा त्यक्त, गानप्रिय.

रवि चंद्र मंगळ गुरु शनि—युद्धकुशल, समर्थ, परवित्तापहारी, परपीडक, दुष्ट, चंचल.

रवि चंद्र मंगळ शुक्र शनि—मानहीन, द्रव्यहीन, वैभवहीन, मलीन आचाराचा, परदाररत.

रवि चंद्र बुध गुरु शुक्र—यंत्रज्ञ, वैभवयुक्त, राजाचा मंत्री अथवा अधिकारी, कीर्तिमान्.

रवि चंद्र बुध गुरु शनि—भीरु, प्रियजनांनीं त्यक्त, उन्मत्त, वंचक, निष्ठुर, परान्नभोजी.

रवि चंद्र बुध शुक्र शनि—दीर्घशरीरी, केसाळ, सुखहीन, द्रव्यहीन, पुत्रहीन, मरणाची इच्छा करणारा.

रवि चंद्र गुरु शुक्र शनि—गोड बोलणारा, इंद्रजालिक, चंचल, बुद्धिमान्, स्त्रीप्रिय, पुष्कळ शत्रु असलेला धीट.

रवि मंगळ बुध गुरु शुक्र—कामी, धनी, पशुमान्, सेनापति, भाग्यवान्, राजाला प्रिय.

रवि मंगळ बुध गुरु शनि—नित्य उद्विग्न, रोगी, भिक्षेकरी, जीर्ण व मलीन वस्त्रें धारण करणारा.

रवि मंगळ बुध शुक्र शनि—व्याधिग्रस्त, शत्रुग्रस्त, स्थानभ्रष्ट, अति दुःखानें संतप्त, क्रोधामुळें भटकणारा.

रवि मंगळ गुरु शुक्र शनि—जलयंत्रज्ञ, धातुज्ञ, रसायनज्ञ.

रवि बुध गुरु शुक्र शनि—बहुद्याज्ञ, ज्ञानी, मित्रांचें कल्याण करणारा. गुरुसंमत, धर्मशील, करुणहृदयी.

चंद्र मंगळ बुध गुरु शुक्र—साधु, लहान शरीराचा, सत्यप्रिय, विद्यासंपन्न, धनसंपन्न, सुखसंपन्न, बांधवांचें व मित्रांचें कल्याण करणारा.

चंद्र मंगळ बुध गुरु शनि—अंधळा, दरिद्री, सदा पराचांची याचना करणारा.

चंद्र मंगळ बुध शुक्र शनि—बहुत शत्रु व बहुत मित्र असलेला, परहित करणारा, विषमस्वभावी, अतिमानी, विद्वान्, लोकमान्य, निर्धन.

चंद्र मंगळ गुरु शुक्र शनि—दास, मूर्ख, क्षीण, मलिन आचाराचा, अतिदुर्भागी, धनहीन.

चंद्र बुध गुरु शुक्र शनि—राजमंत्री, राजासारखा, पुढारी, लोकमान्य.

मंगळ बुध गुरु शुक्र शनि—सज्जन, राजसंमत, शोकहीन, क्षोपाळू, दरिद्री, उन्मत्त.

## षड्ग्रहयोग.

रवि चंद्र मंगळ बुध गुरु शुक्र—विचारत, धर्मरत, धनरत, क्षमाशील, बहुभाषणी.

रवि चंद्र मंगळ बुध गुरु शनि—दाता, परकार्यकर्ता, चंचल, क्षुद्रस्वभावी, एकांतप्रिय.

रवि चंद्र मंगळ बुध शुक्र शनि—चोर, परदाररत, कुष्ठरोगी, स्वजनत्यक्त, मूर्ख, स्थानभ्रष्ट, सुतहीन.

रवि चंद्र मंगळ गुरु शुक्र शनि—नीच, परकार्य करणारा, क्षयरोगी, बांधवांनीं निंदित.

रवि चंद्र बुध गुरु शुक्र शनि—राजमंत्री, भाग्यशाली, क्षमाशील, शोकसंतप्त, कलत्रहीन, धनहीन.

रवि मंगळ बुध गुरु शुक्र शनि—तीर्थाचे ठायीं सदा रममाण, वनें व पर्वत यांमध्यें रहाणारा, पुत्रहीन, धनहीन.

चंद्र मंगळ बुध गुरु शुक्र शनि—निरख शुद्ध, प्रतापी, बहुमार्य, नृपप्रिय, मंत्री, धनयुक्त, पुत्रयुक्त, भाग्ययुक्त.

पांच किंवा सहा ग्रह एका राशीस असणें हा शुभयोग नव्हे असा सामान्य नियम लक्षांत ठेवावा.

## राजयोग.

मेष राशीचा सूर्य, वृषभ राशीचा चंद्र, कुंभ राशीचा शनि व या तिघांपैकीं एक ग्रह लग्नीं असून मिथुन, सिंह व वृश्चिक राशींस अनुक्रमें बुध, गुरु व मंगळ असतील तर राजा किंवा राजासारखा होतो.

चंद्र व शनि उच्च राशीस असून त्यांपैकीं एक लग्नीं, सूर्य व बुध कन्या राशीस आणि मंगळ, गुरु व शुक्र अनुक्रमें मेष, कर्क व तुळ राशींस असतील तर राजा किंवा राजासारखा होतो.

मंगळ मकर राशीस, सूर्य व चंद्र धनु राशीस आणि लग्नीं शनि असल्यास राजा किंवा राजासारखा होतो.

मकर लग्नीं चंद्र व मंगळ आणि सूर्य धनु राशीस असेल तर राजा किंवा राजासारखा होतो.

सप्तम स्थानीं चंद्र व शनि, धनु राशीस गुरु आणि मेष लग्नीं रवि असेल तर राजा किंवा राजासारखा होतो.

वृषभ लग्नीं चंद्र, चतुर्थ स्थानीं सूर्य, सप्तम स्थानीं गुरु आणि दशम स्थानीं शनि असेल तर राजा किंवा राजासारखा होतो.

मकर लग्नीं शनि, तृतीय, षष्ठ, नवम व द्वादश या स्थानीं अनुक्रमें चंद्र, मंगळ, बुध व गुरु असेल तर चांगला कीर्तिमान राजा किंवा राजासारखा होतो.

कन्या किंवा मीन लग्न, धनु राशीस चंद्र व गुरु, मकर राशीस मंगळ, बुध आणि शुक्र उच्चस्थ याप्रमाणें योग असेल तर राजा किंवा राजासारखा होतो.

कन्या लग्नीं बुध, पंचम स्थानीं सूर्य व मंगळ, आणि चतुर्थ स्थानीं चंद्र, गुरु व शुक्र असतील तर राजा किंवा राजासारखा होतो.

मीन लग्नीं चंद्र, सिंह, मकर व कुंभ राशीस अनुक्रमें सूर्य, मंगळ व शनि असेल तर राजा किंवा राजासारखा होतो.

मेष किंवा कर्क लग्न, मेष राशीस मंगळ आणि कर्क राशीचा गुरु असेल तर राजा किंवा राजासारखा होतो.

कर्क लग्नीं चंद्र व गुरु, एकादश स्थानीं बुध व शुक्र आणि मेष राशीचा सूर्य असेल तर राजा किंवा राजासारखा होतो.

मकर लग्नीं शनि, मेषस्थ मंगळ, कर्कस्थ चंद्र, धनु राशीचा गुरु, मिथुन राशीचा बुध व तूळ राशीचा शुक्र असेल तर राजा किंवा राजासारखा होतो.

कन्या लग्नीं बुध, पंचम स्थानीं मंगळ व शनि, सप्तम स्थानीं चंद्र व गुरु आणि दशम स्थानीं शुक्र असेल तर राजा किंवा राजासारखा होतो.

मेष लग्नीं सूर्य व चंद्र, धनु राशीस गुरु, मकर राशीस मंगळ व कुंभ राशीस शनि असेल तर राजा किंवा राजासारखा होतो.

चतुर्थ स्थानीं स्वगृहींचा शुक्र, नवम स्थानीं चंद्र आणि इतर ग्रह प्रथम, तृतीय व एकादश यांतून कोणत्याही भवनीं एकत्र किंवा पृथक् कसेही असले तर राजा किंवा राजासारखा होतो.

लग्नीं बलवान् बुध, नवम स्थानीं किंवा चतुर्थ स्थानीं गुरु व शुक्र आणि इतर ग्रह द्वितीय, नवम किंवा उपचय स्थानीं असतील तर राजा किंवा राजासारखा असतो.

वृषभ लग्नीं चंद्र, द्वितीय स्थानीं गुरु व षष्ठ स्थानीं शनि असून बाकीचे ग्रह एकादश स्थानीं असतील तर राजा किंवा राजासारखा होतो.

लग्नीं गुरु, द्वितीय स्थानीं मंगळ व बुध, चतुर्थ स्थानीं रवि व शुक्र, दशम स्थानीं चंद्र आणि एकादश स्थानीं शनि असेल तर राजा किंवा राजासारखा होतो.

लग्नीं मंगळ व शनि चतुर्थ स्थानीं चंद्र सप्तम स्थानीं गुरु, नवम स्थानीं शुक्र, दशम स्थानीं रवि आणि एकादश स्थानीं बुध असेल तर राजा किंवा राजासारखा होतो.

वर सांगितलेल्या राजयोगांवर जन्म असेल तर लग्नस्थ ग्रह, दशमस्थ ग्रह अथवा इतर बलवान् ग्रह यांपैकीं कोणाचे तरी दशेंत राज्यलाभ अथवा ऐश्वर्यलाभ होतो.

## दारिद्र्ययोग.

शुभ ग्रह केंद्रत्रिकोणाशिवाय अन्य स्थानीं व पापग्रह अनुपचय स्थानीं असल्यास दरिद्री होतो.

द्वितीय, नवम, दशम व एकादश स्थानांचे स्वामी निर्बल असतील तर दारिद्र्य योग समजावा.

बुध, शुक्र किंवा गुरु यांपैकीं कोणीहि केंद्रीं नसेल अथवा दशमस्थानीं मगळ नसेल तर जन्म व्यर्थ जाणावा.

एकहि ग्रह उच्च, स्वगृहीं अथवा मूलत्रिकोणीं नसून केंद्रामध्यें शुभ ग्रह नसेल तर जन्म व्यर्थ जाणावा.

तीन ग्रह नीच असले तर जन्मणारा अत्यंत नीच जाणावा.

सर्व ग्रह चर राशींस असतील तर जन्मणारा अत्यत दरिद्री जाणावा.

केंद्रामध्यें सर्व पापग्रह असतील तर जन्मणारा अत्यत दरिद्री जाणावा.

सप्तम, अष्टम, नवम व दशम या स्थानीं सर्व ग्रह असले तर नीचबुद्धि, मेहनती व अत्यंत दरिद्री जाणावा.

ओळीनें तीन राशींना ( राहु व केतु खेरीज करून ) सर्व ग्रह असले तर दरिद्री जाणावा.

ओळीनें दोन राशींना ( राहु व केतु खेरीज करून ) सर्व ग्रह असले तर दरिद्री जाणावा.

चारी केंद्रांत व धनस्थानांत पापग्रह असले तर अत्यंत दरिद्री जाणावा.

चंद्र व मंगळ यांची परस्परांवर दृष्टि असेल तर राजा असला तरी राज्यभ्रष्ट होऊन दरिद्री होतो. मात्र मंगळ उच्च असल्यास फिरून सुखी होतो.

धनस्थानीं एकटा शनि असेल तर तो अत्यंत अशुभ असतो व सर्व धन चोरी होऊन नाहींसें होतें.

## चोरयोग.

बुध व मंगळ षष्ठ स्थानीं बलवान् असतील तर चोर होईल.

मकर लग्नीं मंगळ असून सप्तम स्थानांत शनि असेल तर चोर होईल व त्याला राजापासून शिक्षा होईल.

लग्नेश पापग्रहाबरोबर असून लग्नीं नीच ग्रह असेल व पराक्रमस्थानाचा स्वामी नीच असेल तर चोरांचा स्वामी होतो.

पराक्रमस्थानाचा स्वामी लाभस्थानीं असून लग्नाधिपति नीच ग्रहासमवेत व्ययस्थानीं असेल तर चोर होतो.

पराक्रमस्थानाचा स्वामी नीच आणि लग्नस्वामी नीच व पाप ग्रहांनीं युक्त असेल तर चोर होईल.

## बंधनयोग.

द्वितीय, द्वादश, पंचम आणि नवम यांपैकीं कोणत्याही स्थानीं पापग्रह असेल तर बंधन पावतो.

## ब्रह्मज्ञानयोग.

उच्च किंवा स्वगृहींचा गुरु १।६।८।१०।११।१२ या स्थानां-पैकीं एखाद्या स्थानीं असेल तर जन्मणारा उत्तम ब्रह्मज्ञानी होतो.

## वेदान्तविद्यायोग.

केंद्रामध्यें किंवा त्रिकोणामध्यें गुरु असेल तर वेदान्तज्ञानी होतो.

## व्यभिचारयोग.

सप्तमांत मंगळ असून त्यावर गुरु अथवा शुक्र यांची दृष्टि असेल किंवा कोणत्याहि ग्रहाची दृष्टि नसेल तर व्यभिचारी होतो.

शुक्राशीं फक्त मंगळ युत असेल किंवा इतर ग्रहांनीं युक्त नस-लेल्या शुक्रावर मंगळाची दृष्टि असेल तर व्यभिचारी होतो.

सप्तम स्थानीं शुक्र असेल तर व्यभिचारी होतो.

सप्तम स्थानीं शनि, मंगळ, राहु किंवा केतु स्वगृहीं किंवा उच्च नसेल तर व्यभिचारी होतो.

लग्नीं द्वितीय, पंचम, षष्ठ अथवा सप्तम स्थानाचे स्वामी शुक्रा-सह किंवा पापग्रहासह असतील तर परस्त्रियांचे ठिकाणीं आसक्त होतो.

लग्नेश किंवा षष्ठेश रवि, मंगळ आणि शनि या पापग्रहांसहित कोणत्याहि स्थानीं असेल तर परस्त्रियांचे ठिकाणीं आसक्त होतो.

द्वितीय, सप्तम आणि दशम स्थानांच्या स्वामींपैकीं कोणीहि चतुर्थ स्थानीं असेल तर परस्त्रीगमन करणारा होतो.

क्षीण चंद्र पापग्रहासह सप्तम स्थानीं असेल तर परस्त्री-गमन करतो.

सप्तम स्थानाचा स्वामी मंगळाशीं युत अथवा मंगळानें दृष्ट असेल तर परस्त्रीगमन करतो.

सप्तम स्थानाचा स्वामी पुरुषग्रह असून कोणत्याहि ग्रहानें युत अथवा दृष्ट असेल तर व्यभिचारी होत नाहीं.

लग्नीं स्वगृहींचा चंद्र, सप्तम स्थानीं मंगळ आणि नवम स्थानीं शुक्र असेल तर त्याची स्त्री थोर पतिव्रता समजावी.

## वैराग्ययोग.

दशम स्थानीं शनि असून त्यावर बुधाची दृष्टि असेल तर विरक्त होतो.

दशम स्थानाच्या स्वामीनें युक्त असा शनि दशम स्थानीं असेल तर विरक्त होतो.

चंद्र व बुध दशम स्थानीं असून त्यांवर शनीची दृष्टि असेल तर विरक्त होतो.

मेष, धनु किंवा मीन राशीस द्वादश स्थानीं केतु असेल तर विरक्त होतो.

## अनेफायोग.

जन्मकुंडलीमध्यें चंद्र ज्या स्थानीं असेल त्या स्थानाचे द्वादश स्थानीं सूर्यावांचून कोणीहि ग्रह असेल तर अनफायोग होतो. या योगावर जन्मलेल्या मनुष्याला प्रभुता, आरोग्य, सुशीलता, कीर्ति, प्रसिद्धि, सुवेष व सुख हीं प्राप्त होतात.

## सुनफायोग.

चंद्राच्या द्वितीय स्थानीं सूर्यावांचून कोणीहि ग्रह असेल तर सुनफायोग होतो. या योगावर जन्मलेला मनुष्य राजा किंवा राजासारखा ऐश्वर्यवान, स्वपराक्रमानें वित्त संपादन करणारा, कीर्ति, बुद्धि व धन यांनीं समृद्ध असा होतो.

## दुरुधरयोग.

चंद्राच्या द्वितीय आणि द्वादश अशा दोन्ही स्थानीं सूर्यावांचून कोणीहि ग्रह असतील तर दुरुधरायोग होतो. या योगावर जन्मलेल्या

मनुष्याला वडिलोपार्जित उत्पन्न, धन, सुख, वित्त, वाहन, सेवक इत्यादिकांची प्राप्ति होते.

**अनफा, सुनफा व दुरुधरा योगांचें ग्रहपरत्वें विशेष फल.**

मंगळ —उत्साह, शौर्य, धन, साहस.

बुध—दक्षता, वक्तृत्व, कलाकौशल्य.

गुरु—धन, धर्म, सुख, नृपमान्यता.

शुक्र—काम, संतति, उपभोग.

शनि—परवैभव व परभूस यांचा उपयोग, बहुत उद्योग व पुढारीपणा.

## नाभसयोग.

पुढें दिलेल्या योगांना नाभसयोग अशी सामान्य संज्ञा आहे. यांच्या विशेष संज्ञा व फलें पुढें दिलीं आहेत.

परस्परांपासून चतुर्थ–दशम अशा दोन स्थानीं सर्व ग्रह असतील तर गदायोग होतो. हा योग असतां यज्ञयागकर्ता, धनवान् व धनलोभी होतो.

लग्न व सप्तम या दोन स्थानीं सर्व ग्रह असतील तर शकटयोग होतो. हा योग असतां शकटोपजीवी, सदा रोगग्रस्त व दुष्ट स्त्रीचा पति असतो.

चतुर्थ व दशम या दोन स्थानीं सर्व ग्रह असतील तर विहंगमयोग होतो. हा योग असतां सेवक, भ्रमणशील व भांडखोर होतो.

लग्न, पंचम व नवम या तीन स्थानीं सर्व ग्रह असतील तर शृंगाटकयोग होतो. हा योग असतां निरंतर सुख मिळतें.

लग्न खेरीजकरून इतर कोणतेंहि एक स्थान आणि त्या स्थानापासून पंचम व नवम या तीन स्थानीं सर्व ग्रह असतील तर हलयोग होतो. हा योग असतां शेतकी करणारा होतो.

अत्य बयामध्यें सुखी होतो

दशम व त्यापुढील सहा स्थानें यांमध्यें सर्व ग्रह असतील तर चापयोग होतो. हा योग असतां शूर आणि प्रथम व अत्य वयामध्यें सुखी होतो.

केंद्रव्यतिरिक्त कोणतेंहि एक स्थान आणि त्यापुढील सहा स्थानें यांमध्यें सर्व ग्रह असतील तर अर्धचंद्रयोग होतो. हा योग असतां भाग्यवान् व शरीरकांतीनें युक्त होतो.

द्वितीय, चतुर्थ, षष्ठ, अष्टम, दशम व द्वादश या सहा स्थानीं सर्व ग्रह असतील तर समुद्रयोग होतो. हा योग असतां राजासारखे भोग भोगतो.

प्रथम, तृतीय, पंचम, सप्तम, नवम व एकादश या सहा स्थानीं सर्व ग्रह असतील तर चक्रयोग होतो हा योग असतां सार्वभौम राजा किंवा सार्वभौम राजाप्रमाणें ऐश्वर्ययुक्त होतो.

सातहि ग्रह निरनिराळ्या सात स्थानांमध्यें असतील तर वीणायोग होतो. हा योग असतां निपुण आणि गीत नृत्य यांचे ठिकाणीं प्रीति करणारा होतो

सातहि ग्रह सहा स्थानामध्यें मिळून असतील तर दामिनीयोग होतो. हा योग असतां दाता, परकार्यतत्पर व पशुपालक होतो.

सातहि ग्रह पांच स्थानांमध्यें मिळून असताल तर पाशयोग होतो. हा योग असतां द्रव्योपार्जनशील, सेवक व बंधु यांनीं युक्त होतो.

सातहि ग्रह चार स्थानामध्यें मिळून असतील तर केदारयोग होतो हा योग असतां परोपकारी व कृषिकर्म करणारा होतो.

सातहि ग्रह तीन स्थानामध्यें मिळून असतील तर शूलयोग होतो. हा योग असतां शूर, जखमी, धनहीन व दुःखहीन होतो.

चार केंद्रस्थानीं शुभ व अशुभ असे सर्व ग्रह असतील तर कमलयोग होतो. हा योग असतां कीर्तिमान्, विख्यात, अत्यंत सुखी व बहुगुणी होतो.

केवळ पणफर किंवा केवळ आपोक्लीम अशा चार स्थानीं सर्व ग्रह असतील तर वापीयोग होतो. हा योग असतां सर्वकाळ सुखी तसाच दुःखी, गुप्त धन ठेवणारा व कृपण होतो.

लग्न व त्या पुढील तीन स्थानें यांमध्यें सर्व ग्रह असतील तर यूपयोग होतो. हा योग असतां उद्योगी, दाता व यज्ञकर्ता होतो.

चतुर्थ व त्यापुढील तीन स्थानें यांमध्यें सर्व ग्रह असतील तर शरयोग होतो. हा योग असतां हिंसक, कारागृहाचा अधिकारी व बाण तयार करणारा होतो.

सप्तम व त्यापुढील तीन स्थानें यांमध्यें सर्व ग्रह असतील तर शक्तियोग होतो. हा योग असतां नीच, आळशी, सुखहीन व निर्धन होतो.

दशम व त्यापुढील तीन स्थानें यांमध्यें सर्व ग्रह असतील तर दंडयोग होतो. हा योग असतां प्रियजनहीन व नीचवृत्ति होतो.

लग्न व त्यापुढील सहा स्थानें यांमध्यें सर्व ग्रह असतील तर नौकायोग होतो. हा योग असतां कीर्तिमान्, अस्थिरसुख व कृपण होतो.

चतुर्थ व त्यापुढील सहा स्थानें यांमध्यें सर्व ग्रह असतील तर कूटयोग होतो. हा योग असतां असत्यभाषणी होतो व बंधन पावतो.

सप्तम व त्यापुढील सहा स्थानें यांमध्यें सर्व ग्रह असतील तर छत्रयोग होतो. हा योग असतां स्वजनांस सुख देणारा आणि

अंत्य वयामध्यें सुखी होतो.

दशम व त्यापुढील सहा स्थानें यांमध्यें सर्व ग्रह असतील तर चापयोग होतो. हा योग असतां शूर आणि प्रथम व अंत्य वयामध्यें सुखी होतो.

केंद्रव्यतिरिक्त कोणतेंहि एक स्थान आणि त्यापुढील सहा स्थानें यांमध्यें सर्व ग्रह असतील तर अर्धचंद्रयोग होतो. हा योग असतां भाग्यवान् व शरीरकांतीनें युक्त होतो.

द्वितीय, चतुर्थ, षष्ठ, अष्टम, दशम व द्वादश या सहा स्थानीं सर्व ग्रह असतील तर समुद्रयोग होतो. हा योग असतां राजासारखे भोग भोगतो.

प्रथम, तृतीय, पंचम, सप्तम, नवम व एकादश या सहा स्थानीं सर्व ग्रह असतील तर चक्रयोग होतो. हा योग असतां सार्वभौम राजा किंवा सार्वभौम राजाप्रमाणें ऐश्वर्ययुक्त होतो.

सातहि ग्रह निरनिराळ्या सात स्थानांमध्यें असतील तर वीणायोग होतो. हा योग असतां निपुण आणि गीत नृत्य यांचे ठिकाणीं प्रीति करणारा होतो.

सातहि ग्रह सहा स्थानांमध्यें मिळून असतील तर दामिनीयोग होतो. हा योग असतां दाता, परकार्यतत्पर व पशुपालक होतो.

सातहि ग्रह पांच स्थानांमध्यें मिळून असतील तर पाशयोग होतो. हा योग असतां द्रव्योपार्जनशील, सेवक व बंधु यांनीं युक्त होतो.

सातहि ग्रह चार स्थानांमध्यें मिळून असतील तर केदारयोग होतो. हा योग असतां परोपकारी व कृषिकर्म करणारा होतो.

सातहि ग्रह तीन स्थानांमध्यें मिळून असतील तर शूलयोग होतो. हा योग असतां शूर, जखमी, धनप्रिय व द्रव्यहीन होतो.

सातहि ग्रह दोन स्थानांमध्ये मिळून असतील तर युगयोग होतो. हा योग असतां द्रव्यहीन व पाखंडी होतो

सातहि ग्रह एका स्थानामध्ये असतील तर गोलयोग होतो. हा योग असतां निर्धन, मलिन, मूर्ख, आळशी आणि भ्रमणशील होतो.

---

# भाग दहावा.

## स्त्रीजातक.

जातकशास्त्राचे पुरुषजातक आणि स्त्रीजातक असे दोन भाग आहेत. पुरुषजातकाहून स्त्रीजातक निराळें आहे. हीं दोन्ही जातकें एकच आहेत अशी साधारण लोकांची समजूत असते. परंतु स्त्रीजातकावर संस्कृतामध्ये निराळे ग्रंथ आहेत. विवाहादिकाचे प्रसंगीं स्त्रीजातकाची जरूर असते. मागील भागांमध्ये पुरुषजातकाची माहिती सांगितली. पुरुषजातकाबरोबर स्त्रीजातकाचीहि थोडीशी माहिती देणें अवश्य आहे. त्याशिवाय ग्रंथ पुरा झाला असें म्हणतां येणार नाही. म्हणून स्त्रीजातकाची माहिती या भागांत दिली आहे.

कांहीं ग्रंथकारांचे मतें विवाह झाल्यावर पतीची कुंडली तीच स्त्रीची कुंडली समजावयाची असें आहे.

### लग्नफल.

जन्मकाळीं मेषलग्न असेल तर ती स्त्री बोलणारी, घातुक, नेहमीं क्रोधयुक्त, कफयुक्त, निष्ठुर बोलणारी व आपल्या बंधुवर्गावर नेहमीं रिक्त असणारी अशी होईल.

वृषभलग्नीं जन्म असेल तर सत्तमप्रणी, सुंदर, विनयशाली, नवऱ्याची आवडती, सर्वकलानिपुण, स्वर्गप्राप्तीची इच्छा करणारी, पतिवाक्य पालन करणारी अशा प्रकारची होईल.

मिथुनलग्नीं जन्म असेल तर कठोर बोलणारी, कामासक्त, गुणहीन, नेहमीं घातुक, कफवातयुक्त, पुष्कळ स्वार्थीक व क्रूर कर्म करणारी अशी होईल.

कर्कलग्नीं जन्म असेल तर सुरूप, धनवती, नीतीनें वागणारी

बंधुप्रिय, साधुशील, दक्ष, कांतियुक्त व सर्व प्रकारचे सुखानीं युक्त होईल.

सिंहलग्नीं जन्म असेल तर प्रखर स्वभावाची, कफयुक्त, कलह-प्रिय, जिचें शरीर दूषित झालें आहे अशी, परोपकाराचे ठायीं आसक्त अशी होईल.

कन्यालग्नीं जन्म असेल तर सौभाग्ययुक्त, सौंदर्यानीं युक्त, हित-कारक, सुवर्णानीं युक्त, पुष्कळ प्रकारचा धर्म करणारी, जितेंद्रिय, सर्वकलानिपुण अशा प्रकारची होईल.

तूळलग्नीं जन्म असेल तर उशीरानें कार्य करणारी, मद, मति-हीन, प्रीतिहीन, गर्विष्ठ, क्षमा न करणारी, तृष्णायुक्त, नीतियुक्त अशा प्रकारची होईल.

वृश्चिक लग्नीं जन्म असेल तर सुंदर शरीराची, पहाणाराचे डोळ्यांस आनंद देणारी, पुण्यशील, पतिव्रता, गुणवती, सत्य-वादिनी अशा प्रकारची होईल.

धनुलग्नीं जन्म असेल तर चांगल्या बुद्धीची, पुरुषासारखी वाग-णारी, प्रीतीनेंच साध्य, कर्मानें कठोर, स्नेहवर्जित, प्रीतीनें हीन अशी होईल.

मकरलग्नीं जन्म असेल तर सुदैवी, सत्यवादिनी, तीर्थसेवा करणारी, शत्रु नाहींसे करणारी, स्तुत्य कृत्य करणारी, लोकांत प्रख्यात, गुणवती व पुत्रवती होईल.

कुंभलग्नीं जन्म असेल तर मदानें व्याप्त, जाण्या दक्ष, रक्त-दोषांनीं युक्त, नेहमीं गुरुजनांशीं विरुद्ध वागणारी, विशेष खर्चिक, पुण्यासक्त व कृतघ्न होईल

मीनलग्नीं जन्म असेल तर बहुपुत्रपौत्रवती, पतिप्रिय, बंधु व जन यांना मान्य, नेत्र व केश सुंदर असणारी, देवद्विजभक्त, विनयशील व गुरुजनांच्या आज्ञेंत वागणारी होईल.

## राशिफल.

मेष राशीचा चंद्र असेल तर प्रौढ, कर्मांचे ठायीं दक्ष, श्रेष्ठ, सुंदर शरीराची, पतिप्रिय व गुरुजनांवर प्रीति करणारी होईल.

वृषभ राशीचा चंद्र असेल तर सुशील, विद्यासंपन्न, विचारशील, तत्त्वशास्त्राचे ठायीं आसक्त, तीर्थसेवा करणारी, बहुपुत्रपौत्रवती, पतिप्रिय व धनवती अशी होईल.

मिथुन राशीचा चंद्र असेल तर सुशील, सुंदर शरीराची, पहाणारास आनंद देणारी, धनधान्य व कीर्ति यांनीं युक्त, कुशल, परोपकार करणारी व सुंदर नेत्रांची अशी होईल.

कर्क राशीचा चंद्र असेल तर आपल्या आप्तजनांमध्यें पूज्य, मानवती, बंधुजनमान्य, शत्रुरहित व देवद्विजभक्त होईल.

सिंह राशीचा चंद्र असेल तर सर्वांत प्रमुख, क्रूर कर्मांनीं युक्त, मांसप्रिय, भूषणांनीं व वस्त्रांनीं संपन्न, उत्तम वर्तणुकीची, सौभाग्ययुक्त व रूपवती असेल.

कन्या राशीचा चंद्र असेल तर धन व पशु यांनीं युक्त, पतिमान्य, शत्रूंस जिंकणारी, क्षमाशील व नेहमीं शुद्धाचरणी असेल.

तूळ राशीचा चंद्र असेल तर धनसंपन्न, बंधुवर्गावर प्रीति करणारी, पतिव्रता, पुत्रवती, सुंदर, दंभ व काम यांनीं वर्जित अशी होईल.

वृश्चिक राशीचा चंद्र असेल तर शुभ पाप करणारी, स्थिर स्वभावाची, अत्यंत कुत्सित कर्म करणारी, वडील माणसांना आवडणारी, नियमानें वागणारी, बहुधनवती व निराभिमानी असेल.

धनु राशीचा चंद्र असेल तर धनसंपन्न, दानशूर, प्रीति करणारी, गीतप्रिय, जीव वांचविणारी, तंत्रशास्त्रावर प्रीति करणारी, कन्यासंततीची व त्रिनयशील होईल.

मकर राशीचा चंद्र असेल तर विक्राळ दाढांची, गंभीर, सुंदर,

विद्यासंपन्न, सत्यरत, सुरूपवती, सुसंयता (अत्यंत नियमित), नीतियुक्त व शत्रूंचा पराभव करणारी होईल.

कुंभ राशीचा चंद्र असेल तर चंद्रासारख्या वदनाची, दानशील, सुत व धन यांनीं युक्त, सत्कर्म करणारी व अभिमानी असेल.

मीन राशीचा चंद्र असेल तर पुत्रवती, धर्माविषयीं तत्पर सुशील, जितेंद्रिय, सर्वकलानिपुण, लज्जायुक्त, मानी व सुरूप असेल.

## रविभावफल.

तनुस्थानीं रवि असेल तर अति क्रूर, तीव्ररोगयुक्त, दुष्ट स्वभावाची, कृश, कृतघ्न, परान्नप्रिय व कांतिहीन होईल.

धनस्थानीं रवि असेल तर धनधान्यहीन, कठोर बोलणारी, पराक्रमहीन, कलहप्रिय, द्वेषी, दुष्ट व स्नेहहीन होईल.

सहजस्थानीं रवि असेल तर नेहमीं सुखी, सुंदर देहाची व मुखाची, विशाल स्तनांची, अति नम्र व रोगग्रस्त शरीराची होईल.

सुहृत्स्थानीं रवि असेल तर नेहमीं सुखहीन, रोगयुक्त, भयंकर दांतांची, प्रभावहीन, जनांनीं तिरस्कार केलेली अशी होईल.

सुतस्थानीं रवि असेल तर अल्पपुत्रवती, क्रियांमध्यें श्रेष्ठ, व्रताचरण करणारी, मोठ्या दांतांची व मुखाची, पितृमातृभक्त, प्रिय बोलणारी व ब्राह्मणांस मान्य होईल.

रिपुस्थानीं रवि असेल तर प्रौढ, शत्रुपक्षास जिंकणारी, क्रियांमध्यें दक्ष, शांत स्वभावाची, धर्मकृत्यप्रिय, धर्मतत्पर, सौभाग्ययुक्त व सुस्वरूप होईल.

जायास्थानीं रवि असेल तर पतीनें त्यक्त, सर्वसुखहीन, नेहमीं क्रूर, लीनता नसलेली, कफयुक्त, पापिणी व सुरूप असेल.

मृत्युस्थानीं रवि असेल तर बंधुगोत्रज दारिद्र्यदुःखानें युक्त, सर्व

कुलामध्यें कुधर्माचरण करणारी, उत्साहहीन, रक्तदोषानें सर्व अंग पीडित अशी असेल.

धर्मस्थानीं रवि असेल तर कुधर्माचरणी, साहसप्रिय, भाग्यहीन, बहुत शत्रु असणारी, पुष्कळ रागीट व ऐश्वर्यहीन असेल.

कर्मस्थानीं रवि असेल तर नेहमीं कुकर्म करणारी, निस्तेज, आपल्या कार्याविषयीं व्यग्र करणारी व स्वभावानें अतिशय कष्टी अशी असेल.

आयस्थानीं रवि असेल तर लाभयुक्त, बहुपुत्रपौत्रयुक्त, जितेंद्रिय, सर्वकलानिपुण, क्षमायुक्त, बंधुवर्गास मान्य अशी असेल.

व्ययस्थानीं रवि असेल तर असद्व्यय करणारी, उद्धट, बहुखार्चिक, पातकी, क्रूर कर्म करणारी, सर्वगामिनी व अशुचि असेल.

## चंद्रभावफल.

१ लग्नीं शुक्लपक्षींचा चंद्र असेल तर सुस्वरूप आणि कृष्णपक्षींचा असेल तर कृशांगी, निरंतर रोगी, विवादशील व नेहमीं कुवस्त्र धारण करणारी असेल.

२ धन —धनसंपन्न, नम्र स्वभावाची, पुढारी, धर्मानुकूल, पतिकार्याविषयीं दक्ष असणारी, नीतियुक्त व ब्राह्मणांस मान्य.

३ सहज—कफवातपीडित, कठोर बोलणारी, कुसंगतीची, नीतीनें वर्जित, दुष्ट स्वभावाची, कृपण व कृतघ्न.

४ सुहृत्—पुष्कळ सौंदर्ययुक्त, अद्भुतालंकार धारण करणारी स्थिर स्वभावाची, धर्मकृत्यें करणारी, अधिक भोगवती, देवगुरूंचे ठायीं भक्ति करणारी.

५ सुत-सुपुत्रवती, गुणगौरव यांनीं पूर्ण, पुष्कळ नोकरजनांनीं युक्त, पुत्रसौख्यांनीं युक्त, उत्तममान्य, पतीच्या आज्ञेंत वागणारी, रूपवती.

६ रिपु—अल्पधनवती, दीर्घद्वेषी, विनय नसणारी, चंचल स्वभावाची, सर्व शरीरास क्षतें असणारी, रोगग्रस्त, कृश.

७ जाया—चतुर, पतिप्रिय, धर्मशील, विवेकयुक्त, मधुरभाषणी, ऐश्वर्यसंपन्न, तेजस्वी, शुद्धाचरणाची.

८ मृत्यु—घात करणारी, कुरूप नेत्रांची, वाईट कुचांची, विद्रूप अवयवांची, वस्त्राभरणरहित, क्रोधवती व अत्यंत निंदित.

९ धर्म—पुष्कळ धर्म करणारी, बारीक कटीची, पुष्कळ भोग भोगणारी, अति समर्थ, सुंदरी, चांगले सेवक व पुत्र यांनीं युक्त, उत्तम प्रकारचें सौख्य असणारी.

१० कर्म—पुष्कळ सुवर्ण व धन यांनीं युक्त, प्रख्यात, निरिच्छ, उभयकुलश्रेष्ठ, दानशूर, पुण्यशील, सत्यभाषणी.

११ आय—उत्तम लाभवती, भव्य, विहित कर्में जाणणारी, इंद्रियनिग्रह करणारी, संतुष्ट चित्ताची, नम्र, दानशूर निरोगी.

१२ व्यय—पुष्कळ खर्चिक, शांत प्रकृतीची, तीव्र स्वभावाची, अन्यायी, क्षमाहीन व अत्यंत दरिद्री.

## मंगलभावफल.

१ लग्न—अतिशय रक्तदोषांनीं पीडित, पराक्रम नष्ट झालेली, पतीनें तिरस्कृत, भाग्यहीन, गर्वानें युक्त.

२ धन—दुष्ट, दरिद्री, कुत्सित नवऱ्याची, पुष्कळ पुरुषांचा आश्रय करणारी, कामातुर, रोगी, बहुरोगपीडित, थोडेसे केश असणारी.

३ सहज—सौभाग्यवती, शांत स्वभावाची, आप्तांना प्रिय, साधूंच्या ठिकाणीं रत, मोकळ्या मनाची, निरोगी, प्रख्यात प्रभावाची.

४ सुहृद—इच्छितफल न पावणारी, आरंभिलेलें कार्य शेवटास न गेल्यामुळें दुःखी, सौख्यहीन, शरीरानें उंच, द्रव्यहीन, जनांनीं तिरस्कृत, नेहमीं कोपिष्ट.

५ सुत—कुपुत्रवती, लज्जाहीन, दुर्जनमान्य, पाप करण्याविषयीं दक्ष, शास्त्रविरुद्ध वागणारी, बंधुवर्गवर्जित.

६ रिपु—पतियुक्त, शत्रुपक्षवर्जित, बहुधनवती, सज्जनांवर प्रेम करणारी, विद्यासंपन्न, निरोगी.

७ जाया-बालविधवा, दुष्टस्वभावाची, ऐश्वर्यहीन, कुरूप, गुणवर्जित.

८ मृत्यु— बहुरोगी, कृशांगी, विधवा, दारिद्र्य-दुःख-व्रण शोक यांनीं युक्त, हिंसा करणारी, कांतिहीन.

९ धर्म—धर्महीन, सुंदर मुखाची, रोगी, भाग्यहीन, सज्जनांनीं तिरस्कार केलेली, मांसभक्षक, नेहमीं सुरापान करणारी.

१० कर्म—कुकर्मी, कुबुद्धि, शीलहीन, रतिप्रिय, अधर्मी, लज्जाहीन निर्बुद्ध.

११ आय—बहुलाभवती, निरिच्छ, उत्तम स्वभावाची, बहु उपचारवती, पतीचे ठिकाणीं प्रीति करणारी आणि धर्मासक्त.

१२ व्यय—कदाच सेवन करणारी, गुणरहित, असद्व्यय करणारी, मद्यपान करणारी, घातकी, नेहमीं आतुर (रोगग्रस्त), निर्लज्जी.

## बुधभावफल.

१ लग्न—रूपवती, पतिमान्य, नीति व धर्म यांनीं युक्त, विशालनेत्रांची, अन्नपानादि संपन्न, सर्वांस प्रिय व नेहमीं खरें बोलणारी.

२ धन—धनसंपन्न, शुद्धाचरणी, रूपवती, ब्राह्मणसेवातत्पर, पशादिकांवर प्रीति करणारी, लक्ष्मीयुक्त, गुणयुक्त.

३ सहज—धनाढ्य, देवद्विजाराधन करणारी, पुत्र व कीर्ति यांनीं युक्त, लोक अनुकूल असणारी, समर्थ.

४ सुहृद्—बहुसुखी, पुष्कळ सुजनांनीं व चांगल्या सेवकांनीं युक्त, देवद्विजाराधनतत्पर, प्रख्यात कुळांत झालेली व पुष्कळ धर्म करणारी.

५ सुत—अल्पसंतति, अल्प धन व अन्न असणारी, कलहप्रिय, कारणावांचून हिंडणारी, वाईट कर्मे करणारी, दरिद्री, साधूंचा त्याग करणारी.

६ रिपु—शत्रुपक्षाचा मोड करणारी, अत्यंत दयाळू, अल्पायुषी, कोणतेंहि काम जलद करणारी, चांगलें करण्याची इच्छा असणारी, परोपकार करण्याविषयीं दक्ष.

७ जाया—श्रेष्ठ, चतुर, शास्त्रप्रिय, पुण्यकारिणी, नियमित वागणारी, उत्तम प्रभावाची, नम्र.

८ मृत्यु—कृतघ्न, निरभिमानी, धर्म सोडणारी, जनांशीं विरुद्ध, नेहमीं दुःखी, भीतीनें युक्त .

९ धर्म—धर्मानें वागणारी, धनयुक्त, विनयशील, भाग्यसपन्न, सत्कीर्तियुक्त, सत्यास अनुसरणारी.

१० कर्म—सत्कर्म करणारी, पतीस मान्य, बहुधनसंपन्न, सुस्वरूप, नीतिश्रेष्ठ, विवेकशील.

११ आय—पुष्कळ द्रव्याचा व्यापार करणारी, बहुलाभयुक्त, उत्तम शीलाची, पतिव्रता, बंधुजनमान्य.

१२ व्यय—दुर्लक्ष करणारी, प्रतापहीन, भांडखोर, व्याकुल, कृशांगी, निर्गुणी, सुजनांनीं तिरस्कार केलेली.

## गुरुभावफल.

१ लग्न—नेहमीं सत्य बोलणारी, मनोहर उपभोगांनीं युक्त, गंभीर बोलणारी, सत्पक्षपाती, सुंदर तनूची, स्त्रियांमध्यें श्रेष्ठ.

२ धन—बहुधनवती, सौभाग्ययुक्त, सुंदर, धर्मशील, नीतिमती, श्रेष्ठ, निरिच्छ, हानिरहित.

३ सहज—पराक्रमरहित, बहुदोषी, गौरवरहित, कृश शरीराची.

४ सुहृद्—सुखांनीं युक्त, बहुअन्नपानसंपन्न, पुष्कळ विद्यालंकारांनीं युक्त, प्रख्यात, सुंदर अवयवांची, गुणांच्या योगानें गौरव पावणारी.

५ सुत—सत्पुत्रवती, निष्पापी, पतीला नेहमीं अनुकूल असणारी, मतधर्माविषयीं दक्ष, सत्यास अनुसरणारी, समाजांत वर्णन करण्यास योग्य.

६ रिपु—बहुत शत्रु असणारी, नीतियुक्त, पुष्कळ आपत्तींनी ग्रासलेली, शरीरास त्रास असणारी, श्रेष्ठ कृत्यें करणारी, नेहमीं उपचार करून घेणारी.

७ जाया—बहु मानिक, पुण्यशील, ज्ञानशास्त्रविषयीं आसक्त, पुष्कळ शास्त्रें अवगत असणारी, पतिप्रिय, कीर्तिसंपन्न.

८ मृत्यु—अल्पसत्यभाषणी, विशालदेही, पतीनें टाकलेली, हस्तपादांचे ठिकाणीं स्थूल, व्यसनाधीन, कांतिमती, रोगी.

९ धर्म—देव व सत्य यांचे ठिकाणीं अनुरक्त, तळीं वगैरे बांधून संतोष पावणारी, सुंदर प्रशस्त अंगाची, ब्राह्मणांचे ठिकाणीं भक्ति करणारी, जिचीं मुलें श्रीमंत होतील अशी, कृतज्ञ.

१० कर्म—सत्कर्मांच्या योगानें प्रख्यात, उत्तम गुण असणारी, गुणज्ञ, पुष्कळ दासी असणारी, नम्र, प्रौढ, पुण्यशील, अद्‍भुत कर्म करणारी.

११ आय—जितेंद्रिया, पुष्कळ कीर्ति वाढविणारी, संपत्तिमती, शिल्पकला जाणणारी, सत्य बोलणारी, गुणांचे कीर्तनानें सदा प्रीतियुक्त.

१२ व्यय—दुष्ट कृत्यांकडे व्यय करणारी, रोगपीडित, लाभ न होणारी, कुळधर्मास टाकणारी, स्वभावतः दुष्ट, परधर्म आचरण करणारी.

## शुक्रभावफल.

१ लग्न—जिचा पति उत्तम आहे अशी, सुंदर, कुशल, सौभाग्यवती, पुष्कळ श्रीमती, निर्दोष शरीर असणारी, शत्रुरहित, नेहमीं सुशील.

२ धन—सधन, कर्मांमध्यें कुशल, धर्माचा ध्वज उभारणारी, सत्कर्म आचरणारी, भाग्यवती, आपल्या कृत्यांच्या योगानें प्रख्यात, मृदु बोलणारी.

३ सहज—दरिद्री, बधुवर्गानें टाकलेली, शोकयुक्त, पतीनें सोड-लेली, कठिण अत करणाची, अडखळत बोलणारी.

४ सहृत—बहुसौख्ययुक्त, धनाढ्य, उत्तम भोग भोगणारी, धर्म-क्रियाविषयीं तत्पर, जितेंद्रिया, आपल्या वशास भूषण.

५ सुत—धनसपन्न, बहु कन्यासतति असणारी, अनुकरण चांगलें करणारी, कुसगति नसणारी, आपल्या कुळांत नेहमीं पुढारी.

६ रिपु—अतिशय ईर्षायुक्त, बहु कोपिष्ठ, तीव्र स्वभावाची, शत्रूस जिंकणारी, नेहमीं पतिपुत्रादिकांनीं टाकलेली.

७ जाया—पुष्कळ द्रव्य व प्रभाव यानीं युक्त, पतिप्रिय, शास्त्ररत, प्रौढ, ब्राह्मणाचें हित करणारी, सर्वजनमान्य.'

८ मृत्यु—उद्भट, खेदयुक्त, दरिद्री, निष्ठुर, परजनांनीं पीडित, कुवस्त्र धारण करणारी, अधर्मी.

९ धर्म—धर्मतत्पर, लोकांत पुढारी, नानाप्रकारचें धन-वस्त्र आश्रय-भोजन यानीं युक्त, सतुष्ट चित्ताची, पुरुषार्थें अनुकरण करणारी

१० कर्म—यशस्विनी, उत्तम धनसपन्न, चांगल्या कर्मानें मान्य, बुद्धिसपन्न, निरोगी, सयुक्तिक, सत्य बोलणारी.

११ आय—बहुलाभवती, निर्दोषी, बहुशास्त्र जाणणारी, मोठ्या प्रभावाची, पुष्कळ आश्रययुक्त.

१२ व्यय—असद्व्ययानें दु खी, अवयव सम असणारी, अत्यंत कपटी, दुसऱ्यास लागून बोलणारी, रोगी, निर्बुद्ध.

## शनिभावफल.

१ लग्न—विरूप देह, पुष्कळ श्रम करणारी, कीर्तीनें रहित, मोठ्या दाढांची व दातांची, आंधळी.

२ धन—दरिद्री, जनांनीं तिरस्कार केलेली, सदा अपयशी, नम्रता नसणारी, घातकी, नीतीनें पूर्वापरविरुद्ध बोलणारी.

३ सहज—दक्ष, श्रेष्ठ, बहुधा यसमह करणारी, पुष्कळ सत-

तीनें युक्त, शरणागतांचें रक्षण करणारी, साधुजनांनीं नेहमीं प्रशंसा केलेली.

४ सुहृत्—वाईट प्रकारानें सुख भोगणारी, मतिहीन, कृतघ्न, चंचल स्वभावाची, दरिद्री, नेहमीं नीचांच्या समागमानें दुष्ट.

५ सुत—निपुत्री, निर्दय, फार गर्विष्ठ, वेश्येसारखी वागणारी, साधुसमागमाचा त्याग करणारी.

६ रिपु—मद स्वभावाची, श्रेष्ठ, पुत्रवती, बहु वस्त्रालंकार धारण करणारी, गुण ग्रहण करणारी, पुत्रास प्रिय.

७ जाया—विधवा किंवा नवऱ्यानें नेहमी टाकलेली, रोगग्रस्त, मद्यपान करणारी, नीचाशीं मित्रता करणारी, बहुदोषी, अतिशय कपटी.

८ मृत्यु—आपल्या कर्मदोषानीं नाश पावलेली, दुष्ट स्वभावाची, धर्म न करणारी, असत्य वागणारी, पापरूपिणी, लोकांस फसविणारी.

९ धर्म—नेहमीं कुकर्म करणारी, पुष्कळ खर्चिक, लुब्ध असा मित्रजनांनीं युक्त, ज्ञानहीन, केव्हांही नम्र न होणारी.

१० कर्म—कुकर्म करणारी, वाईटाचें अनुकरण करणारी, वाईट गोष्टींच्या व्यसनानें ग्रस्त झालेली, स्वभावतः दुष्ट, दरिद्री

११ आय—सत्पुत्रवती, धनसपन्न, सुदर तनूची, बहु प्रकारच्या अन्नपानांनीं युक्त, पुष्कळ भोगांनीं परिपूर्ण, निर्भय

१२ व्यय—रक्ताधिक्य असणारी, वातकफदोषानें युक्त, अविचारी, कुटिल स्वभावाची, नेहमीं जनांनीं तिरस्कार केलेली, व्यसनबद्ध अशी असेल.

## लग्नग्रहफल.

जिच्या जन्मकाळीं लग्न किंवा चंद्र सम राशींत असेल ती स्त्री स्थिर प्रकृतीची होईल; व लग्न किंवा चंद्र शुभग्रहांनीं युक्त अथवा

दुष्ट असेल तर रूपवती, गुणज्ञ, पतिप्रिय व उत्तम अलंकारांनीं युक्त अशी असेल.

जिच्या जन्मकाळीं लग्न आणि चंद्र हे दोन्ही विषम राशीस असतील त्या स्त्रीचा आकार पुरुषासारखा असून रूपहीन असेल; आणि ते दोन्ही पापग्रहांनीं युक्त अथवा दृष्ट असतील तर ती विशेषेंकरून रोगी, रूपहीन व गुणहीन असेल.

जिच्या जन्मलग्नीं शुक्र असेल ती रूपवती होईल; मंगळ असेल ती अहंकारानें युक्त होईल. बुध असेल ती कुटिल स्वभावाची होईल. गुरु असेल ती शुद्धाचरणाची होईल. शनि असेल ती दरिद्री व दैन्यहीन होईल.

जिच्या लग्नीं शुक्र व चंद्र असतील ती ईर्ष्यायुक्त व सुखासक्त; चंद्र व बुध लग्नीं असतील ती कलानिपुण, सुखी, गुणाढ्य, बुध व शुक्र असतील ती सुस्वरूप, सौभाग्यवती व कलाकुशल, चंद्र, बुध व शुक्र असतील तर अनेक सौंदर्यांनीं युक्त व गुणज्ञ अशी होईल.

जिचें लग्न मिथुन अथवा कन्या असून लग्नीं चंद्र व शुक्र असतील ती सुखी होईल, परंतु पति व पिता तिचा द्वेष करतील व ती चंचल स्वभावाची होईल.

## सप्तमग्रहफल.

जिच्या सप्तम स्थानीं एका शुभग्रहाची दृष्टि किंवा योग असेल ती पतिप्रिय होईल. दोन शुभग्रहांची दृष्टि किंवा योग असेल ती श्रेष्ठ होईल. तीन शुभग्रहांची दृष्टि किंवा योग असेल ती भूपतीची स्त्री होईल. एक पापग्रह किंवा पापग्रहाची दृष्टि असेल ती चंचलनयना होईल. दोन पापग्रहांची दृष्टि किंवा योग असेल ती नीच होईल. तीन पापग्रहांची दृष्टि किंवा योग असेल ती पतीस मारून अन्य-पुरुषाचे घरीं राहील व जातिभ्रष्ट होईल.

जिच्या जन्मकाळीं सप्तम स्थानीं रवि असेल ती रागानें नवऱ्यास सोडून जाईल; भौम असेल तिला वैधव्य प्राप्त होईल; शनि असून तो पापग्रहांनीं दृष्ट असेल तर तिला पूर्ववयांत वृद्धत्व येईल आणि ती आपल्या पतीशीं विरोधानें वागेल.

जिच्या सप्तमस्थानीं रवि असेल ती उत्तम कुळांतली असली तरी नीच होईल. पतीचे ठिकाणीं तिची प्रीति रहाणार नाहीं. तिला सुजनत्व असणार नाहीं.

जिच्या सप्तम स्थानीं वृषभेचा चंद्र असेल ती उत्तम वस्त्र धारण करणारी, मुक्ताफळाचे माळांनीं युक्त अशा स्तनभारानें नम्र झालेली आणि स्निग्धत्वाचे ठायीं रतीप्रमाणें श्रेष्ठ अशी होईल.

जिच्या सप्तम स्थानीं, किंवा कर्क राशीत सप्तम स्थानीं, मंगळ शनीनें युक्त असेल ती वैधव्य पावेल अथवा उत्तम कुळांतली असली तरी कपटानें पतीचा त्याग करून वेश्या होईल.

जिच्या सप्तमस्थानीं उच्चीचा बुध असेल तिचा पति अनेक प्रकारच्या संपत्तीनें युक्त व यज्ञयाग करणारा असा होईल; आणि ती कामव्याप्तहृदया, निरंतर आनंदवृत्तियुक्त, सुवर्ण, रुपें, मौक्तिक, रत्नें इत्यादि धारण करणारी होईल.

जिच्या सप्तम स्थानीं उच्च गुरु असेल ती गुणज्ञ, धर्मज्ञ व पतीच्या सेवेंत तत्पर असेल; रत्नमाळा व सुवर्णादि अलंकार धारण करणारी व अत्यंत रूपवती अशी होईल.

जिच्या सप्तम स्थानीं मीन राशीचा शुक्र असेल तिचा पति इंद्रियदमनशील, सुंदर, कामशास्त्राचे ठायीं कुशल, धनुर्धारी, शूर असा असेल; व ती संगीत कला जाणणारी, पद्मपत्रासारखे नेत्र असून चंचल पहाणारी, उत्तमवस्त्रें व अलंकार धारण करणारी अशी होईल.

जिच्या सप्तम स्थानीं शनि असेल तिचा पति अति रोगी;

मलिन वस्त्र धारण करणारा व दुर्बल होईल. शनि उच्च असेल तर तिचा पति प्रख्यात धनवान् होईल.

जिच्या सप्तम स्थानीं राहु असेल ती कुलाला कलंक लावणारी व सुखहीन अशी होईल. राहु उच्च असेल तर ती पतिसुखानें युक्त असेल.

जिच्या जन्मकाळीं लग्न व चंद्र यांपासून सप्तम स्थान हें ग्रहा-वांचून असेल किंवा सप्तम स्थान बलहीन असून सौम्य ग्रहांची दृष्टि नसेल तर तिचा भर्ता निंद्य होईल; सप्तम स्थानीं बुध व शनि असेल तर तिचा पति नपुंसक होईल. सूर्य असेल तर पति तिचा त्याग करील. मंगळ असेल तर ती बालविधवा होईल. शनि सप्तम स्थानीं असून तो पापग्रहांनीं दृष्ट असेल तर तिला कन्यावस्थेंतच वृद्धत्व येईल. सप्तम स्थान चर राशीचें असेल तर पति निरंतर प्रवास करणारा होईल.

## अष्टमग्रहफल.

जिच्या अष्टम स्थानीं गुरु किंवा शुक्र असेल तिचे गर्भ नाश पावतील अथवा संतति जगणार नाहीं. मंगळ अष्टम स्थानीं असेल तर ती व्यभिचारिणी होईल. चंद्र असेल तिला पतीचें सुख मिळ-णार नाहीं.

जिच्या अष्टम स्थानीं शनि असेल तिचा पति रोगी असेल. रवि असेल तर ती शोकमततापानें युक्त होईल. राहु असेल तर कामक्रीडेविषयीं दक्ष असून परपुरुषाशीं रत होऊन आपला धर्म सोडील.

जिच्या अष्टम स्थानीं गुरु व शुक्र असतील तिची संतति जग-णार नाहीं. मंगळ अष्टम स्थानीं असेल तर तिच्या गर्भामध्येंच मुलें मरतील.

जिच्या सप्तम व अष्टम स्थानीं पापग्रह नसून तीं दोन्हीं स्थानें

शुभग्रहयुक्त व दृष्ट असतील तर ती स्त्री शीलवती, आचारसंपन्न, पतिव्रता, बहुगुणवती, सर्व स्त्रियांमध्ये प्रधान, सत्ता करणारी, नवऱ्याचे आर्जव वागणारी व दीर्घायु अशी होईल.

## नवमग्रहफल.

जिचें नवमस्थान शुभग्रहांनी युक्त अथवा दृष्ट असेल ती सुपुत्र व पौत्र यांनी युक्त होईल.

जिचीं सप्तम व अष्टम हीं दोन्ही स्थानें पापग्रहयुक्त असलीं तथापि नवम स्थान शुभग्रहयुक्त असेल तर ती स्त्री पतिपुत्रांनी युक्त होऊन निःसंशय सुख पावेल.

चंद्रापासून सप्तम स्थानीं पापग्रह असतील तर ती स्त्री विधवा होते. तसेंच सप्तम स्थानीं शुभ ग्रह असतील तर ते राज्यपद देणारे असतात. सप्तम स्थानीं किंवा अष्टम स्थानीं जरी पापग्रह असले तथापि भाग्यस्थानीं शुभग्रह असतील तर ती पति, श्री, बहुपुत्र, सौख्य, ऐश्वर्य यांही करून युक्त होऊन बहुत दिवस जगते.

जिच्या भाग्यस्थानीं ( नवम स्थानीं ) गुरु आणि शुक्र असतील तिचें अष्टम स्थान जरी पापग्रहयुक्त असलें तथापि ती पति, पुत्र व पौत्र यांच्या सुखाचा बहुकालपर्यंत अनुभव घेते.

## शुभयोग.

जिच्या जन्मकाळीं मकरेचा मंगळ आणि मीनेचा गुरु असेल; अथवा चतुर्थस्थानीं शुक्र असेल तिचे स्तन हर्षाच्या गंडस्थळांतील मौक्तिकें व रत्नें यांच्या मालांनी सुशोभित रहातील.

शनि मध्यस्थी असून चंद्र, बुध व शुक्र बलहीन असतील, आणि बाकीचे ग्रह बलिष्ठ व लग्न विषम राशीचें असा योग असेल तर ती स्त्री विशेषेकरून सर्व गुणांनी पुरुषासारखी होईल. लग्न सम असून रवि, मंगळ, बुध व गुरु योग्य स्थानीं बलिष्ठ असतील तर ती शास्त्रतत्त्वज्ञानाविषयीं चतुर आणि वेदान्तज्ञ अशी होईल.

जिच्या जन्मकाळीं गुरु केंद्रीं अथवा त्रिकोणीं, उच्च, मूल-त्रिकोणींचा किंवा स्वगृहींचा असेल ती स्त्री सुशील म्हणून बहुमान्य साध्वी, सुपुत्रांस प्रसविणारी, सुखी, गुणसंपन्न, उभय कुलांची कीर्ति वाढविणारी अशा प्रकारची होईल.

जिच्या जन्मकाळीं लग्नीं सम राशि असून त्या ठिकाणीं बलिष्ठ चंद्र, बुध, गुरु व शुक्र हे ग्रह असतील, ती स्त्री ब्रह्मज्ञानाच्या चर्चेनें अनुभवसाक्षात्कारी होईल.

सप्तम स्थानीं सम राशी असून शुभ ग्रहांनीं युक्त व दृष्ट असेल तर ती स्त्री किंवा तो पुरुष राजपूज्य व पुण्यवान् असा होईल.

कर्क लग्नीं बुध, गुरु, शुक्र आणि चंद्र असून ते बलिष्ठ असतील तर ती स्त्री ब्रह्मवादिनी, अनेक शास्त्रांत कुशल अशी होईल.

जिच्या जन्मकाळीं लग्नीं चंद्र, बुध, शुक्र; किंवा गुरु, शुक्र, बुध असा योग असेल ती स्त्री अनेक प्रकारच्या सुखांनीं, दासी-जनांनीं व अलंकारांनीं युक्त अशी होईल.

## संततियोग.

पंचम भावावर शुभग्रहाची दृष्टि असून पंचमाधिपति केंद्रीं अथवा त्रिकोणीं शुभग्रहानें दृष्ट असेल तर बहुपुत्रवती होईल.

पंचम स्थानीं बलिष्ठ गुरु असेल तर पांच पुत्र होतील. बलिष्ठ चंद्र व शुक्र असेल तर कन्यासंतति होईल. बलिष्ठ पापग्रह असेल तर संतति होणार नाहीं.

जिच्या जन्मकाळीं पंचम स्थानीं रवि असेल तिला एकच पुत्र होऊन तो राजा होईल. मंगळ असेल तर तीन पुत्र होतील. गुरु असेल तर पांच पुत्र होतील.

जिच्या पंचम स्थानीं चंद्र असेल तिला दोन कन्या होतील; बुध असेल तर चार व शुक्र असेल तर सात कन्या होतील.

जिच्या जन्मकाळीं नवम स्थानीं शुक्र असेल तिला सहा कन्या होतील. सप्तम स्थानीं राहु असेल तिला पुत्र होईल.

जिच्या पंचम स्थानीं सर्व शुभ ग्रह किंवा त्यांची दृष्टि असेल तिला पुष्कळ संतति होईल.

जिच्या पंचम स्थानीं गुरु व शुक्र असतील ती बहुपुत्रवती, सौभाग्यवती, पतिमान्य, गुणवती व पतिव्रता अशी होईल.

जिच्या पंचम स्थानीं अशुभ ग्रह किंवा अशुभ ग्रहांची दृष्टि असेल तिला अल्प संतति होते.

जिच्या सप्तमस्थानीं शनीनें दृष्ट मंगळ असेल तिचा गर्भपात होईल. सप्तमस्थानीं मंगळ आणि शनि असतील तर गर्भपात होईल. सप्तमस्थानीं शनि असेल तर तिची प्रजा रोगपीडित होईल.

जन्मलग्नापासून अष्टमस्थानीं स्वक्षेत्रींचा रवि किंवा चंद्र असेल तर ती वंध्या होईल, अष्टम स्थानीं चंद्र व बुध यांचा योग असेल तर ती काकवंध्या ( एकच संतति ) होईल.

जिच्या सप्तम स्थानीं रवि असून तो शनीनें अथवा राहूनें दृष्ट असेल तिला मृतापत्यें होतील.

## वैधव्ययोग.

चंद्रापासून सप्तम स्थानीं मंगळ, शनि, राहु व रवि हे ग्रह असतील किंवा हेच ग्रह जन्मलग्नापासून सप्तम स्थानीं किंवा अष्टम स्थानीं असतील तर तिला वैधव्य येतें.

जिच्या अष्टम व द्वादश स्थानीं मेष किंवा वृश्चिक राशि असून तेथें पापयुक्त राहु असेल ती विधवा होईल.

लग्न, चतुर्थ, सप्तम, अष्टम व द्वादश या स्थानांपैकीं कोणत्याहि स्थानीं मंगळ असेल तर ती स्त्री आपल्या पतीचा नाश करील. हाच योग पुरुषाच्या कुंडलीत असेल तर तो आपल्या पत्नीचा नाश करील.

जिच्या जन्मकाळीं अष्टम किंवा द्वादश स्थानीं मंगळ व लग्नीं पापयुक्त राहु असेल ती विधवा होईल. लग्नीं रवि, मंगळ किंवा शनि असेल तर ती भाग्यहीन होईल. अष्टम स्थानीं क्रूर ग्रह असेल तर ती विधवा होईल.

जिच्या जन्मकाळीं रवि, मंगळ व राहु हे ग्रह लग्नीं ... ती विधवा होईल.

जिच्या जन्मकाळीं द्वादश किंवा अष्टम या स्थानीं मंगळ पापग्रहांनीं युक्त असून लग्नीं राहु असेल तिला बालवैधव्य प्राप्त होईल.

जिच्या जन्मकाळीं सप्तमेश अष्टम स्थानीं व अष्टमेश सप्तम स्थानीं असून त्यावर पापग्रहाची दृष्टि असेल ती लहानपणींच वैधव्य पावेल.

जिच्या लग्नीं व सप्तम स्थानीं पापग्रह असतील तिचा पति विवाह झाल्यापासून सातवे वर्षीं मृत्यु पावेल. वरील योग असून षष्ठ किंवा अष्टम स्थानीं चंद्र असेल तर आठवे वर्षीं मृत्यु पावेल.

## वैधव्यभंगाचा उपाय.

जी कन्या वैधव्य योगावर जन्मलेली असेल तिच्या विवाहापूर्वी शांति करावी व वेदोक्त विधानेंकरून दीर्घायु वराशीं तिचा विवाह करावा.

कन्येला वैधव्ययोग असेल तर तिजकडून वैधव्यपरिहारक सावित्रीव्रत किंवा पिप्पलव्रत करवून मग ती कन्या दीर्घायु वराला द्यावी अथवा विवाहाच्या सुमुहूर्तावर विष्णुमूर्ति, पिप्पल अथवा कुंभ यांच्याशीं धर्मशास्त्राच्या रीतीप्रमाणें गुप्त विवाह करून नंतर ती कन्या दीर्घायु वराला द्यावी, म्हणजे तिला दोन वेळ विवाह केल्याचा दोष येणार नाही.

## अशुभयोग.

जिच्या जन्मकाळीं शुक्र व शनि परस्पर गृहीं किंवा परस्परांनीं

ग्रह असतील तर अत्यंत कामपीडित होऊन पुरुषवेष धारण करणाऱ्या स्त्रीपासून कामशांति करून घेईल.

जिच्या लग्नीं, चतुर्थ स्थानीं, सप्तम स्थानीं, अष्टम स्थानीं किंवा द्वादश स्थानीं पापग्रहांनीं युक्त मंगळ असेल ती स्त्री पतीचा धिक्कार करून परपुरुषाशीं रममाण होईल.

जिच्या सप्तम स्थानीं बलिष्ठ पापग्रह असून त्यावर अशुभ ग्रहाची दृष्टि असेल तिला पतिसुख मिळणार नाहीं. सप्तम स्थानीं मंगळ, शुक्र व चंद्र असतील तर ती पतीच्या आज्ञेनें व्यभिचार करील.

जिचें जन्मलग्न भौम किंवा शनि यांचें क्षेत्र असून त्यांत शुक्र व चंद्र हे ग्रह असतील व त्यांवर पापग्रहांची दृष्टि असेल ती आपल्या आईसह व्यभिचारिणी होईल.

जिचें जन्मलग्न किंवा चंद्र यांच्या द्वितीय व द्वादश स्थानीं पापग्रह असतील ती आपल्या पितृकुळाचा व विशेषेंकरून श्वशुरकुळाचा नाश करते.

जिच्या सप्तम स्थानीं पापग्रहानें युक्त शुक्र असेल ती आपल्या कुलास कलंक लावील; आणि कर्क राशीला मंगळ असेल ती स्वेच्छेनें वागणारी होऊन घर न सोडतां जारकर्म करील.

स्त्रियांच्या कुंडलींत अष्टम स्थानीं कोणताही ग्रह असला तरी तो अशुभ योग होय.

जन्मकाळीं लग्न व चंद्र चर राशीचे असून त्यांवर स्त्रीग्रहाची दृष्टि, आणि केंद्रीं बलिष्ठ पापग्रह असा योग असेल तर ती एकापेक्षां अधिक नवरे करील.

## वंध्यायोग.

जन्मलग्न, चतुर्थ, पंचम, सप्तम आणि द्वादश या स्थानीं सर्व ग्रह असतील तर तिचा नवरा वांझ असेल. हाच योग पुरुषास

असेल तर त्याची बायको वांझ असेल.

जिच्या जन्मकाळीं अष्टमस्थानीं स्वराशीचा शनि किंवा रवि असेल ती वंध्या होईल. त्या स्थानीं स्वगृहींचा बुध किंवा चंद्र असेल तर ती काकवंध्या होईल.

जिच्या जन्मकाळीं शनि किंवा मंगळ यांचे क्षेत्राचें लग्न, शुक्र व चंद्र एक राशीचे आणि लग्नावर पापग्रहाची दृष्टि असा योग असेल ती वंध्या होईल.

जिच्या जन्मकाळीं सप्तम स्थान पापग्रहाचें क्षेत्र असून तें पापग्रहानें दृष्ट असेल तिला संतति होणार नाहीं.

## सुवासिनीमरणयोग.

जिच्या जन्मलग्नीं शुभ आणि पापग्रह व द्वितीय स्थानीं शुभ ग्रह असेल ती पतीचे अगोदर मृत्यु पावेल.

जिच्या जन्मकाळीं चंद्रापासून सप्तम स्थानीं शुभयुक्त पापग्रह असून तो शत्रुगृहींचा किंवा नीच असेल ती पतीसह एकेच वेळीं मरण पावेल.

जन्मसमयीं अष्टमस्थानीं समानबल अशा शुभ व अशुभ ग्रहांचा योग असेल तर ती पतिसह एकेच वेळीं मरण पावेल.

## राजयोग.

जिच्या जन्मकाळीं लग्न विषम राशीचें असून बुध, गुरु, शुक्र हे हीनबली, शनि मध्यबली व बाकीचे ग्रह बलिष्ठ असतील ती स्त्री पुरुषाकाराची असून निरंतर पुरुषासारखा व्यवहार करणारी आणि लोकांत प्रख्यात अशी होईल.

जिच्या जन्मकाळीं सप्तमस्थानीं शुक्र व इतर दोन शुभग्रह असतील ती हत्तींच्या गंडस्थळांतील मुक्ताफळांचे सुशोभित माळांनीं युक्त आहेत स्तन जिचे अशी, नेहमीं पतीला आवडणारी आणि क्षितिनटावर इंद्राणीसारखी ऐश्वर्य भोगणारी होईल.

जिचें जन्मलग्न कर्क असून लग्नीं गुरु किंवा शुक्र असून कन्या राशीस बुध, सप्तम स्थानीं उच्च मंगळ आणि कर्क राशीचा चंद्र असेल ती क्षितिपतीची स्त्री होईल.

जिच्या जन्मकाळीं कन्यालग्न असून तेथें बुध असेल, वृषभेचा शुक्र, कर्केचा चंद्र आणि मीनेचा गुरु असा योग असेल ती राजकन्या असून जगामध्यें मोठी गुणवती व पुण्याची केवळ खाणच आणि विशेषेंकरून राजाची पत्नी होऊन सहस्र मंत्रिगणांना मान्य अशी होईल.

जिच्या जन्मकाळीं उच्च बुध आणि लग्नस्थानीं गुरु असा योग असेल ती राजपत्नी होऊन क्षितितलाचे ठायीं प्रसिद्ध होईल.

जिच्या जन्मकाळीं कर्क लग्न असून सप्तम स्थानीं रवि व त्यावर गुरूची पूर्ण दृष्टि असेल ती सर्व अवयवांनीं परिपूर्ण, विद्यासंपन्न आणि राजस्त्री होऊन शत्रुरहित, श्रेष्ठ व पुत्रसंततीनीं युक्त अशी होईल.

जिच्या जन्मकाळीं एकादश स्थानीं चंद्र व सप्तम स्थानीं शुक्र बुधानें युक्त असून त्यावर गुरूची दृष्टि असेल ती राजस्त्री होऊन पृथ्वीतलावर तिची ख्याति होईल व सर्व लोक तिची स्तुति करतील.

जिच्या जन्मकाळीं उच्च चंद्र चतुर्थस्थानीं गुरूनें दृष्ट असून तो चंद्र पूर्ण असेल ती स्त्री विद्याधरीप्रमाणें श्रेष्ठ व राजपत्नी होऊन शत्रूंस जिंकणारी व बहुपुत्रपौत्रवती अशी होईल.

जिच्या जन्मकाळीं उच्च रवि एकादशस्थानीं, पूर्ण चंद्र लग्नीं आणि बुध दशमस्थानीं असा योग असेल ती स्त्री राजपत्नी होऊन पतिमान्य, बहुपुत्रपौत्रवती होईल.

जिच्या जन्मकाळीं लग्नीं उच्च बुध, एकादश स्थानीं गुरु, द्वितीयस्थानीं शुक्र, दशमस्थानीं चंद्र असा योग असेल ती स्त्री सार्वभौम राजाची पट्टराणी होईल.

असेल तर त्याची बायको वांझ असेल.

जिच्या जन्मकाळीं अष्टमस्थानीं स्वराशीचा शनि किंवा रवि असेल ती वंध्या होईल. त्या स्थानीं स्वगृहींचा बुध किंवा चंद्र असेल तर ती काकवंध्या होईल.

जिच्या जन्मकाळीं शनि किंवा मंगळ यांचे क्षेत्राचें लग्न, शुक्र व चंद्र एक राशीचे आणि लग्नावर पापग्रहाची दृष्टि असा योग असेल ती वंध्या होईल.

जिच्या जन्मकाळीं सप्तमस्थान पापग्रहाचें क्षेत्र असून तें पापग्रहानें दृष्ट असेल तिला संतति होणार नाहीं.

## सुवासिनीमरणयोग.

जिच्या जन्मलग्नीं शुभ आणि पापग्रह व द्वितीय स्थानीं शुभ ग्रह असेल ती पतीचे अगोदर मृत्यु पावेल.

जिच्या जन्मकाळीं चंद्रापासून सप्तम स्थानीं शुभयुक्त पापग्रह असून तो शत्रुगृहींचा किंवा नीच असेल ती पतीसह एकेच वेळीं मरण पावेल.

जन्मसमयीं अष्टमस्थानीं समानबल अशा शुभ व अशुभ ग्रहांचा योग असेल तर ती पतिसह एकेच वेळीं मरण पावेल.

## राजयोग.

जिच्या जन्मकाळीं लग्न विषम राशीचें असून बुध, गुरु, शुक्र हे हीनबली, शनि मध्यबली व बाकीचे ग्रह बलिष्ठ असतील ती स्त्री पुरुषाकाराची असून निरंतर पुरुषासारखा व्यवहार करणारी आणि लोकांत प्रख्यात अशी होईल.

जिच्या जन्मकाळीं सप्तमस्थानीं शुक्र व इतर दोन शुभग्रह असतील ती हत्तीच्या गंडस्थळांतील मुक्ताफळांचे सुशोभित माळांनीं युक्त आहेत स्तन जिचे अशी, नेहमीं पतीला आवडणारी आणि क्षितितलावर इंद्राणीसारखी ऐश्वर्य भोगणारी होईल.

जिचें जन्मलग्न कर्क असून लग्नीं गुरु किंवा शुक्र असून कन्या राशीस बुध, सप्तम स्थानीं उच्च मंगळ आणि कर्क राशीचा चंद्र असेल ती क्षितिपतीची स्त्री होईल.

जिच्या जन्मकाळीं कन्यालग्न असून तेथें बुध असेल, वृषभेचा शुक्र, कर्केचा चंद्र आणि मीनेचा गुरु असा योग असेल ती राजकन्या असून जगामध्यें मोठी गुणवती व पुण्याची केवळ लताच आणि विशेषेंकरून राजाची पत्नी होऊन सहस्र मैत्रिणींना मान्य अशी होईल.

जिच्या जन्मकाळीं उच्च बुध आणि लाभस्थानीं गुरु असा योग असेल ती राजपत्नी होऊन क्षितितलाचे ठायीं प्रसिद्ध होईल.

जिच्या जन्मकाळीं कर्क लग्न असून सप्तम स्थानीं रवि व त्यावर गुरूची पूर्ण दृष्टि असेल ती सर्व अवयवांनीं परिपूर्ण, विद्यासंपन्न आणि राजस्त्री होऊन शत्रुरहित, श्रेष्ठ व पुत्रपौत्रांनीं युक्त अशी होईल.

जिच्या जन्मकाळीं एकादश स्थानीं चंद्र व सप्तम स्थानीं शुक्र बुधानें युक्त असून त्यावर गुरूची दृष्टि असेल ती राजस्त्री होऊन पृथ्वीतलावर तिची ख्याति होईल व सर्व लोक तिची स्तुति करतील.

जिच्या जन्मकाळीं उच्च चंद्र चतुर्थस्थानीं गुरूनें दृष्ट असून तो चंद्र पूर्ण असेल ती स्त्री विद्याधरीप्रमाणें श्रेष्ठ व राजपत्नी होऊन शत्रूंस जिंकणारी व बहुपुत्रपौत्रवती अशी होईल.

जिच्या जन्मकाळीं उच्च रवि एकादशस्थानीं, पूर्ण चंद्र लग्नीं आणि बुध दशमस्थानीं असा योग असेल ती स्त्री राजपत्नी होऊन पतिमान्य, बहुपुत्रपौत्रवती होईल.

जिच्या जन्मकाळीं लग्नीं उच्च बुध, एकादश स्थानीं गुरु, द्वितीयस्थानीं शुक्र, दशमस्थानीं चंद्र असा योग असेल ती स्त्री सार्वभौम राजाची पट्टराणी होईल.

जन्मसमयीं लग्न, तृतीय, पंचम आणि नवम या स्थानांपैकीं कोणत्याहि स्थानीं चार ग्रह एकत्र असतील तर तो राजासारखें ऐश्वर्य भोगणारा होईल. हा योग पुरुष व स्त्री दोघांनाहि आहे.

---

# परिशिष्ट.

**राहु व केतु**—राहु व केतु हे वास्तविक ग्रह नव्हेत. प्राचीन ग्रंथांत हे ग्रह मानलेले नाहींत. यांना ग्रह कां मानावे हें मलाहि समजत नाहीं. अर्वाकडे शनीपेक्षांहि दूर असलेले यूरेनस व नेपच्युन हे ग्रह जातकशास्त्रांत घेण्याची वहिवाट हळूहळू सुरू झाली आहे. हे ग्रह घेणें सयुक्तिक दिसतें. पण त्यांचीं फळें अनुभवानें तयार केलीं पाहिजेत. यांना कै. दीक्षित यांनीं प्रजापति व वरुण अशीं नांवें योजलीं आहेत. यूरेनसला हर्शलहि म्हणतात. हर्शल एका राशीवर सात वर्षे असतो. म्हणून शनीची जशी साडेसाती (प्रत्येक राशीचीं अडीच वर्षे मिळून तीन राशींचीं साडेसात वर्षे) तशी हर्शलची एकविशी मानणारे ज्योतिषी अलीकडे आढळतात.

**शनीची साडेसाती**—जन्मकाळीं चंद्र ज्या राशीला असतो, ती त्या माणसाची राशि असें म्हणतात. मनुष्याच्या आयुष्यांत त्याच्या राशीच्या अगोदरच्या राशीला जेव्हां शनि येतो तेव्हां त्या मनुष्याला शनीची साडेसाती सुरू झाली असें समजावें. शनि प्रत्येक राशीला सुमारें अडीच वर्षे असतो. अर्थात् जन्म-राशीच्या अगोदरच्या राशीचीं अडीच वर्षे, जन्मराशीचीं अडीच वर्षे आणि त्यापुढील राशीचीं अडीच वर्षे मिळून साडेसात वर्षे होतात. शनि जोंपर्यंत या तीन राशींत असतो तोंपर्यंतचा काळ त्या मनुष्याला अत्यंत संकटांत जातो. अकल्पित संकटें उत्पन्न होतात. त्यांच्याशीं झगडतां पुरेवाट होते. कुटुंबहानि, द्रव्यहानि वगैरेंनीं त्रस्त होतो. जन्मराशीमध्यें शनि असेल त्या अडीच वर्षांत आपत्तींची शिकस्त होते, क्वचित् या अडीच वर्षांत उलट प्रकारहि होतो, म्हणजे

आपत्ति नष्ट होऊन उदयही होतो. असा प्रकार झाला तर त्याला उदरीं शनि आला असें म्हणतात.

**राशिफल**—जन्म–लग्नापेक्षां जन्म–राशीचें महत्व कांहीं ग्रंथांत अधिक मानलेलें आहे. असा एक ग्रंथ माझ्या पाहण्यांत आला. त्यांत दिलेली राशींची फलें महत्त्वाचीं वाटल्यावरून पुढें दिलीं आहेत—

१ मेष राशीवर जन्मलेला मनुष्य कठोर अंतःकरणाचा असतो. उंच ठिकाणावरून खालीं पडण्याची किंवा पाण्यांत बुडण्याची भीति असते. वृश्चिक, कर्क, सिंह, धनु अथवा मीन राशीवर जन्मलेल्या माणसांच्या साहाय्यानें त्यानें धंदा चालविला असतां तो यशस्वी होतो. आपला पैसा सत्कार्यीं खर्चणारा, स्वस्त्रीरत, आरोग्य-युक्त असा असतो. त्याला मंगळवार शुभ आणि बुधवार अशुभ होय. दिवसास मरेल. ३,६,८,१२,१४ व १५ हीं वर्षे किंवा महिने संकटाचे. यांतून निभावला म्हणजे दीर्घायुषी. आईचें व त्याचें पटणार नाहीं. लोकप्रिय नाहीं. स्वतंत्र धंदा करणारा किंवा लष्करी उद्योग. पाण्यापासून भय. हुद्याचीं कामें करणारा. संपत्ति अशाश्वत.

२ वृषभ राशीवर जन्मलेला मनुष्य—सुस्वभावी, रातीं बलवान्, कृपण. वृषभ, मिथुन, कन्या, मकर आणि कुंभ हे राशि मित्र म्हणजे या राशींवर जन्मलेल्या माणसांची मैत्री खरी व लाभदायक. कर्क व सिंह हे शत्रु. गोड बोलणारा, पुष्कळ संतति, नेत्ररोगी, पंडीपासून व अतिसारापासून भय. अकल्पित द्रव्यप्राप्तीचा संभव. कोर्टाकडून शिक्षा. पशूपासून मृत्यूचा संभव. सोन्यांदिणें व कपडेलत्ते चांगले वापरणारा. १, १६, व ५५ ह्या वर्षीं किंवा महिन्यांत अरिष्ट. निश्चयी, हट्टी, वजनदार, धिमा, मित्रांची.

समृद्धि. संपत्ति, घरें, जमिनी यांचा मालक, उदार, गायनप्रिय, चित्रकलाप्रिय, सुस्वभावी, नातलगांपासून दूर.

३ मिथुनराशिफल—शांत स्वभावी, दिवसास बलवान्. वृषभ, सिंह, कन्या आणि तूळ हे मित्र. कर्क हा शत्रु. हंसतमुखी, बुद्धिमान्, चतुर, सुदैवी, द्रव्याची अडचण कधीं असणार नाहीं, अल्पसंतति, हलक्या जातीच्या स्त्रियांकडून अपमान पावणारा. अकल्पित द्रव्यप्राप्ति होते. जे त्याला आपले मित्र वाटतात तेच त्याचें शत्रुत्व करतात. ८, १०, २८, ५२ आणि ५४ या वर्षी किंवा महिन्यांत अरिष्ट. विद्याव्यासंगी, शास्त्रीय व वाङ्मय-विषयांचा भोक्ता. धंदे एकाहून अधिक करणारा. दूर, प्रवासाची आवड असणारा, निश्चयानें कमकुवत, गोड बोलणारा, गायनप्रिय.

४ कर्कराशिफल—दयाशील, कफप्रकृति, सिंह, मिथुन व कन्या हे त्याचे मित्र. मेष, वृषभ, तूळ, वृश्चिक, धनु, मकर, कुंभ व मीन हे बहुतांशीं शत्रुत्व करणारे. कुटुंबाचा लौकिक वाढविणारा. उंच ठिकाणावरून पडण्याचें भय, पाण्यांत बुडण्याचें भय, अग्नीपासून भय. पुष्कळ संतति पण फक्त एक मुलगा लौकिकवान्. गुणवती व अनुरक्त स्त्री. अनिच्छेनें परदारा भोगणारा व त्यापासून संकटांत येणारा. तुरुंगवास. मित्रांनीं व नातलगांनीं सोडलेला. नीच जातीचे लोक शत्रु. १२, २१, ३१, ४१, ५१, ६१ ह्या वर्षी किंवा महिन्यांत अरिष्ट. दुसऱ्याच्या तंत्रानें चालेल तर यशस्वी. ज्योतिषविद्यानिपुण, घरदार—शेतवाडी यांचा मालक. पाण्याजवळ राहणारा किंवा तत्संबंधीं धंदा करणारा.

५ सिंहराशिफल—शरीरानें सुदृढ, दिवसास बलवान्. मेष, कर्क, वृश्चिक, धनु, मीन, मिथुन व कन्या राशी हे मित्र. वृषभ, तूळ, मकर व कुंभ हे शत्रु. हंसतमुख, रतिप्रिय. तहान जास्त, चोरापासून

भय. अग्नीपासून नाश, पण पुढें नुकसान भरून निघेल. पुत्रांपासून दुःख. तो रविवारीं जें काम हातीं घेईल त्यांत यश मिळवील. ५, २०, ३० या वर्षी किंवा महिन्यांत अरिष्ट. पवित्र ठिकाणीं मरण. महत्त्वाकांक्षी, सन्मान्य, द्रव्यानें उदार, पोटदुखीची व दांतांची व्याधी. स्त्रियांचा द्वेषी, गायनप्रिय, काव्यप्रिय, चित्रकलाप्रिय, स्थिरचित्त, गर्विष्ठ, मोकळ्या मनाचा, चैनी, मातृभक्त, अल्पपुत्र आणि महत्त्वाकांक्षी.

६ कन्याराशिफल—दिवसास बलवान्. मिथुन, सिंह व तूळ राशी हे मित्र, कर्क शत्रु. खोकला व पोट दुखणें हे उपद्रव, शरीर सुदृढ. स्त्रीचा स्वभाव चांगला नाहीं. सेवक चांगले मिळतात. शत्रु पुष्कळ. बुधवार शुभ, मंगळवार अशुभ. २, १२, २२, ४२ ह्या वर्षी किंवा महिन्यांत अरिष्ट. स्मृति चांगली, विद्येची प्राप्ति त्वरित. विश्वासू, नीतिमान, विद्वान्, बहुगुणी. औषधें किंवा धान्य यांचा धंदा करतो. शिक्षक किंवा प्रोफेसर होतो.

७ तूळराशिफल—वातप्रकृति. मिथुन, कन्या, मकर, कुंभ हे मित्र, कर्क व सिंह शत्रु. फार बोलका. घोड्यावरून किंवा उंच ठिकाणावरून पडण्याची भीति, पाण्यांत बुडण्याचा संभव. पुष्कळ संतति, कामी. डोकें, पोट व त्वचा यांचेसंबंधीं रोग. ६, १६, २६, ३६, ४६ आणि ५६ या वर्षी किंवा महिन्यांत अरिष्ट. मेल्यानंतर कीर्ति पसरते. देव, ब्राह्मण व साधु यांचा पूजक. सुस्वभावी, कोमल अंतःकरणाचा, व्यवहारांत चोख व कडक. दुसऱ्यांच्या संगतीनें व मदतीनें उद्योगधंद्यांत यश. नातलगांना मदत करणारा, सहवासप्रिय, लोकप्रिय. नेहमीं दुसऱ्यावर अवलंबून राहील. स्त्रियांच्या अधीन.

वृश्चिकराशिफल—कर्क, सिंह, धनु, मेष, मीन हे मित्र, मिथुन आणि कन्या शत्रु. व्यापारांत यश. एक पुत्र व एक कन्या त्याला

निघाला असतां म्हाताऱ्या मनुष्याचें तोंड पाहिल्यास अशुभ. ५, १०, १९, २७, ५३ ह्या वर्षी किंवा महिन्यांत अरिष्ट. धर्मशील, विद्वान्, चंचल, व्यवहारांत चुकणारा. कदाचित् मद्यादि व्यसनाधीन. शरीर निरोगी नव्हे.

समाप्त.